# उपयुक्त कथासंग्रह.

भाग २ रा.

हें पुस्तक

विद्वान् मंडळीच्या साहायानें

नारायण रामचंद्र सोहनी.

यांनीं

तयार करून

मुंबईत

आपल्या




"जगदीश्वर" छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति ४थी.

शके १८१०

सन १८८८



किंमत २ रुपये.

# अनुक्रमणिका.

# श्रीरामदासकृतमनाचेश्लोक·

## प्रारंभ·

गणाधीशजो ईशसर्वांगुणाचा॥मुळारंभआरंभतोनिर्गुणाचा॥
नमोशारदा मूळचत्वारिवाचा॥ गमोपंथआनंतयाराघवाचा॥१॥

॥ १ ॥

मना सज्जना भक्तिपंथेंचिजावें॥ तरीश्रीहरीपाविजेतो स्वभावें॥
जनींनिंद्यतें सर्व सोडोनि द्यावें॥ जनीं वंद्यतें सर्व भावें करावें॥२॥

॥ २ ॥

प्रभाते मनींरामचिंतीतजावा॥पुढेंवैखरीरामआधीं वदावा॥
सदाचार हाथोर सांडूनि येतो॥ जगींतोचितो मानवींधन्यहोतो॥

॥ ३ ॥

मना वासना दुष्टकामा नयेरे॥ मना सर्वथा पापबुद्धीनकोरे॥
मनासर्वथा नीतिसोडूंनकोहो॥मनाअंतरींसारवीचार राहो॥

॥ ४ ॥

मनापापसंकल्पसोडोनिद्यावा॥मनासत्यसंकल्पजीवींधरावा॥
मनाकल्पनाते नकोवीषयाची॥विकारेंघडेहोजगींसर्वछीछी॥

॥ ५ ॥

नकोरे मनाक्रोधहाखेदकारी॥नकोरे मनाकामनानाविकारी॥
नकोरेमनासर्वदा अंगिकारू॥ नकोरेमना मत्सरूदंभभारू॥

॥ ६ ॥

मनाश्रेष्ठधारिष्टजीवींधरावें॥मनाबोलणेंनीचसोशीतजावें॥
स्वयेंसर्वदानम्रवाचेवदावें॥ मनासर्वलोकांस्वरें नीववावें॥

॥ ७ ॥

देहेत्यागितांकीर्तिमागेंउरावी॥मनासज्जनाहेचिक्रियाधरावी॥
मनाचंदनाचेपरीत्वांझिजावें॥परीअंतरीं सज्जानीववावें॥ ८॥

नकोरे मना द्रव्य तें पूढिलांचें ॥ अतिस्वार्थ बुद्धी नुरे पापसाचें ॥
घडे भोगणें पाप तें कर्म खोटें ॥ नहोतां मनासारिखें दुःख मोठें ॥

॥ ९ ॥

सदासर्वदा प्रीति रामीं धरावी ॥ दुःखाची स्वयें सांडि जीवीं करावी ॥
देहदुःख तें सूख मानीत जावें ॥ विवेकें सदा स्वस्वरूपीं भजावें ॥

॥ १० ॥

जनीं सर्व सूखी असा कोण आहे ॥ विचारी मना तूंचि शोधूनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्व संचीत केलें ॥ तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥

॥ ११ ॥

मना मानसीं दुःख आणूं नकोरे ॥ मना सर्वथा शोक चिंता नकोरे ॥
विवेकें देहबुद्धि सोडोनि द्यावी ॥ विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥

॥ १२ ॥

मना सांग पां रावणा काय झालें ॥ अकस्मात तें राज्य सर्व बुडालें ॥
म्हणोनी कुडी वासना सांडि वेगीं ॥ बळें लागला काळ हा पाठिलागीं ॥

॥ १३ ॥

जिवा कर्मयोगें जनीं जन्म झाला ॥ परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥
महाथोर ते मृत्युपंथेंचि गेले ॥ असंख्यात ते जन्मले आणि मेले ॥

॥ १४ ॥

मना पाहतां सत्य हे मृत्युभूमी ॥ जितां बोलती सर्वही जीव मीमी ॥
चिरंजीव हे सर्वही मानिताती ॥ अकस्मात सांडूनियां सर्व जाती ॥

॥ १५ ॥

मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ॥ अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ रे क्षोभ होतो ॥ म्हणोनी जनीं मागुता जन्म घेतो ॥

॥ १६ ॥

मना मानसीं व्यर्थ चिंता वहाते ॥ अकस्मात होणार होऊनि जातें ॥
घडे भोगणें सर्व ही कर्मयोगें ॥ मतीमंद तो खेद मानी वियोगें ॥ १७ ॥

मनाराघवावीण आशा नकोरे॥ मनामानवाचीनकोकीर्तितूरे॥
जयावर्णितीवेदशास्त्रेंपुराणें॥तयावर्णितांसर्वहीश्लाघ्यवाणें॥
॥ १८ ॥
मनासर्वथा सत्यसांडूंनकोरे॥मनासर्वथामिथ्यमांडूं नकोरे॥
मनासत्यतें सत्यवाचें वदावें॥मनामिथ्यतेंमिथ्यसोडोनिद्यावें॥
॥ १९ ॥
बहूहींपुटींहोइजे मायपोटीं॥ नकोरेमनायातनातेचि मोठी॥
निरोधें पचेकोंडिलें गर्भवासीं॥अधोमूरवरेंदुःखत्याबाळकासी॥
॥ २० ॥
मनावासनाचूकवींयेरझारा॥मना कामनासोडवी द्रव्यदारा॥
मनायातनाथोरहे गर्भवासीं॥ मनासज्जनाभेटवींराघवासीं॥
॥ २१ ॥
मनासज्जना हीत माझें करावें॥ रघूनायका दृढचित्तीं धरावें॥
महाराजतोस्वामिवायूसुताचा॥जनाउद्धरींनाथलोकत्रयाचा॥
॥ २२ ॥
नबोलेंमनाराघवावीणकांहीं॥जनींवाउगेंबोलतांसौख्यनाहीं॥
घडीनेघडीकाळआयुष्यनेतो॥देहांतींतुलाकोणसोडूं पहातो॥
॥ २३ ॥
रघूनायका वीणवायांशिणावें॥जनासारिखें व्यर्थकांवोसणावें॥
सदासर्वदा नामवाचेवसोंदे॥अहंतामनींपापिणीतेनसोंदे॥
॥ २४ ॥
मनावीटमानूंनकोबोलण्याचा॥पुढेंमागुतारामजोडेलकैंचा॥
सुखाचीघडीलोटतांसुखआहे॥पुढेंसर्वजाईलकांहीं नराहे॥
॥ २५ ॥
देहरक्षणाकारणेंयत्नकेला॥परीशेवटींकाळघेऊनिगेला॥
करींरेमनाभक्तियाराघवाची॥पुढेंअंतरींसोडिचिंताभवाची॥२६

भवाचे भयें काय भीतोसि लंडी ॥ धरीरे मना धैर्य धाकासि सांडी ॥
रघूनायकासारिखा स्वामि शीरीं ॥ नुपेक्षी कदां कोपल्या दंड धारी ॥

॥ २७ ॥

दिनानाथ हा राम कोदंड धारी ॥ पुढें देखतां काळ पोटीं थरारी ॥
जनीं वाक्य नेमस्त हें सत्य मानीं ॥ नुपेक्षी कदां रामदासाभिमानी ॥

॥ २८ ॥

पदीं राघवाचे सदा ब्रीद गाजे ॥ बळें भक्तरीपूशिरीं कां विगजे ॥
पुरीवाहिली सर्व जेणें विमानीं ॥ नुपेक्षी कदां रामदासाभिमानी ॥

॥ २९ ॥

समर्थाचिया सेवका वक्र पाहे ॥ असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही ॥ नुपेक्षी कदां रामदासाभिमानी ।

॥ ३० ॥

महासंकटीं सोडिले देव जेणें ॥ प्रतापें बळें आगळा कोटि गूणें ॥
जयातें स्मरे शैलजा शूलपाणी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

॥ ३१ ॥

अहल्या शिळा राघवें मुक्त केली ॥ पदीं लागतां दिव्य होवोनि गेली ॥
जया वर्णितां शीणली वेदवाणी ॥ नुपेक्षी कदां रामदासाभिमानी ॥

॥ ३२ ॥

वसे मेरु मांदार हे सृष्टिलीला ॥ शशी सूर्य तारागणीं मेघमाळा ॥
चिरंजीव केले जगीं दास दोनी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

॥ ३३ ॥

सदा सर्वदा देव सन्नीध आहे ॥ रूपाळूपणे अल्प धारिष्ट पाहे ॥
सुखानंद आनंद कैवल्य दानी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

॥ ३४ ॥

उपेक्षा कधीं रामरूपीं असेना ॥ जिवा मानवा निश्चयतो वसेना ॥
शिरीं भार वाहेन बोले पुराणीं ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ ३५ ॥

असेहो जया अंतरीं भाव जैसा ॥ वसेहो तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्यासि रक्षीतसे चापपाणी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

॥ ३६ ॥

सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ॥ उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥
हरीभक्तिचा घाव घाली निशाणी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

॥ ३७ ॥

मना प्रार्थना तूजला एक आहे ॥ रघूराज अंकीत होवोनि राहें ॥
अवज्ञा कधीं हो यदर्थी न कीजे ॥ मना सज्जनीं राघवीं वस्ति कीजे ॥

॥ ३८ ॥

जया वर्णितीवेद शास्त्रें पुराणें ॥ तयाचेनि योगें समाधान बाणें ॥
तयालागिं हें सर्व चांचल्य दीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥

॥ ३९ ॥

मना पाविजे सर्व ही सूख जेथें ॥ अती आदरें ठेविजे लक्ष्य तेथें ॥
विवेकें कुडी वासना पालटीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥

॥ ४० ॥

बहू हिंडतां सूख होणार नाहीं ॥ शिणावें परी नातुडे हीत कांहीं ॥
विचारें बरा अंतरीं बोध कीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥

॥ ४१ ॥

बहूतां परी हें चि आतां धरावें ॥ रघूनायका आपुलेंसें करावें ॥
दिनानाथ हा तोडरीं ब्रीद गाजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥

॥ ४२ ॥

मना सज्जना एक जीवीं धरावें ॥ जनीं आपुलें हीत तूवां करावें ॥
रघूनायकावीण बोलों न कोहो ॥ सदां मानसीं हा निजध्यास राहो ॥

॥ ४३ ॥

मना रे जनीं मौन मुद्रा धरावी ॥ कथा आदरें राघवाची करावी ॥
सदा राम नि:काम चिंतीत जावा ॥ ...

सेउमतें धाम सोडोनि धावें ॥ सुखालागिं आरण्य सेवीत जावें ॥ ४४ ॥

जयाचेनिसंगेंसमाधानभंगे॥ अहंताअकस्मातयेऊनिलागे॥
तथासंगतीचीजनीकोणगोडी॥ जियेसंगतीनेंमतीरामसोडी॥
॥ ४५॥
मनाजेघडीराघवावीणगेली॥ जगींतेतुवांआपुलीहानिकेली॥
रघूनायकावीणतोव्हीणआहे॥ जनींदक्षतोलक्ष्यलावूनिपाहे॥
॥ ४६॥
मनालोचनींश्रीहरीतोचिपाहें॥ जनींजाणताभक्तहोऊनिराहें॥
गुणींप्रीतलागोक्रमूसाधनाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ४७॥
सदांदेवकाजींझिजेदेहज्याचा॥ सदारामनामें वदेनित्यवाचा॥
स्वधर्मेंचिचालेसदाउत्तमाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ४८॥
सदांबोलण्यासारखेंचालताहे॥ अनेकींसदांएकदेवासिंपाहे॥
सगूणीभजेलेशनाहींभ्रमाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ४९॥
नसेअंतरींकामनानाविकारी॥ उदासीनतोतापसीब्रह्मचारी॥
निवालामनींलेशनाहींतमाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ५०॥
मदेंमत्सरेंसांडिलीस्वार्थबुद्धी॥ प्रपंचीकनाहींजयातेंउपाधी॥
सदांबोलणेंनम्रवाचासुवाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ५१॥
क्रमीवेळजोतत्वचिंतानुवादें॥ नलिंपेकदादंभवादें विवादें॥
करीसूखसंवादजोऊगमाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥
॥ ५२॥
सदाआर्जवीप्रीयजोसर्वलोकीं॥ सदासर्वदासत्यवादीविवेकी॥
नबोलेकदामिथ्यवाचात्रिवाचा॥ जगींधन्यतोदाससर्वोत्तमाचा॥ ५३॥

सदा सेविं आरण्य तारुण्य काळीं ॥ मिळेना कदा कल्पनेचेनि मेळीं ॥
चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा ॥ जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

॥ ५४ ॥

नसे मानसीं दुष्ट आशा दुराशा ॥ वसे अंतरीं प्रेमपाशा पिपाशा ॥
ऋणी देव हा भक्ति भावें जयाचा ॥ जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

॥ ५५ ॥

दिनाचा दयाळू मनाचा मवाळू ॥ स्नेहाळू कृपाळू जगीं दास पाळू ॥
जया अंतरीं क्रोध संताप कैंचा ॥ जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

॥ ५६ ॥

जगीं होइजे धन्य या रामनामें ॥ क्रिया भक्ति उपासना नित्य नेमें ॥
उदासीनता तत्वता सार आहे ॥ सदा सर्वदा मोकळी वृत्ति [illegible] ॥

॥ ५७ ॥

नको वीषयीं वासना वृत्ति रूपें ॥ पदार्थीं जडे कामना [illegible] ॥
सदा राम निष्काम चित्तीं वसावा ॥ मनीं कल्पना लेश तो ही नसावा ॥

॥ ५८ ॥

मना कल्पितां कल्पितां कल्पकोटी ॥ नव्हे रे नव्हे सर्वथा राम भेटी ॥
मनीं कामना राम नाहीं जयाला ॥ अती आदरें प्रेम नाहीं तयाला ॥

॥ ५९ ॥

मना राम कल्पतरू कामधेनू ॥ निधी सार चिंतामणी काय वानूं ॥
जयाचेनि योगें घडे सर्व सत्ता ॥ तया साम्यता काय सी कोण आतां ॥

॥ ६० ॥

उभा कल्पवृक्षातळीं दुःख वाहे ॥ तया अंतरीं सर्वदा तेंचि राहे ॥
जनीं सज्जनीं वाद हा वाढवावा ॥ पुढें मागुती शोक जीवीं धरावा ॥

॥ ६१ ॥

निजध्यास तो सर्व तुटोनि गेला ॥ बळें अंतरीं शोक संताप ठेला ॥
सुखानंद स्वानंद भेदें बुडाला ॥ मनानिश्चयो सर्व खेदें उडाला ॥ ६२.

घरींकामधेनू पुढें ताक मागे ॥ हरीबोधसांडोनिवीवादिलागे ॥
करीसारचिंतामणी काचखंडें ॥ तयामागतां देत असे उदंडें ॥

॥ ६३ ॥

अतीमूढत्यादृढबुद्धीअसेना ॥ अतीकामत्यारामचित्तीं वसेना ॥
अतीलोभत्याक्षोभहोईलजाणा ॥ अतीवीषयीसर्वदादैन्यवाणा ॥

॥ ६४ ॥

नकोदैन्यवाणेंजिणेंभक्तिवीणें ॥ अतीमूर्खत्यासर्वदा दुःखदेणें ॥
धरीरेमना आदरेंप्रीतिरामीं ॥ नकोवासनाहेमधामीं विरामीं ॥

॥ ६५ ॥

नव्हेसारसंसार हा घोर आहे ॥ मनासज्जना सर्वशोधोनिपाहें ॥
जनींवीषखातांपुढेंसौख्यकैचें ॥ धरीरेमनाध्यानया राघवाचें ॥

॥ ६६ ॥

घनश्यामहाशामलावण्यरूपी ॥ महाधीरगंभीरपूर्णप्रतापी ॥
करीशोवटीसेवकाचा कुडावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ६७ ॥

बळेंआगळारामकोदंडधारी ॥ महाकाळविक्राळतोहीथरारी ॥
पुढेंमानवाकिंकराकोण केवा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ६८ ॥

सुखानंदकारी निवारीभयातें ॥ जनीं भक्तिभावेंभजावें तयातें ॥
विवेकेंत्यजावाअनाचारहेवा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीतजावा ॥

॥ ६९ ॥

सदारामनामेंवदापूर्णकामें ॥ कदाबाधिजेनापदानित्यनेमें ॥
मदालस्यहासर्वसोडोनिद्यावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ७० ॥

जयाचेनिनामेंम[illegible]जाती ॥ जयाचेनिनामेंगती पाविजेती ॥
जयाचे[illegible]चिंतीत जा[illegible]७१ ॥

नवेंचेकधींग्रंथिंचा अर्थ कांहीं ॥ मुखेंनामउच्चारितांकष्ट नाहीं ॥
महाघोरसंसार शत्रुजिणावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीत जावा ॥

॥ ७२ ॥

देहदंडणाचेंमहादुःखआहे ॥ महादुःखतें नाम घेतां नगहे ॥
सदाशीवचिंतीतसेदेवदेवा ॥ प्रभातेमनींरामचिंतीत जावा ॥

॥ ७३ ॥

बहूतांपरीसंकटेंसाधनाचीं ॥ व्रतेंदानउद्यापनेंतीं धनाचीं ॥
दिनाचादयाळूमनीं आठवावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ७४ ॥

समस्तांमधेंसारसाचार आहे ॥ कळेनातरीसर्व शोधोनिपाहें ॥
मनासंशयो वाउगा तो त्यजावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ७५ ॥

नव्हेकर्मनाधर्मनायोगकांहीं ॥ नव्हेभोगनात्यागना सांगकांहीं ॥
ह्मणेदासविश्वासनामी धरावा ॥ प्रभातेमनींरामचिंतीतजावा ॥

॥ ७६ ॥

करीकामनिष्कामयाराघवाचें ॥ करीरूपस्वरूपसर्वां जिवांचें ॥
करीछंदनिर्द्वंदहे गूण गातां ॥ धरीकीर्तनीं वृत्तिविश्वासहोतां ॥

॥ ७७ ॥

अहोज्यानराराम विश्वास नाहीं ॥ तयापामराबाधिजेसर्वकांहीं ॥
महाराजतोस्वामिकैवल्यदाता ॥ वृथावाहणेंदेहसंसारचिंता ॥

॥ ७८ ॥

मनापावनाभावनाराघवाची ॥ धरीअंतरींसोडिचिंताभवाची ॥
भवाचेभयेंमानवाभूलठेली ॥ नसेवस्तुचीधारणाव्यर्थ गेली ॥

॥ ७९ ॥

धरीश्रीवरा त्याहरा अंतरातें ॥ तरादुस्तरा त्यापरा सागरातें ॥
सराश्रीवरा त्याभरादुर्भरातें ॥ करानीकुरा त्याखरामत्सरातें ॥ ८० ॥

मनामत्सरें नाम सोडूं नकोहो ॥ अतीआदरें हानिजध्यास राहो ॥
समस्तांमतें नामतें सार आहे ॥ दुजी तूळणा तूळितां तें नम्राहे ॥

॥ ८१ ॥

बहूनामयां रामनामीं तुळेना ॥ अभाग्या नरा पामरा हे कळेना ॥
विषा औषध घेतलें पार्वतीशें ॥ जिवा मानवा किंकरा कोपांपूसे ॥

॥ ८२ ॥

जेणें जाळिला काम तो राम ध्यातो ॥ उमेशीं अतीआदरें गूण गातो ॥
बहूज्ञान वैराग्य सामर्थ्य जेथें ॥ परी अंतरीं राम विश्वास तेथें ॥

॥ ८३ ॥

विठोने शिरीं वाहिला देवराणा ॥ तया अंतरीं ध्यास रे त्यासि नेणा ॥
निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी ॥ जिवा सोडवी राम हा अंतकाळीं ॥

॥ ८४ ॥

भजा राम विश्राम योगेश्वराचा ॥ जपाने मिलानेम गौरी हराचा ॥
निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी ॥ तुम्हां सोडवी राम हा अंतकाळीं ॥

॥ ८५ ॥

मुखीं राम विश्राम तेथेंचि आहे ॥ सदानंद आनंद शोधोनि पाहें ॥
तयावीण तो शीण संदेहकारी ॥ निजध्यास तो शोक संताप हारी ॥

॥ ८६ ॥

मुखीं नाम त्या काम बाधूं शकेना ॥ गुणी इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना ॥
हरीभक्त तो शत्रुकामासि मारी ॥ जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥

॥ ८७ ॥

बहू चांगलें नाम या राघवाचें ॥ अतीसाजिरें स्वल्प सोपें फुकाचें ॥
करीं मूळ निर्मूळ घेतां भवाचें ॥ जिवा मानवा हें चि कैवल्य साचें ॥

॥ ८८ ॥

जनीं भोजनीं नाम वाचे वदावें ॥ अतीआदरें नामघोषें म्हणावें ॥
हरीचिंतनीं अन्न सेवीत जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥ ८९ ॥

नयेरामवाणीतया थोर हानी ॥ जनींव्यर्थप्राणीतयानामकर्णी ॥
हरीनाम हें वेदशास्त्रीं पुराणीं ॥ बहूआगळी बोलिलीवेदवाणी ॥
॥ ९० ॥
नकोवीटमानूंरघूनायकाचा ॥ अतीआदरेंबोलिजेरामवाचा ॥
नवेंचे मुखींसांपडेरे फुकाचा ॥ कराघोषत्याजानकीवल्लभाचा ॥
॥ ९१ ॥
अतीआदरेंसर्वहीनामघोषें ॥ गिरीकंदरीं जाइजे दूर देशें ॥
हरी तुष्टला तोषलानाम घोषें ॥ विशेषेंहरी मानसीं रामपीसें ॥
॥ ९२ ॥
जगींपाहतांरामहाअन्नदाता ॥ तयालागिंहोनत्वतांसारचिंता ॥
तयाचे मुखींनामघेतांफुकाचें ॥ मनासांगपांरे तुझेंकायवेंचे ॥
॥ ९३ ॥
तिन्हीलोक जाळूंशके कोपयेतां ॥ निवालाहरूतोमुखींनामघेतां ॥
जपेआदरेंपार्वतीविश्वमाता ॥ ह्मणोनीह्मणातेंचिहें नाम आतां ॥
॥ ९४ ॥
अजामीळपापी वदेपुत्रकामें ॥ तयामुक्ति नारायणाचेनि नामें ॥
शुकाकारणें कुंटिणी रामवाणी ॥ मुखींबोलतांख्याति झालीपुराणीं ॥
॥ ९५ ॥
महाभक्तप्रल्हादहादैत्यकुळीं ॥ जपेरामनामावळीनित्यकाळीं ॥
पितापापरूपी तयादेखवेना ॥ जनींदैत्यतो नाम मूखें ह्मणोनी ॥
॥ ९६ ॥
मुखींनामनाहींतयामुक्ति कैंची ॥ अहंतागुणीं यातनाते फुकाची ॥
पुढें अंतयेईलतोदैन्यवाणा ॥ ह्मणोनी ह्मणारे ह्मणा देवराणा ॥
॥ ९७ ॥
हरीनामनेंमस्तपाषाणतारी ॥ बहूतारिलेमानवी देह धारी ॥
तयारामनामींसदाजोविकल्पी ॥ वदेनाकदाजीवतो पापरूपी ॥ ९८

जगीं धन्य वाराणशी पुण्यराशी ॥ तयेमाजि जातां गती पूर्वजांसी ॥
मुखीं रामनामावळी नित्यकाळीं ॥ जिवाहीत सांगे सदा चंद्रमौळी ॥

॥ ९९ ॥

यथासांग रे कर्म तेंही घडेना ॥ घडे कर्म तें पुण्य गांठी पडेना ॥
दया पाहतां सर्व भूतीं असेना ॥ फुकाचे मुखीं नाम तेंही वसेना ॥

॥ १०० ॥

जया नावडे नाम त्या यमजाची ॥ विकल्पें उठे तर्क त्या नर्क छी छी ॥
ह्मणोनी अती आदरें नाम घ्यावें ॥ मुखीं बोलतां दोष जाती स्वभावें ॥

॥ १०१ ॥

अतीलीनता सर्व भावें स्वभावें ॥ जना सज्जना लागिं संतोषवावें ॥
देहकारणीं सर्व लावीत जावें ॥ सगूणीं अती आदरें सीं भजावें ॥

॥ १०२ ॥

हरीकीर्तनीं प्रीतिभावें धरावी ॥ देहबुद्धि नीरूपणीं वीसरावी ॥
परद्रव्य आणीक कांता परावी ॥ यदर्थीं स्वयें सांडजीवीं करावी ॥

॥ १०३ ॥

क्रियेवीण नानापरी बोलिजे तें ॥ परी चित्त दुश्चित्त तें लाजवी तें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे ॥ तया मानवा देव कैसेनि पावे ॥

॥ १०४ ॥

विवेकें क्रिया आपुली पालटावी ॥ अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ॥
जगीं बोलण्यासारिखें चाल बापा ॥ मनीं कल्पना सोड संसारतापा ॥

॥ १०५ ॥

बरी स्नानसंध्या करीं एकनिष्ठा ॥ विवेकें मना आवरीं स्थानभ्रष्टा ॥
दया सर्व भूतीं जया मानवाला ॥ सदा प्रेमळू भक्ति भावें निवाला ॥

॥ १०६ ॥

मना कोप आरोपणा ते नसावी ॥ मना बुद्धि हे साधुसंगें वसावी ॥
मना नष्ट चांडाळ तो संग त्यागीं ॥ मना होय रे मोक्षभोगी विभागी ॥

सदा सर्वदा मज्जनाचे नियोगें ॥ क्रियापालटे भक्तिभावार्थ लागें ॥
क्रियेवीण वाचाळता ते निवारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥

॥ १०८ ॥

जनीं वाद संवाद सोडोनि द्यावा ॥ जनीं सूख संवाद सूखें करावा ॥
जनीं तो चिती शोक संताप हारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥

॥ १०९ ॥

तुटे वाद संवाद त्यातें ह्मणावें ॥ विवेकें अहंभाव त्यातें जिणावें ॥
अहंतागुणें वाद नाना विकारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥

॥ ११० ॥

हिताकारणें बोलणें सत्य आहे ॥ हिताकारणें सर्व शोधोनि पाहें ॥
हिताकारणें बंड पाखंड वारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥

॥ १११ ॥

जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ॥ परी वाद वीवाद तैसाचि ठेला ॥
उठे संशयो वाद हा दंभ भारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥

॥ ११२ ॥

जनीं हीत पंडीत सांगोनि गेले ॥ अहंतागुणें ब्रह्मराक्षस झाले ॥
तयांहून व्युत्पन्न तो कोण आहे ॥ मना सर्व जाणीव सोडोनि राहें ॥

॥ ११३ ॥

तुटे वाद संवाद तेथें करावा ॥ विवेकें अहंभाव हा पालटावा ॥
जनीं बोलण्यासारिखें आचरावें ॥ क्रियापालटे भक्तिपंथें चि जावें ॥

॥ ११४ ॥

फुकाचे मुखीं बोलतां काय वेंचे ॥ दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ॥ विचारीं मना तूं चि शोधूनि पाहें ॥

॥ ११५ ॥

बहू शापितां कष्टला अंबऋषी ॥ तयाचे स्वयें श्रीहरी जन्म सोशी ॥
दिल्हा क्षीरसिंधू तया ऊपमानी ॥ नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ ११६

ध्रुवलेंकरूं बापुडें दैन्यवाणें॥ कृपाभाकितां दीधलीभेट जेणें॥
चिरंजीवतारांगणीप्रेमरवाणी॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ ११७ ॥

गजेंद्रमहासंकटीं वाटपाहे॥ तया कारणेंश्रीहरी धांवताहे॥
उडीघातलीजाहलाजीवदानीं॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ ११८ ॥

अजामीळपापी तयाअंतआला॥ कृपाळूपणे तोजनीं मुक्तकेला॥
अनाथासिआधारहाचक्रपाणी॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ ११९ ॥

विधीकारणेंजाहलामत्स्यवेगीं॥ धरीकूर्मरूपीं धरा पृष्ठ भागीं॥
जनारक्षणा कारणे नीचयोनी॥ नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ १२० ॥

महाभक्त प्रल्हाद हाकरवीला॥ ह्मणोनीतयाकारणें सिंह झाला॥
नयेज्वाळवीशाळ सन्नीध कोणी॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ १२१ ॥

कृपा भाकिताजाहलावज्रपाणी॥तयाकारणेंवामनचक्रपाणी॥
द्विजाकारणें भार्गवचापपाणी॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ १२२ ॥

अहिल्यासतीलागि आरण्यपंथें॥ कुडावापुढेंदेववंदीतयातें॥
बळेंसोडितांघावघालीनिशाणीं॥ नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ १२३ ॥

तयाद्रौपदी कारणें लागवेगें॥ त्वरेंधांवतोसर्वसोडोनिमागें॥
कलीलागिंझालाअसेबौद्धमौनी॥नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥

॥ १२४ ॥

अनाथांदिनाकारणेंजन्मताहे॥कलंकीपुढें देवहोणार आहे॥
तयावर्णितांशीणलीवेदवाणी॥ नुपेक्षीकदारामदासाभिमानी॥१२५

जनाकारणें देवलीलावतारी॥ बहुतांपरी आदरें वेषधारी ॥
तयानेणती ते जनी पापरूपी ॥ दुरात्मे महा नष्ट चांडाळ पापी ॥
॥ १२६ ॥
जगीं धन्य तो राममूखीं निवाला ॥ कथा ऐकतां सर्व तल्लीन झाला ॥
देहभावना राम बोधें उडाली ॥ ॥ मनावासना राम रूपीं निवाली ॥
॥ १२७ ॥
गती कारणें संगती सज्जनाची ॥ मती पालटे सूमती दुर्जनाची ॥
रतीनायकाचा पती नष्ट आहे ॥ ह्मणोनी मनातीत होवोनि राहें ॥
॥ १२८ ॥
मना अल्प संकल्प तोही नसावा ॥ मना सत्य संकल्प चित्ती वसावा ॥
जनी कल्प वी कल्प तोही त्यजावा ॥ रमाकांत एकांत काळीं भजावा ॥
॥ १२९ ॥
मना वासना वासुदेवीं वसोंदे ॥ मना कामना कामसंगीं नसोंदे ॥
मना कल्पना वाउगी ते नकीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥
॥ १३० ॥
भजाया जनीं पाहतां राम एक ॥ करीबाण एक मुखीं शब्द एक ॥
क्रिया पाहतां उद्धरी सर्व लोक ॥ धरा जानकी नायकाचा वि वेक ॥
॥ १३१ ॥
विचारूनि बोले विवंचूनि चाले ॥ तयाचेनि संतप्त तेही निवाले ॥
बरें शोधिल्यावीण बोलों नये हो ॥ जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो ॥
॥ १३२ ॥
हरीभक्त वीरक्त विज्ञान राशी ॥ जेणें मानसीं स्थापिलें निश्चयासीं ॥
तयादर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे ॥ तया भाषणें नष्ट संदेह मोडे ॥
॥ १३३ ॥
नसे गर्व अंगीं सदा वीतरागी ॥ क्षमा शांति भोगी दयादक्ष योगी ॥
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्य वाणा ॥ अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥ १३४.

धरीरे मना संगती सज्जनाची ॥ जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥
बळें भाव हा वृत्ति सन्मार्ग लागे ॥ महाक्रूर तो काळ विक्राळ भंगे ॥
॥ १३५ ॥
भयें व्यापिलें सर्व ब्रह्मांड आहे ॥ भयाभीत ते संत आनंत पाहें ॥
जया पाहतां द्वैत कांहीं दिसेना ॥ तया मानसीं सर्वथा हे वसेना ॥
॥ १३६ ॥
जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ॥ परी जीव अज्ञान तैसेंचि ठेले ॥
देहबुद्धिचा निश्चयो त्यां ढळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥
॥ १३७ ॥
भ्रमें नाडिलें वित्त तें गुप्त झालें ॥ जिवा जन्मदारिद्र्य ठाकूनि आलें ॥
देहबुद्धिचें कर्म खोटें टळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥
॥ १३८ ॥
पुढें पाहतां सर्वही कोंदलेंसे ॥ अभाग्यास नर दृढ पाषाण भासे ॥
अभावें कदा पुण्य कांहीं फळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥
॥ १३९ ॥
जयाचें तया चूकलें प्राप्त नाहीं ॥ गुणें गोंवलें जाहलें दुःख देहीं ॥
गुणें वेगळी वृत्ति तेही वळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥
॥ १४० ॥
ह्मणे दास सायास त्याचे करावे ॥ जगीं जाणता पाय त्याचे धरावे ॥
गुरू अंजनें वीण तें आकळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥
॥ १४१ ॥
कळेना चळेना वळेना ढळेना ॥ ढळेना ढळे संशयो ही ढळेना ॥
गळेना गळेना अहंता गळेना ॥ बळें आकळेना मिळेना मिळेना ॥
॥ १४२ ॥
अविद्यागुणें मानवा ऊमजेना ॥ भ्रमें चूकलें हीत तें पाविजेना ॥
परीक्षेविना बांधिलें दृढ नाणें ॥ परी सत्य मिथ्या असें कोण जाणे ॥ १४३

जगीं पाहतां साचतें काय आहे ॥ अती आदरें सर्व शोधोनि पाहें ॥
पुढें पाहतां पाहतां देव जोडे ॥ भ्रमभ्रांति अज्ञान हें सर्व मोडे ॥

॥ १४४ ॥

सद्भावीषयाचिंतितां जीव गेला ॥ अहंभाव अज्ञान जन्मासि आला ॥
विवेकें सदा स्वस्वरूपीं भजावें ॥ जिवा ऊगमीं जन्म नाहीं स्वभावें ॥

॥ १४५ ॥

दिसे लोचनीं तें नसे कल्पकोडी ॥ अकस्मात आकारलें सर्व मोडी ॥
पुढें सर्व जाईल कांहीं न राहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥

॥ १४६ ॥

तुटेना फुटेना चळेना वळेना ॥ सदां संचलें मीपणें आकळेना ॥
तया एक रूपासि दूजें नसाहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥

॥ १४७ ॥

निराकार आकार ब्रह्मादिकांचा ॥ जया सांगतां शीणली वेदवाचा ॥
विवेकें तदाकार होवोनि राहें ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥

॥ १४८ ॥

जगीं पाहतां चर्मचक्षूनि लक्षी ॥ जगीं पाहतां ज्ञानचक्षु निरीक्षी ॥
जगीं पाहतां पाहणें जात आहे ॥ मना संत आनंत शोधूनि पाहें ॥

॥ १४९ ॥

नसे पीत ना श्वेत ना श्याम कांहीं ॥ नसे व्यक्त अव्यक्त नाहींच कांहीं ॥
ह्मणे दास विश्वासतां मुक्ति लाहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥

॥ १५० ॥

खरें शोधितां शोधितां शोधिताहे ॥ मना बोधितां बोधितां बोधिताहे ॥
परी सर्व ही सज्जनाचे नियोगें ॥ बरा निश्चयो पाविजे सानुरागें ॥

॥ १५१ ॥

मनीं निर्मिला देव तो ओळखावा ॥ जया पाहतां मोक्ष तत्काळ जीवा ॥
तया निर्गुणालागिं गूणी करावें ॥ जगीं संग सोडोनि सूखी रहावें ॥

नव्हेकार्यकर्ता नव्हे सृष्टिकर्ता ॥ पराहूनिपर्ता नलिंपे विवर्ता ॥
तयानिर्विकल्पासि कल्पीत जावें ॥ जनींसंगसोडोनि सूखी रहावें ॥

॥१५३॥

बहूतांपरी कूसरी तत्वझाडा ॥ परी अंतरीं पाहिजे तो निवाडा ॥
मनासारसाचार तें वेगळेंरे ॥ समस्तांमधें नामतें आगळेंरे ॥

॥१५४॥

नव्हे पिंडज्ञानें नव्हे तत्वज्ञानें ॥ समाधान कांहीं नव्हे तानमानें ॥
नव्हे योगयोगें नव्हे भोगत्यागें ॥ समाधानतें सज्जनाचे नियोगें ॥

॥१५५॥

महावाक्यतत्वादिकें पंचिकर्णे ॥ खुणें पाविजे संतसंगें विवर्णे ॥
द्वितीयेससंकेत जोदाविजेतो ॥ तयासांडुनीचंद्रमा भाविजेतो ॥

॥१५६॥

दिसेनाजनीं तेंचि शोधोनि पाहें ॥ बरें पाहतां गूजतेथेंचि आहे ॥
करें घेउंजातां कदां आढळेना ॥ जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना ॥

॥१५७॥

ह्मणे जाणता तो मनीं मूर्ख आहे ॥ अतर्क्यासतर्कीअसाकोणआहे ॥
जनीं मीपणें पाहतां पाहवेना ॥ तया पाहतां वेगळें राहवेना ॥

॥१५८॥

बहू शास्त्र धुंडाळितां वाड आहे ॥ जनीं निश्चयो एकतोहीनसाहे ॥
मती भांडती शास्त्रबोधें विरोधें ॥ गती खुंटती ज्ञानबोधें विरुद्धें ॥

॥१५९॥

श्रुतीन्यायमीमांसका तर्कशास्त्रें ॥ स्मृतीवेदवेदांतवाक्यें विचित्रें ॥
स्वयें शेषमौनावला स्थीर राहे ॥ मनासर्वजाणीवसांडोनि राहें ॥

॥१६०॥

जेणें मक्षिका भक्षिली जाणिवेची ॥ तयाभोजनाचीरुचीप्रांसकेंची ॥
अहंभाव ज्यामानसींचा विरेना ॥ तयाज्ञान हें अन्नपोटीं जिरेना ॥ १६१

नकोरे नको वादहा खेद कारी ॥ नकोरे नको भेद नाना विकारी ॥
न कोरे मना शीकवूं पूढिलांसी ॥ अहंभावजो राहिला तूजपासीं ॥
॥ १६२ ॥
अहंतागुणें सर्वही दुःख होतें ॥ मुखें बोलिलें ज्ञानतें व्यर्थ जातें ॥
सुखें शहतां सर्वही सूख आहे ॥ अहंता तुझी तूंचि शोधोनि पाहें ॥
॥ १६३ ॥
अहंतागुणें नीतिसांडी विवेकी ॥ अनीतीबळें श्लाघ्यता सर्व लोकीं ॥
परी अंतरीं सर्वही साक्षयेते ॥ प्रमाणांतरीं बुद्धि सांडूनि जाते ॥
॥ १६४ ॥
देहबुद्धिचा निश्चयो दृढ झाला ॥ देहातीत तें हीत सांडीत गेला ॥
देहबुद्धिते आत्मबुद्धी करावी ॥ सदासंगती सज्जनाची धरावी ॥
॥ १६५ ॥
मनींकल्पिलाधीषयोसोडवावा ॥ मनेंदेवतो निर्गुणें वोळखावा ॥
मनेंकल्पितां कल्पनाते सरावी ॥ सदासंगतीसज्जनाची धरावी ॥
॥ १६६ ॥
देहादीकप्रापंचहाचिंतियेला ॥ परीअंतरीं लोभनिश्चीत ठेला ॥
हरीचिंतनेंमुक्तिकांतावरावी ॥ सदासंगतीसज्जनाचीधरावी ॥
॥ १६७ ॥
अहंकारविस्तारलायादेहाचा ॥ स्त्रियापुत्रमित्रादिकायामोहाचा ॥
बळेंभ्रांति हे जन्मचिंताहरावी ॥ सदासंगती सज्जनाची धरावी ॥
॥ १६८ ॥
बरानिश्चयोशाश्वताचाकरावा ॥ म्हणेदाससंदेह तोनीरसावा ॥
घडीनेघडीसार्थकाची करावी ॥ सदासंगतीसज्जनाची धरावी ॥
॥ १६९ ॥
करीवृत्तिजो संततो संतजाणा ॥ दुराशागुणेंजोनव्हे दैन्य वाणा ॥
उगा धीदेहबुद्धितें वाढवीतो ॥ परीसज्जनाकेविंबाधूं शकेतो ॥ १७०

नसे अंत आनंत संता पुसावा॥ अहंकारविस्तारला नीरसावा॥
गुणेवीणानिर्गूणतो आठवावा॥ देहबुद्धिचा आठवो नाठवावा॥

॥ १७१ ॥

देहबुद्धिते स्वामिबो धेंत्यजावी॥ विवेकें तयावस्तुची भेट घ्यावी॥
तदाकारहे वृत्तिनाहीं स्वभावें॥ म्हणोनीसदातेंचिशोधीतजावें॥

॥ १७२ ॥

असेसारसाचार तें चोरिलेंसे॥ इहींलोचनीं पाहतां दृश्य भासे॥
निराभासनिर्गूणतें आकळेना॥ अहंतागुणे कल्पितांही कळेना॥

॥ १७३ ॥

स्फुरे वीषयींकल्पना ते अविद्या॥ स्फुरेब्रह्मरे जाणमायासुविद्या॥
मुळीं कल्पनादोरुपीं तेचिझाली॥ विवेकेंतरीस्वस्वरूपीं निमाली॥

॥ १७४ ॥

स्वरूपीं उदेला अहंकार राहो॥ तेणेंसर्वआच्छादिलें व्योमपाहो॥
दिशापाहतांनानिशीवाढताहे॥ विवेकें विचारें विंचूनि पाहें॥

॥ १७५ ॥

जयाचक्षुनें लक्षितां लक्षवेना॥ भवाभक्षितांरक्षितां रक्षवेना॥
भयाभीततो अक्षयी मोक्षदेता॥ तयादक्षसाक्षी असेपक्षघेता॥

॥ १७६ ॥

विधीनिर्मितां लीहितो सर्वभाळीं॥ परीलीहितो कोणत्याचेकपाळीं॥
हरूजाळितो लोकसंहारकाळीं॥ परीशेवटीं शंकरा कोण जाळी॥

॥ १७७ ॥

जगींद्वादशादित्य तेरुद्र अक्रा॥ असंख्यातसंख्याकरीकोणशक्रा॥
जनीदेवधुंडाळितां आढळेना॥ जगींमुख्यतोकोण कैसा कळेना॥

॥ १७८ ॥

फुटेना तुटेना कधीं देवराणा॥ चळेनाढळेना कदादैन्य बाणा॥
कळेनाकळेनाकदालोचनासी॥ असेनादिसेनाजनामींपणासी॥ १७९

जयामानलादेवतोपूजिताहे ॥ परीदेवशोधोनि कोणी नपाहे ॥
जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी ॥ जयामानली भक्ति जेनेचिमोठी ॥
॥ १८० ॥
तिन्ही लोक जेथूनि निर्माणझाले ॥ तयादेवरायासि कोणी नबोले ॥
जगीं थोरूलादेवतो चोरिलासे ॥ गुरूवीण तो सर्वथाही नदीसे ॥
॥ १८१ ॥
गुरूपाहतां लक्षकोट्यानुकोटी ॥ बहूसाल मंत्रावळी भक्ति मोठी ॥
मनाकल्पनाचेटकें घात पाता ॥ जनीं व्यर्थरे तो नव्हे मुक्ति दाता ॥
॥ १८२ ॥
नव्हे चेटकू बाळकू द्रव्य भोंदू ॥ नव्हे निंदकू मत्सरू भक्ति मंदू ॥
नव्हे उन्मतू व्यसनी संगबाधू ॥ जगींज्ञानियातोचिसाधूअगाधू ॥
॥ १८३ ॥
नव्हेवाउगीचाउटी कामपोटीं ॥ क्रियेवीणवाचाळतातेचिमोठी ॥
मुखीबोलिल्यासारिखेंचालताहे ॥ मनासद्गुरूतोचिशोधूनिपाहें ॥
॥ १८४ ॥
जनीभक्तज्ञानी विवेकी विरागी ॥ कृपाळूमनस्वीक्षमावंत योगी ॥
प्रभूदक्षव्युत्पन्न चातुर्य जाणे ॥ तयाचेनियोगेंसमाधान बाणे ॥
॥ १८५ ॥
नव्हे तेंचिझालें नसे तेंचि आलें ॥ कळोंलागलेंसज्जनाचेनि बोलें ॥
अनिर्वाच्य तें वाच्यवाचेवदावें ॥ मनासंतआनंत शोधीत जावें ॥
॥ १८६ ॥
लपावें अती आदरेंरामरूपीं ॥ भयातीतनिश्चिंत येस्वस्वरूपीं ॥
कदातोजनीं पाहतांही दिसेना ॥ सदाऐक्य तें भिन्नभावें वसेना ॥
॥ १८७ ॥
सदासर्वदारामसन्नीधआहे ॥ मनासज्जनासत्यशोधोनिपाहें ॥
अखंडीतभेटी रघूराजयोगू ॥ मनासांडरेमीपणाचावियोगू ॥ १८८ ॥

भुतें पिंडब्रह्मांड हें ऐक्य आहे ॥ परीसर्वथा स्वस्वरूपीं नसाहे ॥
मना भासलें सर्व कांहीं पहावें ॥ परी संगसोडोनि सूखी रहावें ॥
॥ १८९ ॥

देहभान हें ज्ञान शास्त्रें खुडावें ॥ विदेहीपणें भक्ति पंथेंचि जावें ॥
विवेकाबळें निंद्यसर्वी त्यजावें ॥ अती आदरें सज्जनातें भजावें ॥
॥ १९० ॥

देहबुद्धिचा निश्चयो ज्या ढळेना ॥ तया ज्ञान कल्पांत काळीं कळेना ॥
परब्रह्म तें मीपणें आकळेना ॥ मनीं शून्य अज्ञान हें मावळेना ॥
॥ १९१ ॥

मनाना कळेना ढळे रूप ज्याचें ॥ दुजेवीण तें ज्ञान सर्वोत्तमाचें ॥
तयावीण तें हीण दृष्टांत पाहे ॥ तेथें संग निःसंग दोन्हीन साहे ॥
॥ १९२ ॥

नव्हे जाणता नेणता देव राणा ॥ नये वर्णितां वेद शास्त्रां पुराणां ॥
नव्हे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा ॥ श्रुती नेणती नेणती अंत ज्याचा ॥
॥ १९३ ॥

जया मुक्तिची वासना पूर्ण आहे ॥ तयाची गुरूचे पदीं वृत्ति राहे ॥
लयें लक्षितां ते स्वरूपीं सरावें ॥ स्वयंज्योति पूर्णप्रकाशें स्वभावें ॥
॥ १९४ ॥

वसे मानसीं देव तो कोण कैसा ॥ पुसे साधकू आदरें प्रश्न जैसा ॥
देह टाकितां देव कोठें रहातो ॥ अहं मागुता ठाव कोठें पहातो ॥
॥ १९५ ॥

वसे हृदयीं देव तो जाण ऐसा ॥ नभाचे परी व्यापकू सर्व तैसा ॥
सदा संचला येत ना जात कांहीं ॥ तयावीण कोठें रिता ठाव नाहीं ॥
॥ १९६ ॥

नभासारिखें रूप धारा घवाचें ॥ मनीं चिंतितां मूळ तूटे भवाचें ॥
तया पाहतां देहबुद्धी उरेना ॥ सदा सर्वदा आर्त पोटीं पुरेना ॥ १९७ ॥

नभें व्यापिलें सर्व सृष्टीस आहे ॥ रघूनायका उपमा ते नसाहे ॥
दुजेवीण जो तोचि तो हा स्वभावें ॥ तया व्यापकू व्यर्थ कैसें ह्मणावें ॥

॥ १९८ ॥

नभीं वावरे जो अणू रेणु कांहीं ॥ रिता ठाव या राघवा वीण नाहीं ॥
तया पाहतां पाहतां तेंचि झालें ॥ तेथें लक्ष्य आलक्ष्य सर्व ही बुडालें ॥

॥ १९९ ॥

अती जीर्ण विस्तीर्ण तें रूप आहे ॥ तेथें तर्क संपर्क तो ही नसाहे ॥
अती गूढ तें दृढ तात्काळ सोपें ॥ दुजेवीण ते खूण स्वामी प्रतापें ॥

॥ २०० ॥

मनीं हूनियां दाविला सर्व हेवा ॥ सदा सर्वदा आचरी नीचसेवा ॥
गुरूचे घरीं झाडितो सारवीतो ॥ मला तो गमे भूतकीं चार वीतो ॥

॥ २०१ ॥

भवापासुनी सद्गुरु तारिं बापा ॥ सदा सौख्य दे छेदुनी पुण्य पापा ॥
धरी कास मीं दास तूझा दयाळा ॥ दिना रक्षितूं दीनबंधू कृपाळा ॥

॥ २०२ ॥

पदात्वंपदातसदा कांहिं नेणें ॥ तुवां बोधिलें ध्यान तें एक जाणें ॥
खटाटोप आटोप टाकूनि राहें ॥ त्रिकाळीं सदा पाय तूझेचि पाहें ॥

॥ २०३ ॥

नजाये जपासी न जाये तपासी ॥ नजाये त्रिकाशी न जाये गयेसी ॥
गुरुचिंतनेंवीण कोठें न जाये ॥ त्रिकाळीं सदा पाय तूझेचि पाहें ॥

॥ २०४ ॥

चळे आकळे रूप तें ज्ञान होतां ॥ तेथें आटली सर्व साक्षी अवस्था ॥
मना उन्मनी शब्द कुंठीत राहे ॥ तो घे तोचि तो राम सर्वत्र पाहें ॥

॥ २०५ ॥

कदा ओळखीमाजि दूजें असेना ॥ मनीं माजसीं द्वैत कांहीं दिसेना ॥
बहुवादि शीं आपली भेट झाली ॥ विदेहीपणें सर्व काया निवाली ॥२०६

मना गूजरे तूजला भास झालें ॥ परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥
सदा श्रवणें पाविजे निश्चयासी ॥ धरी संगती सज्जनीं धन्य होसी ॥
॥ २०७ ॥
मना संग हा सर्वसो डोनि घावा ॥ अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महादुःख भंगे ॥ जनीं साधनेवीण सन्मार्ग लागे ॥
॥ २०८ ॥
मना संग हा सर्व संगासि तोडी ॥ मना संग हा मोक्ष तत्काळ जोडी ॥
मना संग हा साधका शीघ्र जोडी ॥ मना संग हा द्वैत निःशेष मोडी ॥
॥ २०९ ॥
मना चीज्ञानें एकतां दोष जाती ॥ मती मंद ने साधना योग्य होती ॥
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं ॥ म्हणे दास विश्वास तासुक्ति भोगी ॥ २१० ॥
इति रामदास कृत मनाचे श्लोक समाप्त.



## ज्ञानदेव कृत हरिपाठ अभंग प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी ॥ तेणें मुक्तिचारी साधीये ल्या ॥ १ ॥ हरिमुखें म्हणा हरिमुखें म्हणा ॥ पुण्याची गणना कोण करी ॥ २ ॥ असोनि संसारीं जिव्हे वेग करी ॥ वेदशास्त्र उभारी बाह्य सदा ॥ ३ ॥ ज्ञानदे-

वदमणे व्यासाचिया खूण ॥ द्वारकेचा राणा पांडवांघरीं ॥ ४ ॥

॥ १ ॥

चहूं वेदीं जाण षट्शास्त्रीं कारण ॥ अठराही पुराणें हरिसीं गाती ॥ १ ॥ मंथु नीं नवनीता तैसें घे अनंता ॥ वायां व्यर्थ कथा सांडी मार्ग ॥ २ ॥ एक हरी आत्मा जीव शीव सम ॥ वायां तूं दुर्गमा न घालीं मन ॥ ३ ॥ ज्ञानदेवा पाठ हरी हा वैकुंठ ॥ भरला घनदाट हरी दीसे ॥ ४ ॥ ॥ २ ॥

त्रिगुण असार निर्गुण हें सार ॥ सारासार विचार हरीपाठ ॥ १ ॥ सगुण निर्गुणी गुणाचें अगूण ॥ हरीवीण मन व्यर्थ जाय ॥ २ ॥ अव्यक्त निराकार नाहीं ज्या आकार ॥ जेथोनी चराचर त्यासी भजे ॥ ३ ॥ ज्ञानदेवा ध्यानीं राम कृष्ण मनीं ॥ अनंत जन्मनी पुण्य होय ॥ ४ ॥ ॥ ३ ॥

भावेंवीण भक्ती भक्तिवीण मुक्ती ॥ बळेंवीण शक्ती बोलों नये ॥ १ ॥ कैसेनी दैवत प्रसन्न त्वरित ॥ उगा राहे निवांत शिणसी वायां ॥ २ ॥ सायासें करीसी प्रपंच दिननीशी ॥ हरीसी न भजसी कवण्या गूणें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे हरीसी भजणें ॥ तुटेल धरणें प्रपंचाचें ॥ ४ ॥ ॥ ४ ॥

॥ ४ ॥

योगयाग विधी येणें नोहे सिद्धी ॥ वायांची उपाधी दंभ धर्म ॥ १ ॥ भावेंवीण देव न कळे संदेह ॥ गुरुविण अनुभव कैसा कळे ॥ २ ॥ तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त ॥ गुजेवीण हीत कोण सांगे ॥ ३ ॥ ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात ॥ साधूंचे संगातें तरुणोपाय ॥ ४ ॥ ॥ ५ ॥

साधूबोध झाला नुरोनियां ठेला ॥ ठायींच मूराला अनूभव ॥ १ ॥ कापूराची वाती उजळली ज्योती ॥ ठायींच समाप्ती झाली जैसी ॥ २ ॥ मोक्ष रेखे आला भाग्यें वीनटला ॥ साधूचा अंकीला हरीभक्त ॥ ३ ॥ ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी ॥ हरी दिसे जनीं वनीं आत्मतत्वीं ॥ ४ ॥ ॥ ६ ॥

पर्वताप्रमाणे पातक करणें ॥ वज्रलेप होणें अभक्तांसी ॥ १ ॥ नाहीं ज्या भक्ती ते पतीत अभक्त ॥ हरीसी न भजत दैवहत ॥ २ ॥ अनंत वाचाळ बरळती बरळ ॥ त्यां कैचा दयाळ पावे हरी ॥ ३ ॥ ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान ॥ सर्वां घटीं

पूर्ण एकनांदे ॥ ४ ॥ ॥ ७ ॥

संताचेसंगती मनोमार्गगती ॥ आकळावाश्रीपतीयेणेपंथें ॥ १ ॥ रामकृष्ण वाचाभावहाजीवाचा ॥ आत्माजोशिवाचारामजप ॥ २ ॥ एकतत्वींनामस्साधितीसाधन ॥ द्वैताचेंबंधननबाधिजे ॥ ३ ॥ नामामृतगोडीवैष्णवांळ्यधली ॥ योगियांसाधली जीवनकळा ॥ ४ ॥ सत्वरउच्चारप्रल्हादीबिंबला ॥ उद्धवासाधलाकृष्णदाता ॥ ५ ॥ ज्ञानदेवह्मणेनामहेंसुलभ ॥ सर्वत्रदुर्लभविरळाजाणे ॥ ६ ॥

॥ ८ ॥

विष्णूवीणेंजपव्यर्थत्याचेंज्ञान ॥ रामकृष्णींमन नाहींज्याचें ॥ १ ॥ उपजोनींकिंरंतानेणेअद्वयवाटा ॥ रामकृष्णीपैंठाकेसाहोय ॥ २ ॥ द्वैताचीझाडणीगुरुवीणेज्ञान ॥ त्याकैंचेंकीर्तनघडेनामीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवह्मणेसगुणहेंध्यान ॥ नामपाठमौनप्रपंचाचें ॥ ४ ॥ ॥ ९ ॥

त्रिवेणीसंगमीं नानातीर्थेंभ्रमीं ॥ चित्तनाहींनामींतरितेंव्यर्थ ॥ १ ॥ नामासीविन्मूखतोनरपापीया ॥ हरीविणेंधावयानपावेकोणी ॥ २ ॥ पुराणींप्रसिद्धबोलिलेवाल्मीक ॥ नामेंतिन्हीलोकउद्धरती ॥ ३ ॥ ज्ञानदेवह्मणेनामजपाहरिचें ॥ परंपरात्याचेंकूळशुद्ध ॥ ४ ॥ ॥ १० ॥

हरीउच्चारणींअनंतपापराशी ॥ जातीललयासीक्षणमात्रें ॥ १ ॥ तृणअग्नीमेळेंसमरसझालें ॥ तैसेंनामेंकेलेंजपतांहरी ॥ २ ॥ हरीउच्चारणीमंत्रपैंअगाध ॥ पळेभूतबाधाभेणेंयेथें ॥ ३ ॥ ज्ञानदेवह्मणेहरिमाझासमर्थ ॥ नकरवेअर्थउपनिषदां ॥ ४ ॥ ॥ ११ ॥

तीर्थव्रतनेमभावेंवीणसिद्धी ॥ वायांचीउपाधीकरिसीजना ॥ १ ॥ भावबळेंआकळेयेर्‍हवींनाकळे ॥ करतळींआंवळेंतैसाहरी ॥ २ ॥ पारियाचारवाघेताभूमीवरी ॥ यत्नपरोपरीसाधनतैसें ॥ ३ ॥ ज्ञानदेवह्मणे निवृत्तीनिर्गूण ॥ दिधलेंसंपूर्णमाझेहातीं ॥ ४ ॥ ॥ १२ ॥

समाधीहरीचीसमसुखेंवीण ॥ नसाधेलजाणंद्वैतबुद्धी ॥ १ ॥ बुद्धीचेंवैभवअन्यनाहींदुजें ॥ एकाकेशवराजेंसकळसिद्धी ॥ २ ॥ ऋद्धिसिद्धिनीधिअवघीचउपाधि ॥ जंवत्यापरमानंदीमननाहीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवाम्यरमलें समाधान ॥

हरीचें चिंतन सर्वकाळ ॥ ४ ॥ ॥ १३ ॥
नित्यसत्यमितहरीपाठज्यासीं ॥ कळीकाळत्यासीं नातळती ॥ १ ॥ रामकृष्ण वाचाअनंतराशीतप ॥ पापाच्येकळपपळतीपुढें ॥ २ ॥ हरीहरी हरी मंत्रहाशिवाचा ॥ ह्मणतीजे वाचातयांमोक्ष ॥ ३ ॥ ज्ञानदेवपाठनारायणनाम ॥ पाविजेउत्तमंनिजस्थान ॥ ४ ॥ ॥ १४ ॥
एकनाम हरीद्वैतनामदूरी ॥ अद्वैतकुसरीविरळाजाणे ॥ १ ॥ समबुद्धीघेतांसमानश्रीहरी ॥ शमदमावरीहरीझाला ॥ २ ॥ सर्वांघटींराम देहादेहीं एक ॥ सूर्यप्रकाशकसहस्त्ररश्मी ॥ ३ ॥ ज्ञानदेवाचित्तींहरीपाठनेमा ॥ मागीलियेजन्मामुक्तजाहालो ॥ ४ ॥ ॥ १५ ॥
हरीनामजपेतोनरदुर्लभ ॥ वाचेसीसुलभरामकृष्ण ॥ १ ॥ रामकृष्णनामींउन्मनीसाधिली ॥ तयासींलाधलीसकळसिद्धी ॥ २ ॥ सिद्धीबुद्धीधर्महरीपाठींआले ॥ प्रपंचींनिमालेसाधूसंगें ॥ ३ ॥ ज्ञानदेवानामरामकृष्णींठसा ॥ येणेंदशदीशाआत्माराम ॥ ४ ॥ ॥ १६ ॥
हरीपाठकीर्ती मुखीजरिगाय ॥ पवित्रतोहोयदेहत्याचा ॥ १ ॥ तपाचेंसामर्थ्यतपिन्नलाअसूप ॥ चिरंजीवीकल्पकोटीनांदे ॥ २ ॥ मातृपितृभ्रातासगोत्रअपार ॥ चतुर्भुजीनरहोउनिठेले ॥ ३ ॥ ज्ञानगूढगम्यज्ञानदेवालाधलें ॥ निवृत्तीनेंदिल्हेंमाझेहातीं ॥ ४ ॥ ॥ १७ ॥
हरीवंशपुराण हरिनाम कीर्तन ॥ हरीवीणसौजन्यनेणेंकांहीं ॥ १ ॥ त्यानरालाधलेंवैकुंठजोडलें ॥ सकळघडलें तीर्थाटण ॥ २ ॥ मनोमार्गेगेलातोयेथेंमूकला ॥ हरिपाठींस्थीरलातोचीधन्य ॥ ३ ॥ ज्ञानदेवागोडीहरीनामाचीजोडी ॥ रामकृष्णआवडीसर्वकाळ ॥ ४ ॥ ॥ १८ ॥
वेदशास्त्रप्रमाणश्रुतीचेंवचन ॥ एकनारायणसारजप ॥ १ ॥ जपतपकर्मक्रियानेमधर्म ॥ वाउगाचीश्रमव्यर्थजाय ॥ २ ॥ हरीपाठींगेलेतेनिवांतचिठेले ॥ भ्रमरगुंतलेसुमनकळिके ॥ ३ ॥ ज्ञानदेवीमंत्रहरीनामाचेंशस्त्र ॥ यमेंकुळगोत्रवर्जियेलें ॥ ४ ॥ ॥ १९ ॥
नामसंकीर्तनवैष्णवाचीजोडी ॥ पापेंअनंतकोडीगेलींत्याचीं ॥ १ ॥ अनंतज-

न्मान्चेंतपएकनाम ॥ सर्वमार्गसुगमहरीपाठ ॥ १ ॥ योगयागक्रियाधमाधर्म माया ॥ गेलेंतेंवीलयाहरीपाठीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवींयज्ञयागक्रियाधर्म ॥ हरींवि णनेमनाहींदूजा ॥ ४ ॥ ॥ २० ॥

काळवेळनामउच्चारितांनाहीं ॥ दोन्हीपक्षपाहींउद्धरती ॥ १ ॥ रामकृष्णनाम सर्वदोषहरण ॥ जडजीवांतारणहरीएक ॥ २ ॥ हरीनामसारजिव्हायानामा- ची ॥ उपमात्यादेवाचीकोणवानी ॥ ३ ॥ ज्ञानदेवींसांगझालानामपाठ ॥ पूर्वजां वैकुंठमार्गसोपा ॥ ४ ॥ ॥ २१ ॥

नित्यनेमनामीं तेप्राणीदुर्लभ ॥ लक्ष्मीवल्लभ तयांजवळी ॥ १ ॥ नारायणाह रीनारायणहरी ॥ भक्तिमुक्तीचारीघरींत्यांच्या ॥ २ ॥ हरींवीण जन्मनर्कचीपैंजा णा ॥ यमाचापाहुणाप्राणीहोय ॥ ३ ॥ ज्ञानदेवपुसेनिवृत्तीसीचाड ॥ गगनाव हूनिवाडनामआहे ॥ ४ ॥ ॥ २२ ॥

सातपांचतीन दशकांचामेळा ॥ एकतत्वींकळादावीहरी ॥ १ ॥ तैसेंनव्हेनाम सर्वत्रवरिष्ठ ॥ येथेंकांहींकष्टनलागती ॥ २ ॥ आजपाजपणेंउल्टप्राणाचा ॥ येथें हीनामाचानिर्धारअसे ॥ ३ ॥ ज्ञानदेवाजिणेंनामावीणव्यर्थ ॥ रामकृ- ष्णींपंथक्रमीयेला ॥ ४ ॥ ॥ २३ ॥

जपतपकर्मक्रियानेमधर्म ॥ सर्वांघटींराम भावशुद्ध ॥ १ ॥ नसोडींहाभावटा किरेसंदेहो ॥ रामकृष्णींटाहोंनित्यफोडीं ॥ २ ॥ जातीवित्तगोतकुळशीळमा त ॥ भजेंकांत्वरितभावयुक्त ॥ ३ ॥ ज्ञानदेवाध्यानीरामकृष्णमनीं ॥ वैकुंठभु वनींघरकेलें ॥ ४ ॥ ॥ २४ ॥

जाणीवनेणीवभगवंतीनाहीं ॥ दोन्हीपक्षपाहींउद्धरती ॥ १ ॥ नारायणहरी- उच्चारनामाचा ॥ तेथेंकळिकाळाचारीघनाहीं ॥ २ ॥ तेथीलप्रमाणनेणवेवे- दांसी ॥ तेंजीवजंतुंसीकेवीकळे ॥ ३ ॥ ज्ञानदेवाफळनारायणपाठ ॥ सर्वत्र वैकुंठकेलाअसे ॥ ४ ॥ ॥ २५ ॥

एकतत्वनामदृढधरींमना ॥ हरीसीकरुणायेईल तूझी ॥ १ ॥ तेंनामसोपारेरा मकृष्णगोविंद ॥ वाचेसीसद्गदजपाआधीं ॥ २ ॥ नामापरतेंतत्वनाहींरेअन्य- था ॥ वायांआणिकापंथाजासिळझणी ॥ ३ ॥ ज्ञानदेवामौनजपमाळअंतरी ॥

धरोनी श्रीहरी जपें सदां ॥ ४ ॥ ॥२६॥

सर्व सूख गोडी साही शास्त्रें निवडी ॥ रिकामा अर्धघडी राहूं नको ॥ १ ॥ लटि-का व्यवहार सर्व हा संस्कार ॥ वायां येरझार हरीवीण ॥ २ ॥ रामसंत्र जप कोटी जाइल पाप ॥ रामकृष्णीं संकल्प धरूनी राहे ॥ ३ ॥ निजवृत्ती काढीं सर्व माया तोडीं ॥ इंद्रियां सवडी लपूं नको ॥ ४ ॥ तीर्थीं व्रतीं भाव धरीं रे करुणा ॥ शां-तिदया पाहूणा हरी करीं ॥ ५ ॥ ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तीदेवीं ज्ञान ॥ समाधी संजीवन हरीपाठ ॥ ६ ॥ ॥ २७ ॥

अभंग हरीपाठ असती अठ्ठावीस ॥ रचिले विश्वासें ज्ञानदेवें ॥ १ ॥ नित्य पाठ करी इंद्रायणीतीरीं ॥ होय अधीकारी सर्वदा तो ॥ २ ॥ असावें स्वस्थचित्त एकाग्रीं नेम ना ॥ उल्हासें करून स्मरण जीव ॥ ३ ॥ अंतकाळीं तैसा संकटाचे वेळीं ॥ हरी त्यासी सांभाळी अंतर्बाह्य ॥ ४ ॥ संतसज्जनानीं घेतली प्रचीती ॥ आळशी मंदमती केवीं तरे ॥ ५ ॥ श्रीगुरु निवृत्तीवचनीं तो मेळ ॥ तोषला तात्काळ ज्ञानदेव ॥ ६ ॥ ॥२८॥

इति ज्ञानदेव कृत हरिपाठाचे अभंग समाप्त.




अथ गर्गाचार्यकृत प्रश्नावली प्रारंभः

याखालीं लिहिलेले कोष्टकांतील अंकावर सुपारी ठेऊन अंकाचा प्रश्नभाव वांचून पहावा आणि त्याप्रमाणें सांगावें. किंवा हळखुंडाचा फांसा करावा आणि तीनडाव टाकावे मोजणीस येतील त्या आंकड्याचा प्रश्न पहावा

पांचपानाचा विडा, सुपारी, नारळ ठेवून नमस्कार करावा. स्नान करून धूपदीपें देवाची पूजा करून प्रश्नदिनशुद्धि किंवा तो धडा पाहून सुपारी किंवा फांसा टाकून पहाणें, सत्य जाणा.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १११ | ११२ | ११३ | ११४ | १२१ | १२२ | १२३ | १२४ |
| १३१ | १३२ | १३३ | १३४ | १४१ | १४२ | १४३ | १४४ |
| २११ | २१२ | २१३ | २१४ | २२१ | २२२ | २२३ | २२४ |
| २३१ | २३२ | २३३ | २३४ | २४१ | २४२ | २४३ | २४४ |
| ३११ | ३१२ | ३१३ | ३१४ | ३२१ | ३२२ | ३२३ | ३२४ |
| ३३१ | ३३२ | ३३३ | ३३४ | ३४१ | ३४२ | ३४३ | ३४४ |
| ४११ | ४१२ | ४१३ | ४१४ | ४२१ | ४२२ | ४२३ | ४२४ |
| ४३१ | ४३२ | ४३३ | ४३४ | ४४१ | ४४२ | ४४३ | ४४४ |
| | | | | | | | |

१११ हा प्रश्न बहुत उत्तम असे इच्छिले मनोरथ कार्यसिद्धि पावेल. वादांत विजयी होशील. नवा हार होईल देवलाभ होईल. दिवस बरे आले असत मनकामना सिद्ध होईल. याची खूण तुझे उजवे बाजूवर तीळ असे.

११२ या प्रश्नाचें फळ मध्यम असे. दुसरें कार्य कीजे. हें काम न होय तुझे. मनांत बहुत चिंता असे. कुळदेवतेची पूजा करावी. तेणें करून चिंता दूर होईल. याची खूण तुझी वायको लटकें बोलत्ये.

११३ या प्रश्नाचें फळ अंकावर थोर लाभ झाला. चिंता मिटेल. पुत्रप्राप्ती, सुख होय. मध्यम दिवस होते ते गेले. आतां तुला बरवे दिवस आले असंत. तूं मनांत विश्वास ठेवणें. याची खूण तुझे उजवे कुशीवर तीळ असे.

११४ हा प्रश्न बहुत उत्तम असे. कुळदेवता इष्ट होय. कल्याण होईल. भूमिलाभ होईल. अर्थलाभ असे. सोयरीक होईल. आजपासून तीन महिन्यांत बरें होईल. आणि आपल्या देवाची व गुरूची मनोभावें करून भक्ति करावी. मनकामना सिद्ध होईल. याची खूण तुझे स्त्रीचे पोटावर तीळ असे.

१२१ हा शकुन बरा असे. कांहीं कार्यलाभ असे. श्रीकुळदेवतेचें पूजन करावें. ठिकाणलाभ होईल. मित्राची भेट होईल. ज्या वस्तूची भेट इच्छितोस ती भे

टं होईल· द्रव्यलाभ होईल· काळजी चिंता हरेल· सुखप्राप्त होईल· याची· खूण तुझे उजवे जंघेवर तीळ असे·

१२२ हा शकून द्रव्याचा असे· करण्यांत धंद्यांत लाभ असे· परदेशासीं व परगांवासीं मोठें भय होईल· परंतु तूं कोणाचा विश्वास धरूं नको· आपल्या समजाप्रमाणें करावें· याची खूण तुझेवर मातबर स्त्रीची प्रीति आहे·

१२३ हा प्रश्न बहुत शुभ असे· कार्य सिद्धी होईल· कुटुंब वृद्धी होईल· स्त्री लाभ व स्नेह्याची भेट होईल· परगांवाहून मोठी खुशाली होईल· चिंता असे ती पांच दिवसांत मिटेल· शत्रूचा नाश होईल· तुला बरवे दिवस आले अ सत· याची खूण तूं धर्म करितोस व मग पस्तावा करितोस·

१२४ हा प्रश्न मांगलिक असे· बंधूसीं प्रीतीची वृद्धी होईल· मनाची चिं ता जाईल· पुत्रलाभ होईल· तुजला पद लाभ होईल· राजद्वारीं सन्मान हो ईल· मनाची चिंता दूर होईल· कुळदेवतेची पूजा कीजे· तेणें कार्य सिद्धी हो ईल· याची खूण तुला शुभ चिंता तीन दिवसांत झाली आहे·

१३१ हा प्रश्न द्रव्याचा असे· कुटुंब वृद्धी होईल· द्रव्यलाभ असे· वस्तू गे ली असेल ती प्राप्त होईल· ज्यांशीं स्नेह तुटला असेल तो स्नेह वृद्धिंगत हो ईल· स्त्री पुत्रांस सुख होईल· जो प्रश्न केला असेल त्या विचारें करावा· उ तावळी न करावी· या वर्षांत आनंद बहुत होईल· याची खूण तुला घरा- ची चिंता बहुत असे· बाहेर राहातोस·

१३२ हा प्रश्न जय असे· ज्या कार्याची चिंता बहूत करितोस तें कार्य सि द्ध होईल· स्त्रीची भेट होईल· स्नेह्याशीं प्रीति होईल· मनीं शुभ एक चिंता असे तो एक शत्रू मोहांत पडेल· सत्य जाणिजे· पुत्रलाभ· पूर्व दिशेहून लाभ· होईल· तुझें द्रव्य येईल· परंतु देवतांची पूजा कीजे· मनकामना सिद्धी पावेल· याची खूण उजवे बाजूस इंद्रियावर तीळ असे·

१३३ हा प्रश्न मध्यम असे· मनास चिंता· द्रव्यहानी होय· शरीरीं कष्ट होय· मनीचें चिंतिलें निष्फळ होय· याची खूण तुझे घरावर झाड आहे·

१३४· या प्रश्नाचें फळ तुझा दुर्जन असे· त्याशीं जिंकिशील· राजद्वारीं·

किंवा मोठे गृहस्थास लाभ होईल. दक्षिण किंवा पूर्व दिशांहून लाभ असे. मन इच्छा कार्य सिद्धी होईल. तुझे नष्ट दिवस गेले असत. आतां दिवस बहुत बरे आले असत. कुळदेवतेची पूजा कीजे. तेणें करून शत्रुनाश होईल. याची खूण तुझे भुजेवर तीळ असे.

१४१ या प्रश्नाचें फळ मध्यम. व्यापार, वस्तू विषयीं बहुत लाभ असे. शुभ कार्य होईल. विवाह लाभ होईल. शत्रुनाश होईल, राजमान्य होईल. बहुत लाभ होईल. याची खूण तुझा स्त्रीशीं कज्जा असे.

१४२ या प्रश्नाचें फळ शुभकार्य असे. द्रव्यलाभ होईल. मनीं चिंता असे. ती दूर होईल. इष्टबंधूची प्रीति होईल. स्नेह्याची भेट होय. मनीं संतोष ठेवणें जी वस्तू घेतली. त्यांत च लाभ होय. जी वस्तू हातांतून गेली ती येईल. राजद्वारीं सन्मान होईल. याची खूण तुझें कोणाशीं घेणें नाहीं. सत्य जाण. मनोरथ पूर्ण होईल.

१४३ या प्रश्नाचें फळ कांहीं कार्य सिद्धी होईल. श्रीभवानीचें पूजन करावें. मागील कार्य करावें तें होईल. कन्यालाभ, लक्ष्मीलाभ होईल. व्यापारांत लाभ होईल. शरीराचा रोग जाय. तुझा शत्रू एक तोंडीं बोलतो त्याचा विश्वास धरूं नको. त्यानें मागें तुला दगा दिला असे. तूं सावध राहाणें याची खूण तुझे उजवे बाजूवर तीळ असे.

१४४ हा प्रश्न घरचा असे. संपदा प्राप्त होईल. मनकामना सिद्ध होय. द्रव्यलाभ होईल. आपदा, संकट दूर होईल. कुळदेवतास मोर पाहील. आतां ग्रह तुला बरे असत. शत्रूची चिंता नाहीं. याची खूण तुझे डोळे मोठे असत.

२११ हा प्रश्न बहुत चांगला असे. कार्य मोठें परंतु सिद्धि असे. घरामध्यें तुजला जय असे. आतां तुजला बहुत सुख होईल. धंद्यांत नफा होईल. पुत्रलाभ होईल. याची खूण तुझे बायको कडून कज्जा असे. मित्र बंधु यांची भेट होईल.

२१२ या प्रश्नाचें फळ मांगलिक वार्ता होईल. द्रव्यलाभ होईल. पुत्रलाभ धनलाभ, चतुष्पदलाभ होईल. प्रवासीं जायाचें करतोस. प्रवासीं परगांवचें.

कार्याची चिंता असे, कुळदेवतेनें, वआराध्यदेवतेनें कार्यसिद्धि होईल· सहोदर सांगे· याची खूण तुझे घरांत स्त्रीवर दहशत असे·

२१३ याप्रश्नाचें फळ तुला जिवाची चिंता असेल ती दूर होईल· अन्न धनाचा लाभ होईल ·मनांत रखुशाल असोंदेणें· एक महिन्यांत तुझी कार्यसिद्धि होईल, बंधुभेटल, कुटुंबसुख असे· शरीरीं सुख होईल, उत्तमपदवी प्राप्त होईल ·शत्रु एक असे त्याचा नाश होय· तुला दिवस बरे आले असत· याची खूण तुझे वडिलांला द्रव्य फार होतें·

२१४ याप्रश्नाचें फळ तुला बहुत उतावळीनें लाभ होईल· जी वस्तू जिकडून गेली असेल ती वस्तू माघारी हातीं येईल· दुरीहून एक लाभ होईल· मोठी मनांत एक चिंता असे ती दूर होय· द्रव्य लाभ होईल· शत्रु एक असे त्याचा विश्वास धरूंनको· कुळदेवतेची पूजा कीजे· ऊंसदान दीजे· बरें असे· याची निशाणी मागें एक घाला असे·

२२१ याप्रश्नाचें फळ ऐकावें, वर्षें तीन झालीं सुख असे· आतां येनवे वर्षापासून तीन वर्षें सुख असे· मोठी पोटीं चिंता असे ती चिंता चंचळ असे, तुझें आतां दुःख गेलें असे, मांगलिक होईल, मनोरथ पूर्ण होतील· एक वस्तू तूं सोडिलीस ती पुनरपी करावी· याची खूण तुला जळघात गेला असे·

२२२ याप्रश्नाचें फळ मध्यम असे· मित्राशीं विरोध होईल· शत्रूची भेट होय बरवें नाहीं· क्लेशप्राप्त होय· ज्याकार्याची चिंता मनांत असे तें कार्य मोठें असे· द्रव्यहानी होय· शरीरीं क्लेश उत्पन्न होय· गुप्तचिंता दूर होणार नाहीं· याची खूण तुझे भुजेवर तीळ असे·

२२३ याप्रश्नाचें फळ मध्यम असे· तूं कार्य चिंतिलें तें बरवें नाहीं· हें कार्य करितां लोक निंदा करितील, भावाशीं कज्जा उपजेल, धंद्यांत तोटा येईल तरी दूसरें काम करावें· हें कार्य करणें कठीण असे · याची खूण गत्रीं स्वप्नांत खूण पाहिली असे·

२२४ याप्रश्नाचें फळ तुला शत्रुचिंता असे; आपली चिंता नाहीं· परंतु तें कार्य शत्रूचा विलंब असे· घरांत कज्जा तेणें असे· परंतु आतां खातर ज

माठेवर्की, बरें होईल. वाईट दिवस गेले असत. तुला बरे दिवस आले असत देवगुरूची भक्ती कीजे, तेणें करून कार्यसिद्धी होईल. याची खूण तुझें डावे बाजूवर तीळ असे.

२३१ या प्रश्नाचें फळ मांगलिक असे. कार्य दिसेल. एका मासांत पुत्रला भ द्रव्यलाभ होईल. शत्रुचिंता तुला असे ती दूर होईल. व्यापारांत लाभ होईल. याची खूण शत्रु येऊन पायां पडतील.

२३२ या प्रश्नाचें फळ तुला मध्यम असे. कार्य चिंतिलें नष्ट असे. तें होणार नाहीं. मनांत भय उपजेल, कुटुंब क्लेश उत्पन्न होईल. याकरितां दुसरें कार्य करावें. तेणें करून नसे शरीरास क्लेश होतील. द्रव्यहानी होईल. शत्रूशीं कलह होईल. याकरितां धर्म करावा. तेणें खुशाल होय. याची खूण देहीं पश्चात्ताप होय.

२३३ या प्रश्नाचें फळ तुला अकस्मित फल प्राप्त होईल. परंतु चिंता मनांत अनर्थ कार्य योजिलें असे. जें कार्य करणें तें विचार करून कीजे, याकरितां दुसरें कार्य कीजे, तेणें तुझी कार्यसिद्धी होईल. याची खूण तुझे स्त्रीशीं तुझा कज्जा असे.

२३४ या प्रश्नाचें फळ तुझी कार्यसिद्धी होईल. कुटुंब क्लेश दूर होय. गुप्त गोष्ट सांगतां लोक हंसतील. तुझे नष्ट दिवस गेले आज बरे असे. धनलाभ चतुष्पद लाभ होईल, दुःख जाईल, सुख यश होय. याची खूण तुझे जवळ मागें द्रव्य होतें.

२४१ या प्रश्नाचें फळ तुजला लाभ असे. विवाह स्त्रीची चिंता असे. प्रवास परगांवाची चिंता असे ती सर्व दूर होईल. कुटुंबाची चिंता असे, कुटुंबाची वृद्धी असे. पिता बंधू तुला भेटतील. एक मनुष्य तुझे जातीचा हें दुःख करितोस तें दूर करील. याची खूण तुझे स्त्रीचे पोटावर तीळ असे.

२४२ या प्रश्नाचें फळ तुला द्विपद लाभ असे. मनोरथ पूर्ण होईल. चिंतिली वस्तू प्राप्त होईल. दुसमानाची खराबी होईल. एका मनुष्यापासून चिंतिली वस्तू प्राप्त होईल. याची खूण तुझे उजवे भुजेवर तीळ असे

२४३ याप्रश्नाचें फळ तुझे शरीरास बरें सुख होय. सुखाचे दिवस आले असत. मनोरथ पूर्ण होतील. द्रव्यलाभ घडेल. क्लेश दूर होतील. एक वेळ मोठा लाभ असे. पुत्रसुख होय. दुसमानाचें वाईट होय. याची खूण तुझे उजवे कुशीवर तीळ असे.

२४४ या प्रश्नाचें फळ धर्मसेवा करशील. तेणेंकरून कार्यसिद्धि, तुझे नष्टचर्येचे दिवस गेले असत मनांत संतोष ठेवणें. एका मनुष्यानें तुझें कार्य बिघडलें असे त्याचा विश्वास धरूं नको. पुत्रसुखी होय. याची खूण तुझे इंद्रियावर तीळ असे.

३११ या प्रश्नाचें फळ बरें असे. तुला मोठी चिंता असे, जिवाची चिंता असे ती दूर होईल. आपल्या कुळदेवतेची पूजा कीजे तणेंकरून मनकामना पूर्ण होय. शत्रु मिटेल. राजदरबारीं सन्मान होय. लाभ होय. याची निशाणी तुला क्रोध फार कठीण येत असेल.

३१२ या प्रश्नाचें फळ मनकामना पूर्ण होय. द्रव्यलाभ कुटुंबलाभ, वृद्धि लाभ होय. शरीर निरोगी होय. बहुत दिवसांची चिंता रोग दूर होय. मनीं संतोषपणानें व्यापार करणें. ज्या कार्याची चिंता करितोस ती कार्यसिद्धि होय. याची खूण तुझी स्त्रीवर बहुत प्रीति असे.

३१३ या प्रश्नाचें फळ द्रव्यचिंता तुला बहुत असे, तेणें तुझें कल्याण एक वेळ कार्य करितां चिंता असे. मग बरें होईल. याची खूण स्वप्नांत अलंजंजाल आलें असे.

३१४ या प्रश्नाचें फळ शुभ कल्याण होईल. द्रव्यलाभ होईल. सर्व कार्यसिद्धि होईल. मनांत संतोष असो देणें. तूं मनांत धार्मिक आहेस. मनांत चिंता तूं न कीजे. उपकारी असे. या प्रमाणें बरें असे. याची खूण तुझें धन गुप्त असे ज्यास्ती नसे.

३२१ या प्रश्नाचें फळ तुझ्या मनांत चिंता असे तें बरें नाहीं. बरें करितां वाईट होय. कार्यसिद्धि होणार नाहीं. याजकरितां दुसरें कार्य करावें. हें कार्य करितां दुःख होय. क्लेश होय. द्रव्यहानी होय. मास एक चिंता होय. याची खूण तुझें

कोणाशीं धरेपणा नाहीं.

३२२ या प्रश्नाचें फळ तुला असे. मनांतील चिंता दूर होय. यंदां तुला भा‐वाकडून व मित्राकडून खुशाली होईल. शरीर शांत होईल. द्रव्यलाभ यंदांचे वर्षांत विशेष होईल. राजद्वाराहून खुशाली होईल. उत्तम फल प्राप्त होईल. शत्रूकडून लाभ होय. याची खूण तुझे मस्तकीं चाई असे.

३२३ या प्रश्नाचें फळ तुला सुफल यंदांचे व्यापारांत लाभ असे, शेत करितां लाभ असे, वस्त्रामध्यें यश येईल. उद्योग होईल. गुप्तचिंता मनांत असे ती दूर होय. धर्म कीजे, कार्यसिद्धि होय. शत्रु पायां पडतील. याची खूण तुझे इंद्रियास रोग असे.

३२४ या प्रश्नाचें फळ तूं मनीं विचार करितोस. परंतु तुझ्या कार्याचा विघ्न असे. याकरितां तूं श्रीगणपतीचें आराधन कर, पूजन कर, तेणें तुझें विघ्न दूर होईल, इच्छिलें कार्य २१ घटकेंत व २१ दिवसांत होईल. निश्चय जाणिजे. याची खूण तुझ्या डोळ्यास उपद्रव असे.

३३१ या प्रश्नाचें फळ मांगलिक असे. मनकामना सिद्ध, मनांत संतोष ठेवणें. तुझे मनीं धर्म असे. तेणें तुझी कार्यसिद्धी होईल. कुळदेवतेची पूजा कीजे. तेणेंकरून तुझें बरवें होईल. याची खूण तुझे उजवे भुजेवर तीळ असे.

३३२ या प्रश्नाचें फळ तूं मनीं काम चिंतिलें तें होणार नाहीं, दुसऱ्या कार्याची योजना कीजे. तुला दिवस अद्यापी वाईट आहेत. मित्र शत्रु झाले असत. दोनतीन वर्षें मनांत फार उच्चाट असे. तूं मनांत भोळा असे. तूं मोठा धीर ठेव. बरवें होईल. याची खूण तुझे छातीवर तीळ असे.

३३३ या प्रश्नाचें फळ तूं मनीं कार्य चिंतिलेंस तें लाभदायक असे. चांगलें होईल. चिंता करूं नको. एका मनुष्यापासून व शत्रुपुत्रापासून लाभ होय. कुळदेवतेची पूजा कीजे. गुप्त चिंता असे ती दूर होय. याची खूण तुझे जंघेवर तीळ असे.

३३४ या प्रश्नाचें फळ तुझें बरें असे. मनोरथ पूर्ण होतील. अकल्पित लाभ होय. गेला धंदा येईल. मित्र शत्रूपासून लाभ होईल. बंधुलाभ होईल. दुःख

जाय सुखहोय हें कार्यबरें योजिलें असे पुत्रलाभ असे दुसऱ्याच्यानाशहोय शरीरस्थंडराहील चतुष्पदलाभहोय याचीखूणतुझेंस्त्रीशींबनतनाहीं

३४१ याप्रश्नाचें फळ तुलाबहुतदिवसांचीचिंताअसे शुभचिंताअसेतीदूरहोय सुखहोय स्नेह्याचीप्रीतहोय याचीखूणतुलाकोणाशीलेणेंनाहीं

३४२ याप्रश्नाचें फळ तुझ्यामनांत जिवाचीचिंताअसे तीदूरहोय स्थाईक लाभहोय द्रव्यलाभहोय मनांतचिंताअसेलतीदूरहोय जीवस्तू हातांतून गेलीअसेल तीप्रासहोय ज्यासीं स्नेह तुटला असेल तोस्नेह पुनः होय अकस्मित खुशाली होय याचीखूण तुझेइंद्रियावरतीळ असे

३४३ याप्रश्नाचें फळ मध्यम असे चोरीलबाडीच्या गोष्टी असत मनांतक्लेशहोय वस्तू गेली असे ती हातीं येणें कठीण त्याकरितां धर्मकीजे बरें होय याचीखूण तुझेघरांत द्रव्य फार असे

३४४ याप्रश्नाचें फळ लाभ असे व्यापारांत लाभ असे प्रीतिवृद्धि असे क्लेशचिंतादूरहोय स्त्रीसुखहोय तुझा एक ठिकाणीं विघाड असे तोदूर होय शत्रुनाशहोय याचीनिशाणी तुझेशेजाऱ्याशीं बरें नाहीं

४११ याप्रश्नाचें फळ मध्यम असे धनहानी असे शरीरीं पीडा असे मनास भयहोय बसणें स्थान निर्फळ होय द्रव्य हातीं येणें तें जाईल आतां मनांत चिंता करूं नको मांगलिक लाभ होईल द्रव्यलाभ होईल कल्याण होईल याचीखूण तुझे उजवे बाजूवर तीळ असे

४१२ याप्रश्नाचें फळ तुला स्त्रीपुत्रांचीचिंता असे व द्रव्याची कांहीं चिंता असे ती चिंता थोडे दिवसांत दूर होईल मित्र येऊन पायां पडतील तें काम बंदोबस्ताचें होय याची निशाणी तुझे मित्र भाऊ यांसी लेणें

४१३ याप्रश्नाचें फळ तुला द्रव्याची चिंता असे ती दूर होईल थोरपण वाढेल राजमान्य होईल परगांव परदेशाची कार्यसिद्धि होईल स्त्रीचिंता असे ती दूर होय गतवस्तू प्रासहोय मनोरथ सिद्ध होय याचीखूण तुझी बायको लबाड

४१४ याप्रश्नाचें फळ मध्यम असे प्रथम चिंता होय मग खुशाली होय देणें

असेतीएक महिन्यांतचिंता दूरहोय. घरांतलाभहोयशरीर प्राधान्यहोय. मं
नोरथपूर्णहोय. याचीखूण तुझे छातीवर तीळ असे.

४२१यामश्नाचेंफळ तुलास्थाईकचिंताहोय. द्रव्यलाभहोईल. मित्रलाभहोईल.
स्त्रीमित्रचिंताअसे तीदूरहोय. आतां दिवस तुलाबरेआले असत. याची खू
णतुझेशरीरीं गुप्त रोग असे.

४२२यामश्नाचेंफळ शरीरीं सुखनाहीं. द्रव्यहानीझाली असे. स्त्रीचें सुख-
झालें असे. याकरितां करणें तें विचारें करावें. सुख, द्रव्यलाभ. कुळ देवते
चीपूजाकीजे. विश्वासठेव. आपण जें करणें तें समजून करावें. याची खू
णतुझे स्त्रीचे योनीवर तीळ असे.

४२३ यामश्नाचें फळ तुझे शत्रूचानाश होय. लाभ होईल. संपदाप्राप्त
होय. सज्जनाचा लाभ. गायीची सेवा करावी. तेणें कार्यसिद्धी होईल. तुझे
वाईट दिवस गेले. हें असत्य नव्हे सत्य जाणावें. याचीखूण तुझें स्त्रीचेयोनी
वर तीळ असे.

४२४यामश्नाचें फळ तुला चिंता असे. तुलादिवस फार झाले. कार्य मो
ठें असे. विलंबें करून कार्य सिद्धि. उतावळीनें कार्य विघडेल. मनांत विश्वा
सठेव. दिवसें दिवस तुलाखुशाली असे. याचीखूण तुला सुख नाहीं.

४३१यामश्नाचेंफळ मनाचा मनोरथ फळेल. स्थाईक चिंता असे ती दूर हो
य. तुझें दुःख सरलें. अशुभ दिवसगेले. चांगले दिवस आले. आनंद द्रव्य
लाभहोईल. शरीरीं बरें असे. याचीखूण तुझे बाजूवर तीळ असे.

४३२ यामश्नाचेंफळ तुला बहुत वाईट असे. तुझेमित्रादिक दुःख देतील
बरें करितां वाईट असे. गणपतीस शरण जावें म्हणजे आरोग्य होय. याची
खूण तुझेस्त्रीला परपुरुष मिळाला असे.

४३३ यामश्नाचें फळ तुझेयजमानाशीं कज्जा होय. तुझी चाकरी व्य
र्थजायस्त्यायजमानापासून तुझानाश आहे. तोझाल्यावर मग तुलाएकलाभहोईल
तेणेंकरून तुलाद्रव्य विपुलहोईल. याचीखूणतुझेडोकीवर भोंवरे तीन असत.

४३४यामश्नाचेंफळ तुझेंमनाचेमनोरथ पूर्ण होतील. तूं उंच नीच फार पहा

तांस· तूंचिंताकरूंनको·खुशालीहोय· श्रीगुरूचेकृपेनें मनाचे मनोरथपूर्ण· होतील· याचीखूण तुझीस्त्रीफारशाहाणीअसे· तुलातें लांछन असे·

४४१ याप्रश्नाचेंफळ भावास पीडाहोय, क्लेशहोय, पोटांत तुझ्या पीडाअसे· ग्रह तुलामध्यम असत, पांचरात्री धीरठेवणें· खरेंकामकरावें· कार्यघडणें सुख्यलाभ असे· आनंदवस्तू तुझे हातूनगेली· तीबहुतप्रयत्नें येईलयाचीखूणतुझेइंद्रियावरतीळअसे

४४२ याप्रश्नाचेंफळ हा प्रश्न धर्माचा असे· तुझेंकार्य धर्मानें होईल· परंतु इकडे काम आजपावेतों निर्फळझालें असे द्रव्यहानीफारझाली असे· दुसरेंका र्य कराल तर होईल· शरीरास बरें नाहीं· याचीखूणतुझेस्त्रीचे जंघेवरतीळ असे·

४४३ याप्रश्नाचेंफळ कार्य होणार नाहीं· द्रव्यहानी होय· आपल्यांत विरुद्ध होय· जीवास मोठी चिंता असे· तीदूर होय· सावध राहावें· दुसरें कार्य करशील तरलाभहोईल· याकरितां विचार करून कार्य करावें· ग्रहांचीपूजा करावी· तेणें क्लेश दूर होय· याचीखूण तुझे इंद्रियावर तीळ असे·

४४४ याप्रश्नाचेंफळ कार्य तूं विचारिलें तें सिद्ध होय· द्रव्यलाभ होय· स्त्रीपु त्रांचें सुख होय· गेलीवस्तू हातीं येईल· २१ दिवस १ मास, एकपक्ष, तीनवर्षें प र्यंत बहुत सुख असे· शत्रु पायां पडतील· व्यापारांत लाभ होईल· राजदरबारीं सु खहोय· तूं मनांत संतोष ठेवणें· याची खूण तुझे इंद्रियावर तीळ असे·

इति गर्गाचार्य कृत प्रश्नावळी समाप्त·



# अथगर्भकांडगर्भावळीप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥प्रथमनमूं गौरीचा कुमरु॥ त्रिभुवनींत्याचा प्रकाश थोरु॥ तो चवदाविद्यांचासागरु॥रंगणासीं आला॥१॥ मगनमूं आद्यसरस्वती॥ अंबे तुझा शरणांगत दुःखी॥ बैसोनिपुण्याचे पालखीं॥ आतां लवकरी येइमति॥ २॥ मगनमूं संतगुरुनिधान॥ कींस्वामीमज द्यावेंज्ञान॥ येथुनि गर्भावळी गाईन॥ कथामूळ मांडणी॥ ३॥ ऐकागर्भकांडीचीमात॥ विरळाजाणतीयाचा अर्थ॥ येरां पडलीअसे भ्रांत॥ नपडेचिठायीं॥ ४॥ प्रथम कामकामिनी भवतींनी॥ पुढती कर जोडूनी॥ प्रश्नकरीतसे भवानी॥ विनवीतसे शंकरातें॥ ५॥ पिंडामध्यें पिंड रचियेला॥ तो सांगाजी स्वामीवहिला॥ दोनीकर जोडूनि शंकराला॥ पार्वती पुसतसे॥ ६॥ मगबोलेजान्हवीपति॥ येथूनसांगेन गर्भावळ॥ पार्वतीयेऊनियां जवळ॥ ऐकतीजाहली॥ ७॥ ऋतुकाळस्त्रियांसि आला॥ पुरुषब्रह्मांडीं मदनचेतला॥ कैसाएक ईश्वर स्वर्गीला॥ उतरोनियां॥ ८॥ मदनअसेब्रह्मनाळीं॥ तोसंचरलागर्भकमळीं॥ निर्गुणनिश्चळ तयेवेळीं॥ कैसाजाहलाजीवन॥ ९॥ येथूनिरचनापिंडाची सहज॥ कमळांतपडिलारज॥ रजानें होतीगज॥ तुम्हीं संतेजऐकावें पिंडज्ञान॥ १०॥ पहिले मासीं भरलें कमळ॥ दुसरेमासीं आपनिर्मळ॥ हें तुम्हीं जाणासकळ॥ चित्तदेऊनी॥ ११॥ तिसरेमासीं घट॥ तरी तेरक्त बिंदूचें खोट॥ चवथेमासीं आपण नीट॥ फुटती अंकुर॥ १२॥ ऐसेंझाले पांचमास॥ तेव्हांगर्भ आले प्रकाश॥ सहावेमासीं पंचतत्वांचाअंश॥ येथूनिजाहलाअसे॥ १३॥ तेंपासूनि शरीरांत॥ कायापालट झाली जोत॥ सातवे मासीं सप्तधात॥ आठवेमासीं अष्टांग॥ १४॥ शंकरसांगे गिरिजे सऐक॥ नववेमासीं संपूर्णजाहलेकेशनख॥ उपजतां स्वरूप सुरेख॥ आलें जन्मासी॥ १५॥ मगशंकर ह्मणे वो शक्ती॥ बाळ पडिले महीवरुती॥ मातेचिया स्तनाप्रती॥ दुग्ध येत्ते कैचे निपे॥ १६॥ हातीं दोनीपीयूषिणी॥ पहा कैसी केली करणी॥ हें सांगतों तुजकारणीं॥ जाणगौरीतूं॥ १७॥ नेदेहामध्यें चवदाचक्रें॥ जींकेलीं जगदीश्वरें॥ तींतुह्मीं ओळखावीं चतुरें॥ देऊनिचित्त॥ १८॥ एकह्मणतीपिंड॥ एकह्मणतीपाखांड॥ ज्याणेंपाहिलेंवाचानिगर्भकांड॥ शंडके असेत्यलोकांची॥ १९॥

यांदेहामाजी देहीचझाली ॥ आधींकोणतीवस्तू आकारिली ॥ सूज्ञजाणती-
लतत्काळीं ॥ महाराजते ॥ २० ॥ यादेहामाजीअधिकारशिरकमळ ॥ श्रोतेजाण
तीसकळ ॥ सवाहातहाडसबळ ॥ याब्रह्मांडाचें ॥ २१ ॥ मगपार्वतीविनवीशंकरा
॥ स्वामीचित्तधावेंमाझियाउत्तरा ॥ हाडेंकोणाचियाआकारा ॥ हेंसांगिजेस्वामि
यां ॥ २२ ॥ रक्तरेतनाडीत्वचाविकार ॥ त्याजपासूनीझालेसाचार ॥ तेंकैसेंमजसांगास
त्वर ॥ दोन्हींउत्तरेंपुसतें तुम्हां ॥ २३ ॥ नादबिंदुहाडबापाचें ॥ अंशरक्त नाडीत्वचांचें ॥
विस्तारगुणमातेचें ॥ ऐसेंनिर्मिलेंशरीर ॥ २४ ॥ सवाहातहाडमस्तकीं ॥ चारश्रव
णींतीननासिकीं ॥ आणिकबत्तीसआहेतमुखीं ॥ विस्तारपैंयाचाअसे ॥ २५ ॥
दोनआहेतहनुवटीं ॥ आणीकअठराकंठीं ॥ ऐसेंजगजेठी ॥ गौरीप्रतीसांगीतलें
॥ २६ ॥ दोहींकरींहाडेंबेचाळीस ॥ चतुरश्रोतीं आणावेंमनास ॥ शंकरसांगेगौरीस
॥ जवळीबैसोनियां ॥ २७ ॥ एकवीसमणगटींआहेतत्याचेमणी ॥ सोळापाकोळ्या
तूंपाहेंमोजुनी ॥ एकचित्तदेउनी ॥ गिरिजेतूं ॥ २८ ॥ आणीकवीसहाडें आहेत उर
स्थानीं ॥ गुह्यस्थानीचींउत्पन्नजाणी ॥ अट्ठेचाळीसहाडेंआहेत दोनीचरणीं ॥ गौरीऐ
कतूं ॥ २९ ॥ येथूनदोनदोनशेंजाहलींपुरीं ॥ सोळाहाडें अवधारीं ॥ ऐकेंतूंसाचारी ॥
स्वाधिष्ठानीं ॥ ३० ॥ मनपुरीषहाडेंवीस ॥ विशुद्धीस अठराआणामनास ॥ हिशे
बकरुनि गणितोंत्यास ॥ आणिकमानसीं ॥ ३१ ॥ हृदिकीं आहेत तेरा ॥ येथुनी
तिसींझालींचतुरा ॥ तरीतूं ऐकगुरुकुमरा ॥ गुरूचियाखुणा ॥ ३२ ॥ शंकरसांग
तसेगिरिजे ॥ तरीऐकहोभाजे ॥ सोळासंधीबैसलेवोजे ॥ तरीतूंऐकावेंसादर ॥
३३ ॥ बाहात्तरकोटीविस्तारिलें तुज ॥ चवदाचक्रांचीमाळवोज ॥ ओंवूनिबै-
सलाब्रह्माकरीतपूजा ॥ तेथेंजपहोतीमजपें ॥ ३४ ॥ दहावेद्वारींनादिसे पवन ॥
गौरीतूं ऐकहोचित्तदेऊन ॥ आणिकपंचायशींपवन ॥ ऐकहो गिरिजे ॥ ३५ ॥
ब्रह्मांडींतोनाडीतीन ॥ बाहात्तरसहस्रफाटकजन ॥ तीनशेंसाठबंददेऊन ॥
बांकेलाअसेजडजडीं ॥ ३६ ॥ अंधस्वादिरसणा ॥ नेत्रपुरीअनुहातजाण ॥ वि
शुद्धीदळभरोनिरक्षण ॥ ऐसेसहस्रदळावरी ॥ ३७ ॥ त्रिकूटगोल्हाटसराटाऔ
टपीठ ॥ महारुद्रघनवटप्रकाशझालानीट ॥ मगपार्वतीयेवोनिधीट ॥ शंकराप्रती
बोलतसे ॥ ३८ ॥ काळेंसांवळेंकोणेगुणें ॥ गोरेंजन्मलेंकोणापासून ॥ मुकेंबहिरें को

पेंगुणें॥पांगळेंकोणापासुनीझालें॥ ३९॥खुजेंकुरेंकांबुरें॥हेंकोणेगुणेंसाचारें ॥आळशीजन्मलेंनिर्धारें॥हेंकोणापासुनीतेंसांगा॥ ४०॥कन्यापुत्रएकबीजें॥ नपुंसकजन्मलेंकेसेंवोजें॥आतांशंकरेंयेवदेंगुज॥मजसांगोनिघावें॥ ४१॥एककाळाएकगोरा॥स्वामीउघडावेंगोरवा॥येवदेंसांकडेंसदाशिवा॥दूरकरावेंजी॥ ४२॥सबाशेंवर्षांचीहयात॥एकजातीशंभरनवदहोत॥एकऐंशीसत्तरसाठपंधरासात॥चाळीसतीसवीसदहावर्षांतजिवेंजाती॥ ४३॥तेव्हांआणिकपुसेपार्वती॥करजोडोनीकरीविनंती॥एकसौभाग्यहोतीएकभीकमागती॥मोळीविकोनियां॥ ४४॥एकझाले लक्ष्मीपती॥एकराजयोगीहोती॥एकमहारोगीरक्तपिती॥तेमजप्रतीसांगावें॥ ४५॥शंकरसांगेनिवाडा॥ऐकागर्भावळीचाझाडा ॥ऋतुदेतांस्त्रियेला॥बहुगुणवंत॥ ४६॥ऋतुदेतांबोसुंदरी॥शंकामनींवाहेंसर्वशरीरीं॥तेथेंनपुंसकसुंदरी॥येणेंचिगुणें॥ ४७॥पुरुषाचेंरेतउणेंएकरजें॥तेथेंकन्याजन्मलीवोजें॥शंकरसांगेगौरीसगुज॥सिद्धांतमातु॥ ४८॥पुरुषउठेरेतदेउनी ॥स्त्रीनिजेजरीउताणी॥तेथेंबाळकेंजन्मतीदोन्ही॥तिच्यापिंडांत॥ ४९॥सत्वगुणेंरमतहर्षाचारें॥तेथेंबाळकजन्मलेंगोरें॥तमोगुणेंरमतअहंकारें॥तेणेंलेंकरूंकाळेंजाण॥५०॥रजोगुणेंरमतीसाचारें॥तेथेंसावळींहोतीलेंकुरें॥ऋतुदेतांचचळघाबरें॥तेथेंवेडेंकांपरेंजाण॥ ५१॥येकरमतीधरूनिअबोला॥तेथेंमुकागर्भजाहला॥शंकरसांगेगौरीला॥ऐकतूंसावधपणें॥ ५२॥एकरमतीझांकूनिडोळे॥तेगर्भीचझालेआंधळे॥ऐसेंसांगीतलेंजाश्वनीळें॥गौरीप्रती॥ ५३॥ एकरमतीघूर्णितनिजसुरें॥तेथेंलेंकरूंहोयबहिरें॥ऐसेंसांगीतलेंशंकरें॥दुर्गेलागुनी॥ ५४॥एकरमतीकपाळाआंठीं॥तेथेंजन्मतीनकटीं॥व्हाहाडेंकपाळींलल्लाटीं॥ऐसेंजाणसत्यपैं॥५५॥ऋतुदेतांस्त्रियेलागीं॥कायहोतेंगर्भाआंगीं॥शंकरह्मणेगौरीवेगीं॥ऐकचित्तदेउनी॥ ५६॥उभ्यानीपाणीपीयेघडोघडी॥तेथेंमहाहोयधाडी॥ऊनऊनजेवीतांतडी॥तेणेंखुजेंहोय॥ ५७॥ गर्भिणीअसतांहिंडेघरोघरीं॥होतीतेथेंपांगुळेंनिर्धारी॥पालवआलियामैथुनकरी॥तेथेंरक्तपितीहोयजाण॥ ५८॥शंकरसांगेगिरिजेस॥चारप्रहरबारातास॥आपणदेवमहेश॥सांगताजाहाला॥ ५९॥पहिलेतासीं दीधलाऋतू॥तरीऐकावें

सावधचित्तु॥ तेणेंसवाशेंवर्षेंहयातु॥ पुरुषालागोनी॥ ६०॥ दुसरे तासीं घडेमै थुन॥ तेणेंशंभरवर्षेंपूर्ण॥ आपणजगज्जीवन॥ वदताझाला॥ ६१॥ तिसरेता सींमैथुनकरी॥ तेथेंनव्वदवर्षेंनिर्धारीं॥ शंकरह्मणेवोगौरी॥ चित्तदेईमाझियाबो- ला॥ ६२॥ चौथेतासींअनायासेंमिळती॥ तेथेंहयात्ऐशींवर्षेंहोती॥ शंकरह्म णेगौरीप्रती॥ एकचित्तेंपरिसिजे॥ ६३॥ ऋतुदीधलापांचवेतासीं॥ सत्तरवर्षें हयात्त्यासीं॥ साहावेतासींनिश्चयेंसीं॥ तेथेंसाठवर्षेंपै॥ ६४॥ सातवेतासीं दोघेंमिळती॥ पन्नासवर्षेंहयात्त्यांप्रती॥ शंकरसांगेगौरीप्रती॥ एकचित्तकरु नीपरिसिजे॥ ६५॥ आठवेतासाचीगणती॥ चाळीसवर्षेंनिश्चिती॥ पूर्णहोतांचि मरणपावती॥ जाणसत्यपैं॥ ६६॥ ऋतुदीधलानववेतासीं॥ तेथेंतीसवर्षेंनिश्च येंसीं॥ शंकर सांगे गिरिजेसीं॥ सत्यवचनपैं॥ ६७॥ दहावेतासींजाण॥ तेथेंवी सवर्षेंनिधान॥ अकरावेतासीमैथुन॥ प्राणीदहावर्षांनींमरेल॥ ६८॥ बारावे ता- सीं ऋतुदीधला॥ तेथेंबाहावर्षेंआयुष्यत्याला॥ एकउपजतांचि मेला॥ नाहीं सु खंदुःख॥ ६९॥ शंकरह्मणे गिरिजेचित्तदेई॥ सातवार पंधरातिथीपाहीं॥ या चेगुणसांगेन तेही॥ ऐकलवलाहीशुद्धमने॥ ७०॥ आणिवारसत्तावीसनक्षत्रें॥ ऐकगि रिजेनिर्धारें॥ सागतोंसमग्रतूंऐकचतुरे॥ निश्चयरूपें॥ ७१॥ पाडव्याचापंडितजाहाला॥ बिजेचागुणवंतजन्मला॥ तिजेचानक्षेभला॥ तोपरद्वारी॥ ७२॥ ऐकचवथीचाअ हंकारी॥ पंचमीचापरोपकारी॥ षष्ठीचासत्वधारी॥ सप्तमीचाभिकारीजन्मला ॥ ७३॥ अष्टमीचादरिद्रिआलाजन्मासीं॥ नवमीचाभोळाआलाजन्मासीं॥ पुढें सांगेनअनायासीं॥ ऐकगौरीतूं॥ ७४॥ दशमीचाभावीकजाण॥ एकादशीचा जाणसुगुण॥ द्वादशीचाचतुरशहाणा॥ ज्ञानकरी॥ ७५॥ त्रयोदशीचाजगमै त्र॥ चतुर्दशीचाक्रूर॥ अमावास्येचापौर्णिमेचा निसुर॥ महंतजाणतूं॥ ७६॥ जयालागलीसुवेळ॥ तोसुशब्दबोलेनिर्मळ॥ कवित्वकरीरसाळ॥ तोकवीश्वर जाणा॥ ७७॥ जयासीकुवेळलागली॥ सदांनित्यवाहेमोळी॥ नित्यहिंडेचारघे रीं॥ नेणेंतिथिवार॥ ७८॥ जयासींकुबुद्धीवेळलागली॥ कुबुद्धीतयासींसंचर ली॥ त्याचीफटफजितीझाली॥ हंसतीललहानथोर॥ ७९॥ जयांसीलागलीचंच ळवेळ॥ तेथेंजन्मलेवेडेपांगुळ॥ तेंजन्मासियेउनीनिर्फळ॥ संसारींव्यर्थजाणा॥

॥८०॥जोलाभवेळेवरीजन्मला॥ येरीवेळचांगलीलाधला॥ तोध्रुवबैसला॥अ ढळपदींसत्वर॥ ८१ ॥अमृतवेळलागलीज्याला॥ तोयोगीसाधुसंत झाला॥ का. ळवेळलागलीजयाला॥तोप्रत्यक्षमैंद जाणा॥ ८२ ॥सुवेळालागलीजयाला॥ तोगुणसांगतोंतुजला॥ त्यासिसद्गुरुभेटला॥अनंतलोचन॥ ८३ ॥जयासींलाग लीवेळचोर॥तोघेईल भलत्याचेंघर॥धरूनघालती सुळावर॥त्याचीमारतीगरदन ॥ ८४ ॥रोगवेळीहोयरोगी॥दुःखवतिडकात्याचेअंगीं॥ कायानाहींनिरोगी॥कदाही न॥८५॥जयासींलागलीमृत्युवेळ॥ तोउपजतांचीपावलाकाळ॥ पार्वतीससांगेजा श्वनीळ॥प्रेमादरें॥८६॥ जोभलतेकुयोगींजाहला॥तोअधःपातासिंगेला॥ शंक रह्मणेगौरीला॥माझेबोलाचित्तदेई॥ ८७ ॥प्रथमन्हाणआलेंतोदिवस रविवा र॥ तरीतीविधवाहोईलनार॥ प्रथमन्हाणआलेंतो दिवससोमवार॥ तरीतीवांझ नारजाणावी॥ ८८ ॥प्रथमन्हाणआलेंतोदिवसमंगळवार॥तीहोयअखंडवांझ नार॥प्रथमन्हाणआलेंतोदिवसबुधवार॥ तीसकन्याफारहोतील॥ ८९ ॥गुरुवारीं चेंफळऐका॥तीसहोतीउदंडलेंक॥ह्मणोनिशंकरसांगेविवेक॥ तेंकळलेंगिरिजेप्रती ॥९०॥प्रथमन्हाणआलेंशुक्रवारीं॥त्यानारीसहोतीकंन्याकुमरी॥ शंकरह्मणेबो गौरी॥ ऐकचित्तदेऊन॥९१ ॥शनिवारींचेंऐकफळ॥ तीनारमोठीछिनाल॥भ्रतारअ सोनियांजवळ॥चित्तठेवीपरपुरुषावरी॥ ९२ ॥ तेव्हांशंकरह्मणेवोपार्वती॥ऐकया नक्षत्राचीप्रचीती॥नक्षत्रपडल्याकपाळावरती॥ तोतीसरानयन॥ ९३ ॥ नक्षत्र पडलें जयाच्याहृदयावरी॥ तोदरिद्रिवाचेंभांडणकरी॥हातावरीपडेतोचोरीकरी ॥ नक्षत्रपडेभुजेवरी॥ तोक्षत्रियरणशूर॥ ९४ ॥डोईनक्षत्रपडेपाहीं ॥तोसदास दामोळीवाही॥जन्मजरीसुवेळाहोई॥ तरीतयासीछत्रअसे॥ ९५ ॥नक्षत्रपडे जिव्हेवरी॥ तोपापीअभक्ष्यभक्षीनानापरी॥कळीविनात्यासीनिर्धारी॥ चैनकां हीं पडेना॥ ९६ ॥ नक्षत्रपडे ओंठीसीं॥ कन्याहोतीलत्यासीं॥ नक्षत्रपडेजंघे- सी॥ तोव्यभिचारीहोय॥ ९७ ॥ नक्षत्रपडेपायासीं॥ तोघरसोडूनिजायवेगे सीं॥ एकयोगीझालेतापसी ॥ हिंडतीवनोवनीं॥ ९८ ॥ एकरागकरिती॥ एका चीगर्दनमारिती॥ ऐसीकथागिरिजेप्रती॥शंकरसांगत॥ ९९ ॥ऐसेंमीतुजसांगी तलें॥ गिरिजेऐकावेंभलें॥पिंडब्रह्मांडकेवळ॥आतांनिवांतराहीं॥ १०० ॥

आतागहीहीकथा ॥ सांगेनऐककर्मकथा ॥ स्वस्थकरोनीचित्ता ॥ आइकीजे ॥१०१ ॥ ज्याणेंसाधुनिंदाकेली ॥ त्याचीगर्भीवाचागेली ॥ ज्याणेलटकीचग्वाहीदीधली ॥ तोथोटाहोवोनिआलाजन्मा ॥ १०२ ॥ ज्याणेंवधिलीगायत्रीसी ॥ तोआलापांगुळाचेजन्मासीं ॥ ज्याणेंगोत्रहत्याकेलीपरियेसी ॥ तोघाणयाचाबैलहोय ॥ १०३ ॥ दोन्हीनेत्रबांधिती ॥ भोंवतेगरगरांफिरविती ॥ एकावरीमहाजाळघालिती ॥ तोगोण्यावाहतीबैलजाण ॥ १०४ ॥ एकासेंद्रव्यघेउनीबुडविती ॥ तेश्वानहोऊनियेती ॥ फेडावयात्तयाघराप्रती ॥ सत्यसत्यजाणपां ॥ १०५ ॥ एकलग्नकरूनिस्त्रीसिंसांडिती ॥ तोफिरेदेशावराप्रती ॥ लागतीतिडकात्याप्रती ॥ वायांव्यर्थचडफडती ॥ १०६ ॥ ज्याणेंस्त्रीहत्याकेली ॥ त्यातेंबोकडाचेजन्मासघाली ॥ सुकींजनावरेंमारिलीं ॥ तोजन्ममांगाचा ॥ १०७ ॥ ज्याणेंकन्येवरीमनसाकेली ॥ तोअंधळाजाहलागर्भस्थळीं ॥ तोभोगभोगावयासंसारीं ॥ आलाअसेजन्मासीं ॥ १०८ ॥ एकलटकाव्यवहारकरिती ॥ तेहीतयाचेजन्मासयेती ॥ वेडेवांकुडेहोती ॥ पहिले जन्माचीगतिजाण ॥ १०९ ॥ जीलागलानाहींहरिकीर्तनीं ॥ तोवेश्येसीगेलाभिळूनी ॥ एकअतीतासींदुखवोनी ॥ तोहीगेलाअधःपतनींजाणिजे ॥ ११० ॥ एकसुकेपणींराहाती ॥ तोपडेचंदिखान्याप्रती ॥ पहिलेजन्मासींपापमती ॥ तोपडेनर्ककुंडीं ॥ १११ ॥ आतांगहुंधाहीकथा ॥ सांगेननारींचीव्यवस्था ॥ आतांनारीनांदतीतत्वतां ॥ कलियुगामाझारी ॥ ११२ ॥ सद्भक्तांआदरनकेलातिसीं ॥ जिणेंदाननकरूंदिल्हेंभ्रतारासीं ॥ तीडुकरीचेजन्मासीं ॥ सत्यआलीजाणपां ॥ ११३ ॥ जीभ्रताराआधींजेविली ॥ तीवनींवाघुळाझाली ॥ आपुलीविष्टाआपणभक्षिली ॥ भूकलागलीयेजन्मासीं ॥ ११४ ॥ ज्यानारीनेंभ्रतारसेवानाहींकेली ॥ तीपिंगळाहोयमोकळी ॥ तिचेअंगींभिगेपडलीं ॥ सर्वांगासी ॥ ११५ ॥ जीनारीभ्रतारासांडोनी ॥ परपुरुषआणीध्यानीं ॥ तीनारविवसीहोउनी ॥ तोंडकाळेंकरूनियां ॥ ११६ ॥ जिणेंकेलापतीचाघात ॥ तीबाळरांडहोउनीजन्मत ॥ तिच्याशब्दासींनाहींउचित ॥ ती करीदुसरीयाचीनिंदा ॥ ११७ ॥ जिचीवासनानाहींवरी ॥ गणगोतासींकिरकिरकरी ॥ हिंडवनवागुळांचेपरी ॥ ऐशारीतीनें ॥ ११८ ॥ ह्मणोनीवासनाआवरावी ॥ बहुतांपरीसांभाळावी ॥ ज्याचीत्याणेंसमजावी ॥ बहुतप्रकारें ॥ ११९ ॥ वासनाआंव

रिलीनाहींरावणें॥अवघेंराज्यगमाविलेंत्यानें॥ परीतोहिंडलाकर्मानें॥वर्षा नुवर्षजाणपां॥१२०॥एकोत्तरशेंकौरवजाण॥दुर्योधनासीं आणिलेंउणें॥ बुडविलेंवासनेनें॥तोछळितोसर्वांसीं॥१२१॥वासनाधरियेलीबळकट॥आ पुलेदेहींकर्वतघातलानीट॥कापिन्नलेमदमत्सरछट॥वासनादृढकरूनियां॥ १२२॥एकसबळमन्नाचक्रवर्ती॥आपुलेदेहघातलेंशस्त्रीं॥ वधिलें अहंकार दुर्मती॥ मदमत्सरजयानें॥१२३॥ऐसेंहेंगर्भकांड॥ हें ऐकतांदोषहोयखंड ॥भवरोगीकरूनियांअखंड॥आपल्यापदींमिळवीतसे॥१२४॥ इतिश्रीगर्भ कांडेईश्वरपार्वतीसंवादसंपूर्ण॥ ॥श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु॥ ॥

इतिगर्भकांडगर्भावळीसमास.




## अथस्फुटज्योतिषप्रारंभः

अमृतसिद्धियोग- आदित्यवारीं हस्त, गुरुवारीं पुष्य, बुधवारीं अनुरा धा, शनिवारीं रोहिणी, सोमवारीं सौम्य म्हणजे मृग, कोणी श्रवणही घेता त, शुक्रवारीं रेवती, मंगळवारीं अश्विनी, यावारीं हींनक्षत्रें आलीं म्हणजे अमृतसिद्धियोगजाणावा.

वर्ज्यअमृतसिद्धियोग-गुरुवारींपुष्यनक्षत्र असतां अमृतसिद्धियोगख रा, परंतुविवाह म्हणजेलग्न केलें असतांसाहामहिन्यांनीं उभयतांस मृत्यु

शनिवारीं रोहिणी असतां प्रयाण केलें तर मृत्यु, मंगळवारीं अश्विनी अस तां गृहप्रवेश केला तर षण्मासांत मृत्यु जाणावा.

मृत्युयोग:- रविवारीं अनुराधा, सोमवारीं उत्तराषाढा, मंगळवारीं शततारका, बुधवारीं अश्विनी, गुरुवारीं मृगशिर, शुक्रवारीं आश्लेषा, शनिवारीं हस्त, या वारीं हीं नक्षत्रें आलीं असतां मृत्युयोग जाणावा. तो सर्व कर्मांस वर्ज्य करावा.

दग्धयोग:- बुधवारीं तृतीया, मंगळवारीं पंचमी, गुरुवारीं षष्ठी, शुक्रवारीं अष्टमी, सोमवारीं एकादशी, शनिवारीं नवमी, रविवारीं द्वादशी या प्रकारें योग आले ह्मणजे दग्धयोग जाणावा.

यमघंटयोग:- रविवारीं मघा, सोमवारीं विशाखा, मंगळवारीं आर्द्रा, बुधवारीं मूळ, गुरुवारीं कृत्तिका, शुक्रवारीं अनुराधा, शनिवारीं हस्त, याप्रमाणें योग आला असतां यमघंटयोग जाणावा.

योगफळ:- यमघंटावर गमन केलें असतां मरेल. गृहप्रवेश केला तर कुलक्षय होईल. कांहीं देवादिकस्थापना केल्यास मरण येईल. उपजलेलें बालक मरेल असें जाणावें.

प्रयाणास उक्त नक्षत्रें:- अश्विनी, अनुराधा, रेवती, मृग, मूळ, पुनर्वसु पुष्य, श्रवण, हस्त हीं नक्षत्रें प्रयाण करावयास योग्य जाणावीं.

मृग, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, हस्त, अनुराधा, श्रवण, मूळ, धनिष्ठा, रेवती, यांवर प्रयाण केलें असतां कार्य करून त्वरित घरीं येईल.

ध्रुवस्थीर नक्षत्रें:- तीन उत्तरा ह्मणजे उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी, भास्कर, ह्मणजे सूर्य हीं ध्रुवस्थीर संज्ञक नक्षत्रें जाणावीं. यांवर घरें, देउळें, अनेक सुखासनें, यांचा आरंभ केल्यानें सुखप्रासी होईल.

मघा, मृगशिर, हस्त, स्वाती, मूळ, अनुराधा, रोहिणी, रेवती. तीन उत्तरा. हीं नक्षत्रें कोणत्याही शुभकार्याचे आरंभास, अथवा विवाहास, किंवा कन्यावरणास, अथवा शेतांत बीज पेरण्यास, किंवा कांहीं वस्तू संग्रह कर

ण्यास, अथवा गृहप्रवेश, किंवा ग्रामप्रवेश करण्यास प्रशस्त धरिली-
आहेत असें जाणावें.

चरचल नक्षत्रें:- स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हीं चर
चल संज्ञक नक्षत्रें जाणावीं.

अंधनक्षत्रें. रोहिणी अंध, मृगशीर्ष मंद, आर्द्रा मध्यलोचन, पुनर्वसु
सुलोचन, याप्रमाणें अठ्ठावीस नक्षत्रें अभिजित् सह गणावीं. तें अभिजि
त् उत्तराषाढा पुढें गणून नंतर श्रवण, धनिष्ठादिक गणावीं. ह्मणजे अठ्ठावी
स होतात. याप्रमाणें पहावें.

उग्रक्रूरलघु नक्षत्रें:- मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, भरणी, हीं नक्षत्रें उग्रक्रूर
पुष्य, अश्विनी, हस्त, हीं नक्षत्रें लघुक्षिप्र जाणावीं.

ध्रुवस्थिर मृदुमैत्र नक्षत्रें:- रोहिणी, तीन उत्तरा, चित्रा, अनुराधा, रेव
ती हीं नक्षत्रें ध्रुवस्थिर, मृदु मैत्र जाणावीं.

तीक्ष्णदारुण नक्षत्रें:- आर्द्रा, ज्येष्ठा, मघा, मूळ, आश्लेषा, पूर्वा, हीं न
क्षत्रें तीक्ष्ण दारुण संज्ञक होत.

धान्यमर्दनास वार:- रविवारीं अंश १०, सोमवारीं १६, बुधवारीं ३, शनि
वारीं ८, मंगळवारीं १२ याप्रमाणें धान्य कमी होईल. गुरुवारीं आणि शु
क्रवारीं मळणी काढून धान्य मोजलें असतां भाग जात नाहीं. यास्तव चां
गली दिनशुद्धी पाहून मळणी काढावी.

गमनास वर्ज्य नक्षत्रें:- तीन पूर्वा ह्मणजे पूर्वा फाल्गुनी, पूर्वाषाढा, पू
र्वाभाद्रपदा, मघा, ज्येष्ठा, भरणी, आपलें जन्मनक्षत्र, कृत्तिका, आश्ले
षा, स्वाती, विशाखा, चित्रा इतक्या नक्षत्रीं कधींही गमन करूं नये.

गांवास गेला तो कधीं येईल याचा प्रश्न:- शुक्लपक्षींच्या प्रतिपदे पा
सून वर्तमान तिथीपर्यंत तिथी गणाव्या. आणि सूर्योदयापासून तत्काळपर्यं
त जे प्रहर झाले असतील ते मिळवावे. आणि दिवस नक्षत्रांची संख्या मिळ
वून रविवारपासून वारांचीही संख्या मिळवावी. त्या एकंदर संख्येला साता
नीं भाग देऊन जे अंक राहातील त्यांचा प्रश्न पहावा. एक अंक उरला तर त्या

चठिकाणीं आहे २ उरलेतर स्फरवें करून येत आहे · ३ उरले तर अर्धमार्गांत आला आहे· ४ उरलेतर आपल्या गांवचे आसपास नजीक आला आहे· ५ अंक राहिले तर फिरून माघारा गेला· ६ राहिले तर कांहीं आजारा मुळें कुशपावत आहे· आणि जर बरोबर भाग तुटला तर येत नाहीं ह्मणोन सांगावें·

घबाड मुहूर्त:- सूर्यनक्षत्र ह्मणजे महानक्षत्रापासून दिवस नक्षत्र पर्यंत गणून जी संख्या येईल तिला तिहींनीं गुणावें· आणि त्यांत शुक्लप्रतिपदेपासून विद्यमान तिथीपर्यंत तिथी मिळवून एकंदर संख्येस ७ नीं भाग द्यावा· तीन शेषबाकी राहिलेतर त्यादिवशी घबाड मुहूर्त आहे असें जाणावें· तें सर्व व्यापारांत योग्य होय·

·आडळ भ्रमण:- सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों गुणून सातानीं भागावें·३,६ राहिलेतर भ्रमण; २ अथवा ० आलें तर अदळ जाणावें· भ्रमण पशुकर्मास आणि अडळ स्थावरास घ्यावें·

·चतुष्पाद घ्यावयास मुहूर्त:- सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्रा पर्यंत गुणून जी संख्या येईल · ती सातानीं भागावी· शेषराहील त्याचाक्रम आंत ४ बाहेर ३ याप्रमाणें आंतबाहेर चाल पाहून पश्वादिकांचा संग्रह करावा· आंतले चालीवर आणिलें असतां राहील · आणि बाहेर चालीवर आणिलें असतां जाईल · असें जाणावें·

शेतांत नांगर धरावयास मुहूर्त:- सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों गुणून विद्यमान तिथीव वार मिळवूनन वानीं भागद्यावा आणि शेष अंक ७ राहिले तर हे वर ह्मणावें· हेवसवर शेतांत नांगर जुंपावा·

पालकारोहणास मुहूर्त:- सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्र पर्यंत गणून पूर्वेपासून चार दिशांस पांचपांच नक्षत्रें देऊन मध्यें ७ द्यावीं· ह्मणजे सत्तावीस झालीं· ज्या दिशेस भाग पुरेल तें फळ पालकारोहणाचें जाणावें·

फळ:- पूर्वभागीं आरोग्य, दक्षिणेस मरण होय; पश्चिमेस कृशांग, उत्तरेस व्याधि होय· मध्यें आयुष्यमान होय·

मृग, अश्विनी, धनिष्ठा, रेवती, पुष्य, चित्रा, शत तारका, अनुराधा, तीन

न उत्तरा, स्वाती, हस्त, हीं नक्षत्रें पालका रोहणाचीं; यास ग्रहबल शुभग्रह गुरु लग्नीं असावा आणि ३ सहा असे पापग्रह असावे तर पालका रोहण गृहीं धन कनक समृद्धि होईल.

अग्नीकोठें आहे तो पहाणें :- ज्या तिथीस पाहाणें त्या तिथी पर्यंत शुक्ल प्रतिपदादि तिथी गणून त्यांत एक अधिक मिळवावा. आणि त्या दिवशीं जो वार असेल तोही त्यांत मिळवून एकंदर संख्येस चहूनीं भागावें; आणि शेष गुण ह्मणजे तीन व अष्ट ह्मणजे ० असें आलें असतां पृथ्वीवर अग्नि आहे असें जाणावें. तो होमास योग्य जर १ किंवा २ राहिले तर आकाशीं व पाताळीं; त्यावर होम केला असतां प्राण आणि अर्थ यांचा नाश करील.

कोणग्रहाचे मुखीं आहुती :- सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रा पर्यंत गणून सूर्यापासून क्रमानें प्रतिग्रहास तीन तीन नक्षत्रें दिल्यानें जेथें भाग पुरेल त्या ग्रहाचे मुखीं आहुती आली असें जाणावें.

शुभाशुभफळ :- सूर्य, शनि, राहू, मंगळ, केतु, या पांच ग्रहांचे मुखीं आहुती आली असतां हवन कर्त्यास अकल्याण कारक होय. आणि चंद्र, बुध, गुरु, शुक्र या चार ग्रहांचे मुखीं आली असतां उत्तम फळ प्राप्ती होय. ह्मणून अशा प्रकारें हवनचक्र पाहून अनेक प्रकारचा नैमित्तिक होम केल्यानें सुख प्राप्ती होय.

घातचतुष्टयंघातवार :- मेषराशीचा घातवार रविवार, सिंह, कन्या, वृषभ, यांचा शनिवार; मिथुन राशीचा सोमवार; मकर राशीचा मंगळवार; कर्काचा बुधवार, तूळ, कुंभ, यांचा गुरुवार; धन, वृश्चिक, मीन यांचा शुक्रवार या प्रमाणें राशींचे घात वार जाणावे.

घाततिथी :- धन, मीन या दोन राशींची घाततिथी द्वितीया वृषभ, कुंभ यांची चतुर्थी; मेष, कर्क यांची षष्ठी; कन्या, मिथुन यांची अष्टमी; वृश्चिक, सिंह यांची दशमी; मकर, तूळ यांची द्वादशी या प्रमाणें घात तिथी जाणाव्या.

घातनक्षत्रें. मेष राशीचें घात नक्षत्र मघा, वृषभ हस्त, मिथुन स्वाती

कर्क, अनुराधा; सिंह, मूळ; कन्या, श्रवण; तूळ शततारका; वृश्चिक रेवती; धन रोहिणी; मकर भरणी; कुंभ आर्द्रा; मीन आश्लेषा; या प्रमाणें घातनक्षत्रें जाणावीं·

घात चंद्र = मेष१ वृषभ५ मिथुन९ कर्क२ सिंह६ कन्या१० तूळ३ वृश्चिक७ धन४ मकर८ कुंभ११ मीन१२ या प्रमाणें ज्याराशी पुढें जो अंक आहे तो त्या राशीचा घात चंद्र जाणावा·

फळ = हे सांगितलेले चार प्रकार घाताख्य यांचा दोष कोणे ठिकाणी पहावा तो प्रकार·(कलह) कज्जा करणें, प्रयाण परदेशीं गमन करणें, राजदर्शनास जाणें, हें एक युद्ध सेवा प्रकरणीं वर्ज्य शुभकर्मी याचा दोष नाहीं असें जाणावें·

राशींचे स्वामी = सिंह राशीचा स्वामी रवि, कर्काचा चंद्र, मेष वृश्चिक यांचा मंगळ, कन्या मिथुन यांचा बुध, धन मीन यांचा गुरु, तूळ वृषभ यांचा शुक्र, मकर कुंभ यांचा शनि, या प्रकारें करून बारा राशींचे स्वामी जाणावे·

चंद्र कोणे दिशेस आहे हें पाहणें = मेष, सिंह आणि धन या राशींचा चंद्र पूर्वेस आहे· असें जाणावें· वृषभ, कन्या आणि मकर या राशींचा चंद्र दक्षिणेस, कुंभ, तूळ आणि मिथुन या राशींचा चंद्र पश्चिमेस, कर्क वृश्चिक, मीन या राशींचा चंद्र उत्तरेस आहे· या प्रमाणें राशींचे चंद्र जाणावे·

फळ = सन्मुख चंद्र असतां प्रयाण अथवा कांहीं कार्यारंभ केल्यास· अर्थलाभ होईल· दक्षिणेस असल्यास सुख, संपदा होईल· पाठीमागें असल्यास प्राणनाश करील· आणि वाम भागीं असल्यास धनक्षय होईल· यास्तव चंद्र पाहून सर्व कार्यास आरंभ करावा·

चंद्र कोठें आहे तो पाहणें = ज्या तिथीस चंद्र कोठें आहे असें पाहाणें असेल त्या तिथी पर्यंत शुक्लपक्षादि तिथी गणून त्यांची पांचपट करावी· आणि त्यांत कृत्तिकापासून दिवस नक्षत्र पर्यंत गणून जी संख्या होईल तितकी मि

ळवून त्यांत १२ अंक मिळवावे आणि एकंदर संख्येस नवानी भागावें आणि शेष अंक राहील त्याचरून चंद्रमा कोठें आहे हा निश्चय जाणावा. १ किंवा ४ अथवा ७ शेष राहातील तर जळीं चंद्र आहे असें जाणावें. व २, ५. ८ राहिले तर स्थळीं चंद्र आहे. ६, ९ राहिले तर आकाशीं चंद्र आहे असें जाणावें.

फळ = चंद्र जळीं असतां कार्यसिद्धि. स्थळीं असतां कार्य नाश, आकाशीं असतां मध्यम फळ जाणावें.

पंचक पाहणें = शुक्ल पक्ष आदि करून ज्या दिवशीं पाहणें त्याच्या पूर्व तिथीपर्यंत तिथी गणून ज्यावेळीं पाहणें त्यावेळीं चें लग्न ही त्यांत मिळवून एकंदर संख्यांकास नवांनीं भागद्यावा. आणि शेष अंक राहील त्याजवरून पुढें सांगितल्या प्रमाणें पहावें. १ मृत्यु, २ अग्नि, ३ निष्पंचक, ४ राजपंचक, ५ निष्पंचक, ६ चोरपंचक, ७ निष्पंचक, ८ रोगपंचक, ९ निष्पंचक, या प्रकारें जाणावीं.

फळ = प्रयाणास चोरपंचक वर्जावें. व्रतबंधादि संस्कारकर्मास रोगपंचक वर्जावें. राजसेवेस राजपंचक वर्जावें. गृहारंभास अग्निपंचक वर्जावें. आणि मृत्यु पंचक सर्व कर्मास वर्जावें.

लग्न पाहण्याचा प्रकार = मीन, मेष हीं लग्नें चार चार घटिका, वृषभ कुंभ हीं दोन लग्नें साडेचार साडेचार घटिका, मिथुन, मकर हीं पांच पांच घटिका. कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन, हीं सहा लग्नें साडेपांच साडेपांच घटिका या प्रकारें करून बारा लग्नें जाणावीं.

याचा प्रति दिवशीं भोगावयाचा प्रकार = मीन, मेष, हीं दोन लग्नें संक्रांतीच्या दिवसापासून प्रति दिवशीं आठ पळें भोगून एक महिन्यानें संपतात. मग दुसरी संक्रांती लागते तेव्हां तें लग्न सूर्योदयीं प्राप्त होतें, त्याचाही क्रम अशाच प्रकारें पहावा. वृषभ कुंभ हीं दोन लग्नें नऊ नऊ पळें भोगितात. मकर, मिथुन हीं दोन लग्नें दररोज दहादहा पळें भोगितात. कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन हीं सहा लग्नें दररोज अकरा अकरा पळें भोगितात. या प्रमाणें लग्न भोग जाणावें.

चतुष्पद पशु देण्या घेण्यास मुहूर्त= शनिवार, सोमवार, बुधवार, या दिवशीं अथवा नक्षत्रें वर्ज आहेत तीं कोणेही वारीं असतां मूळ, भरणी चित्रा, तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण. अढळचक्र, बाहेरचाल, अष्टमी तीथ, रिक्तातिथी, कल्याणी (ह्मणजे भद्रा) संक्रांती, सिंहलग्न, कुलिक, व्यतिपात वैधृति, आर्द्रा, पौर्णिमा, अमावास्या यांवर गाई, ह्मशी, शेळ्या, घोडे, मेंढ्या आदिकरून चतुष्पाद जनावरें घरीं आणूं नये. कोणी ग्रंथांतर मतें सोमवारीं मेंढी, बुधवारीं गाय, शनिवारीं घोडे घरीं आणूं नये.

तिथींचीं लक्षणें= प्रतिपदा नंदा, द्वितीया भद्रा, तृतीया जया, चतुर्थी रिक्ता, पंचमी पूर्णा या प्रमाणें तीन क्रमानीं पंधरा तिथींस नांवें जाणावीं. शुक्लपक्षीं ज्या अधम त्या कृष्णपक्षीं सम. ज्या कृष्णपक्षीं अधम त्या शुक्लपक्षीं सम. जाणाव्या.

कार्यविचार= चित्रें लिहावीं, माळवदें, उपरिया, सोपे, दुर्ग, देउळें, बावी, तळीं, अश्वशाळा, गजशाळा, आड, गाईचे वाडे, शेळ्या, मेंढ्यांचे वाडे, शेतें, अलाटी, जिराटी, हळद, मके, केळीं, ऊंस, आदिकरून, नाटक शाळा, शुभकृत्यें, अलंकार, घोडे, रथ, पालखी हीं सकल कामें नंदातिथीस करावीं.

पौष्टिक, शुभकर्में, औषधें, शिल्पकर्म, सुतारकाम, स्वारीस जाणें, यात्रा, विवाह, शुभकृत्यें, पाषाणकृत्यें हीं सर्व कर्में भद्रा तिथीस करावीं.

जयाव रिक्ता तिथीस कोणती कार्यें करावीं तीं= चाकर, बटिक. गुलाम, रत्नें, मोत्यें, सोनें, रुपें, तांबें, कांच, चुडे, गाई, ह्मशी, उंट, बैल, गाडा, शेळी, मेंढी, उत्तमवस्त्रें, घ्यावीं द्यावीं. रिक्ता तिथीस घात, पातक, वध, बंध, विषप्रयोग, जळितमार, वस्त्रें, लोखंड, कृत्यें, उग्रकृत्यें, व दुष्टकृत्यें हीं कर्में करावीं.

पूर्णा तिथीस काय करावें तें= मंगलकार्यें, विवाहादिक, यात्रा, पौष्टिक, ह्मणजे अनेक प्रकारें ग्रहमखादिक शांति करावी आणि अमावास्येस सर्व पितृकर्में मात्र उक्त. अन्य सर्व कर्में पूर्णा तिथीस वर्ज्य करावीं. असें जाणावें.

## वारांची फळें सांगतों.

**रविवारीं कृत्यें**:- राज्याभिषेक, अनेक उल्हास कृत्यें, सेवा कर्म, पत्रक कर्म, मंत्रोपदेश, अनेक औषधी, साधन, शास्त्रकर्म, स्वर्ण, तांबें, कंबलादिक, व्यापार म्हणजे अनेक प्रकारची दुकानें, काष्टसंग्रह, आणि कलह, संग्राम हीं कर्मे रविवारीं करावीं.

**सोमवारीं कृत्यें**:- शंखाचे अलंकार, उदकाचीं कृत्यें, मोत्यें, रुपें, ऊस लावणे, स्त्रीभोग, वृक्षारोपण, उदक, भूषणें, मळे, बागाईत, पुष्पांचीं आभरणें, शेज, गायनकला, यज्ञक्रिया, गायन, अंबरें, हीं सर्व कृत्यें सोमवारीं करावीं.

**भौमवारीं कृत्यें**:- अनेक प्रकारे भेद, फितुर, खोटें कर्म, विषप्रयोग, अग्नि कृत्यें, शस्त्रघात, बंधनादि प्रकार, अनेक घातकर्मे, शठत्वकर्मे, दंभ, अहंकार, सेनेंत प्रवेश, स्वर्ण, आणि पोंवळें यांचा व्यापार, इतकीं कृत्यें भौम म्हणजे मंगळवारीं करावीं.

**बुधवारीं कृत्यें**:- अनेक विद्यांचा निपुण अभ्यास करणें, आणि नाना प्रकारचे अभ्यास करणें, अध्ययन करणें, नाना प्रकारची कुशलता शिकणें, सुतारकाम, लेखनविद्या सर्व प्रकारची शिकणें, धातुक्रिया, अनेक युक्ती संधि प्रकार, स्वारीस जाणें वयेणें, अनेक वाद विवाद हीं कर्मे बुधवारीं करावीं.

**गुरुवारीं कृत्यें**:- अनेक प्रकारचे धर्म करणें, औषधें, पौष्टिकें, यज्ञादि कर्मे, विद्याभ्यास, मंगल कृत्यें, स्वर्णाचे अळंकार व अनेक प्रकारची नवीन वस्त्रें ग्रहण करणें, गृहप्रवेश करणें, यात्रेस जाणें, स्थावर बसणें, औषध घेणें, भूषणें ल्यावीं हीं सर्व कर्मे गुरुवारीं करावीं.

**शुक्रवारीं कृत्यें**:- स्त्रीभोग, गायनकला, शय्या, हिरे, रत्नें, नानावस्त्रें, अलंकार, भूषणें, गाई, म्हशी, यांचा संग्रह, द्रव्यसंग्रह, शेताचीं कामें हीं सर्व कृत्यें शुक्रवारीं केल्यानें लाभदायक होतील.

**मंदवारीं कृत्यें**:- लोखंडी कृत्यें, शिशाचीं कृत्यें, अथवा दास दासींचा संग्रह, अनेक पापकर्मे, स्नेहकर्मे, विषकृत्यें वाचें, गृहप्रवेश, बंधनादि कर्मे,

स्थिर कर्माची दीक्षा, हीं कृत्ये मंद म्हणजे शनिवारीं करावीं.

कौणत्या नक्षत्रीं कोण तें कार्य करावें तें = रोहिणी, तिन्ही उत्तरा, हीं ध्रुव नक्षत्रें, यांवर बीजें पेरावीं, गृहग्राम प्रवेश करावा, आराम जागा निर्माण करावी, एवं सर्व स्थिर कर्में करावीं.

मृदु नक्षत्रीं कृत्यें = चित्रा, अनुराधा, मृग, रेवती. हीं मृदु मित्र नक्षत्रें यावर मित्रत्व, रतिभोग, विलास, नाना भूषणें धारण, नाना वस्त्रें ग्रहण, व मंगल कार्यें करावीं.

लघु नक्षत्रीं कृत्यें = अश्विनी, पुष्य, हस्त, अभिजित्, हीं ४ लघुनक्षत्रें यांवर दुकानदारी, अनेक भूषणें, नाना कला, अनेक भोग, औषधी सेवन, सुतारकामाचा अभ्यास - हीं सर्व कर्में करावीं.

चर नक्षत्रांवर कृत्यें = श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती, हीं पांच नक्षत्रें चर, यावर अनेक वाहनावर आरोहण करावें. व अनेक बाग बगीचे आरामवनें, अग्रामध्यें प्रवेश करावा.

उग्रनक्षत्रांवर कृत्यें = तीन पूर्वा, भरणी, मघापंचक, हीं नक्षत्रें उग्र, या नक्षत्रांवर षठत्व, विषघातादि प्रयोग, मरण, शस्त्रकर्म, अग्नि दाहादिक हीं कर्में करावीं.

मिश्रनक्षत्रांवर कृत्यें = कृत्तिका, विशाखा हीं दोन नक्षत्रें मिश्र संज्ञक - यावर मित्रता व शिपाई, अग्निकृत्यें व साधारण कार्यें करावीं.

तीक्ष्णनक्षत्रांवर कृत्यें = मूळ, ज्येष्ठा, आरद्रा, आश्लेषा हीं तीक्ष्ण दारुण नक्षत्रें. यांवर भूत यक्षादि मंत्रसाधनें आणि भेद बंधनें हीं कर्में करावीं.

कोणते करणावर कोणतीं कार्यें करावीं = ववादि अकरा करणाचीं नावें अनुक्रमें बव, बालव, कौलव, तैतिल, गरज, वणिज, विष्टी, शकुनी, चतुष्पाद नाग, किंस्तुघ्न, एवं ११ आहेत यांचा क्रम शुक्लपक्ष, प्रतिपदेचे पूर्व दळीं बव करण आणि उत्तर दळीं ही बव; द्वितीया पूर्वदळीं बालव, तृतीया पूर्वदळीं तैतिल, उत्तरदळीं गरज, चतुर्थी पूर्वदळीं वणिज. उत्तर दळीं विष्टी, एवं अष्टावृत्तिः व द्यचतुर्दशी उत्तरदळीं शकुनी अमावास्या पूर्व उत्तर दळीं चतुष्पादनाग शुद्ध

एक किंस्तुघ्न एव चार ध्रुवक.

स्थिर चर कर्मे बव करणीं करावी. बालव करणीं स्वहित, कौलवीं स्त्री समागम, प्रीति, तैतिलीं, शुभगत आश्रय करावे. गरज करणीं, बीजाश्रय कर्म करावें, वणिज करणीं वाणिज्य म्हणजे व्यापार स्थिरकर्मे करावीं. विष्टिकरणीं विष, अग्नि, शस्त्रें, क्रूरकर्मे करावीं. मंत्र औषधी, शकुनी करणीं कर्मे करावीं; गाई, ब्राह्मण, राजसेवा, पितृकर्मे, चतुष्पाद करणीं करावीं. नाग करणीं सौभाग्यहरणादिक दारुण कर्मे करावीं. किंस्तुघ्न करणीं शुभ, मंगल, स्थिर अशीं कर्मे करावीं.

अधोमुख नक्षत्रावर कृत्यें = मूळ, कृत्तिका, मघा, विशाखा, भरणी आश्लेषा, तीन पूर्वा हीं अधोमुख नक्षत्रें यांजवर विहिरी, कूप, तळीं, अनेक पेवें आदिकरून करावीं. ठेवणी ठेवावीं. अथवा काढावीं, द्यूत खेळावें, नाना प्रकारचीं बलिदानें, करावीं. अनेक प्रवेश व गणितारंभ करावा.

तिर्यङ्मुख नक्षत्रांवर कोणतीं कार्यें करावीं = ज्येष्ठा, पुनर्वसु, हस्त अश्विनी, मृग, अनुराधा, स्वाती. चित्रा हीं सात नक्षत्रें यांवर घोडे, नाना वाहनें उंट, गाढव, आदिकरून जनावरें यांचें पालन अधिकार परत्वें करून आरोहण करावें, अनेक मंत्र चालवावें. नागर धरावे, याप्रकारचीं कृत्यें या नक्षत्रांवर करावीं.

ऊर्ध्वमुख नक्षत्रावर कार्य करावीं = पुष्य, आर्द्रा, श्रवण, उत्तरा. शततारका, रोहिणी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, धनिष्ठा हीं नऊ नक्षत्रें ऊर्ध्वमुख होत. यांवर गुढिया, तोरणें, पताका, शिखरें, देवालयाचीं कामें, आगम छाया, निवास, इत्यादि हितकारक कृत्यें व राज्याभिषेक. कृत्यें वरसांगितल्या नक्षत्रांवर करावीं.

नष्टवस्तु प्रश्न = तिथी, वार, नक्षत्रें, लग्न, व तीन एकत्र करून पांचानीं भागावें. शेष १ उरला तर पृथ्वींत आहे; २ उरले तर जळांत आहे न लभ्यते; ३ उरले तर आकाशीं आहे न लभ्यते. ४ उरले तर तेज राजानें वस्तू नेली; पांच उरले तर वायूच्या ठायीं, वस्तू आहे. शोक सांगत्ये असें जाणावें.

गर्भिणीप्रश्न- गर्भिणी स्त्री ज्या लग्नावर प्रश्न करील त्या लग्नीं ग्रहपा हावे. लग्नापासून तृतीय, पंचम, सप्तम आणि नवम इतक्यां स्थानीं रवि, गुरु, भौम हे ग्रह असेल तर पुत्र होईल आणि त्या स्थानीं अन्य ग्रह असल्या वर कन्या होईल.

मुष्टिप्रश्न- पृच्छकाचे मुष्टींत कोणते वर्णाची वस्तू आहे ती सांगणें. मेषलग्न असेल तर पिंवळी, मिथुन निळी, कर्की पांढरी, सिंहीं धूम्र वर्णाची; कन्यालग्नीं नीळ मिश्रित; तुळीं पीत मिश्रित; वृश्चिकीं ताम्र मिश्रित; धनींपीत मिश्रित; मकरीं कृष्णवर्ण; कुंभीं लोहमय, मीनीं पीत वर्ण वस्तू आहे असें जाणावें.

अंकप्रश्न- प्रश्न पृच्छका कडून अष्टोत्तर शताचे अंकांतून एके अंकाचें नांव घेववावें. आणि त्यास बारानीं भागावें. शेष उरेल त्यांचीं फळें १ किंवा ९ अथवा सात उरले तर विलंबें कार्य होईल. शेष ८, ४, १०, ५ उरले तर नाश; ११ सिद्धि; ३ वृद्धि; २, ६, १२ उरले तर शीघ्र काळीं होईल.

रोगीप्रश्न- तिथि, वार, नक्षत्रें, लग्न आणि प्रहर प्रति दिवशीं एकत्र करून त्यास आठानीं भागावें शेष उरेल त्याचें फळ शेष ३ अथवा ७ उरले तर देवाची बाधा; २, ८ उरले तर पितरांची बाधा; ६, ४ उरले तर भूतबाधा १, ५ उरले तर ... नाहीं.

प्रस्थान ठेवण्यास मुहूर्त- सुमुहूर्तावर गमन करण्यास अ...व आहे तर प्रस्थानीं वस्तू ठेवणें, त्या वर्णपरत्वें सांगतो. ब्राह्मणास यज्ञोपवीत, क्षत्रियास शस्त्र, वैश्यांस मधु, आणि शूद्रास फळ या प्रमाणें जाणावें, आणि ...सवर्ण वर्ण धान्य, वस्त्र, हें उक्त होय.

प्रस्थान किती दिवस उपयोगीं पडतें- राजानीं प्रस्थान ठेविल्यापासून दहा दिवस, अन्यास पांच दिवस, तो मुहूर्त उपयोगीं पडतो. परंतु वस्तु प्रस्थानीं अर्धफळ जाणावें.

इति स्फुटज्योतिष समाप्त.



## मयुरध्वज आख्यान प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्लोक ॥ ॥ वंदोनि विघ्नहरणा प्रतिपूर्णभावें॥ सप्रे मकृष्णचरणांप्रणिलें स्वभावें॥ संतांप्रतीनमुनियां मगआदरानें॥ सद्भक्तकीर्ति वदनों अतिसादरानें॥ १ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ सोमवंशीं विख्यातभूप राणा॥ पुण्य वंतसात्वीक धर्मजाणा॥ चौघे बंधूसादरसेवनार्सी॥ रमानाथर स्वपाद्यज्यासीं॥ २ ॥ ॥ साकी ॥ ॥ गोत्रजाप्रते दुरित निरसना, तेणं हयमे धातें, ॥ आरंभुनियां अश्वसोडिला पृथ्वीजिकायातें ॥ ३ ॥ पार्थासह श्री कृष्णाजित्यातें, रक्षित चालतिमार्गे॥ हंसध्वज अनुग्शाल्वादिकते, अपार भूपतिसंगें॥ ४ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ बभ्रुवाहनाचें राज्य टाकून॥ पुढें चालिलाशामकर्ण॥ तों निकडूनिदुसरायज्ञाश्वजाण॥ आलामयुरध्वजाचा॥ ५॥ ताम्रध्वजतयाचापुत्र॥ महाप्रतापीकीर्तिमंत॥ तोत्यातेंरक्षकअतिसमर्थ॥ तेणेंपांडवाश्व धरियेला॥ ६ ॥ ॥ आर्या ॥ ॥ कृष्णाह्मणेपार्थातें, समयपुढेंमज कठीणहा वाटे॥ ताम्रध्वज अतियोद्धा, लाविलसकळांहि मृत्युच्यावाटे ॥७॥ ॥दिंडी॥ ॥शिखीकेतू भूपती वीरसाजे॥ सत्वधीरभक्त तोमहींगाजे॥ रत्नपूरींनर्मदातिरींयज्ञ॥ आरंभूनीसोडिलाश्यामकर्ण॥ ८ ॥ ॥ आर्या ॥ ॥ ऐसेंबोलतअसतां, ताम्रध्वजहोय सोडिताबाण॥ तेदुःसहर्वीरातें, होउनि

आकर्षितीक्षणेंप्राण ॥ ९ ॥ ॥श्लोक॥ ॥उभयदळमिळालेंकंदनाघोरघायीं॥ धडकतिरणवाद्यें नादव्योमींनमायी॥ घडघडरथनेटें कंपतेव्हांक्षितीला॥ उरग पतिमनींतोमानिमोठ्याभितीला॥ १०॥ ॥ साकी॥ ॥ताम्रकेतुनेंवीरसर्वहीं, बाणींजर्जर केले॥ ऐसेंपाहुनपुढेंधांवला, मदनपुत्र त्यावेळे ॥ ११ ॥ ॥ आर्या ॥ ॥क्षोभुनि अतिशय तेव्हां, बोले अनिरुद्ध ताम्रकेतूतें ॥ सरलें तवा युयेथें पाठविलेंम्हणुनि अंतकेतूतें॥ १२॥ ॥दिंडी॥ ॥ऐसेंवाक्यबोलुनी तयेवेळां॥ दिव्यबाणें भेदलें उरस्थळा॥ तेणें आलीत्याक्षणीं घेरित्यासीं॥ तयासं धीं भंगिलें वाहिनीसीं॥ १३ ॥सैन्यतेव्हांपाडिलें तीनक्षोणी॥ रक्तसरिता वाहिल्यातयेक्षणीं॥ ऐसेंदृष्टीपाहतां ताम्रकेतू॥क्षोभुनीयां मांडिलाप्रळयअंतू ॥ १४ ॥ ॥ श्लोक॥ ॥बळेंसोडुनीदिव्यशासायकातें॥महीपाडिलेंत्याउरखानायकातें॥ असेंदेखतां कर्णसूनूसकोपें॥ करीत्यान्वियास्यंदनाघातरोपें॥ १५ ॥ ॥ छंद ॥ ॥ मगदुजारथीं राजनंदनू॥ बसुनियां करी घोरकंदनू॥ तोहि छेदिला क्षणनलागतां॥ यापरीशतागणाति मोजितां ॥ १६ ॥ ॥साकी॥ ॥ ऐसाजर्जर करुनि तयातें, अपारवधिलीसेना॥ रक्तनघाबहु पुरें दाटुनी, जातीनिजपतिभुवना॥ १७॥ ॥आर्या॥ ॥शिखिध्वजात्मज तेव्हां, पावुनि अत्यंत जाणकोपातें॥ पाडी असंख्य कटका, करुनी मूर्च्छीत कर्णपुत्रातें॥ १८॥ ॥श्लोक॥ ॥ तेव्हांपार्थस्रुतें त्वराकरुनियां ताम्रध्वजा अंबरीं ॥बाणें दिव्यतदाकरीउडवितां तोविस्मया अंतरीं॥ त्वेषेंत्याउतरोनि भूतळिं तयेंबीभत्सुपुत्राप्रती॥ पाडीलाशरदिव्यभेदुनितदामूर्च्छीनवेगेंक्षिती॥ १९ ॥ ॥ छंद॥ ॥ सात्यकीवरी सोडुनी गदा॥ मारिला महावीरतो तदा॥ यौवनाश्वहीपाडिलाशरें॥ नीलकेतुनेंमारिलें त्वरें॥ २०॥प्रळयमांडिला आजिबोलती॥ पळतिदेखुनीवीरयाप्रती॥ काळदंडसेबाणसोडुनी॥ पाडिलीक्षणेंसकळवाहिनी॥ २१ ॥ ॥ ओंवी॥ ॥पार्थासीह्मणेंजगज्जीवन॥ आपणउरलों दोघेजण॥ ताम्रध्वजप्रतापीगहन॥ नचले अभिमानयापुढें ॥ २२॥ ऐकोनि कोपलाकिरीटी॥ करूनअमोघबाणांचीवृष्टी॥ मयुरध्वजसुतातें हिंपुटी॥ केलें उठाउठी तेधवां॥ २३ ॥ ॥ आर्या॥ ॥ताम्रध्वजकीपुनियां, अद्भुत करितांपि जाहला करणी॥ खगवत

उडोनिगगनीं, धरिला अवचित पार्थ तो चरणीं ॥ २४ ॥ स्कंधीं घेउनि हरितें, उडोनि गेला नभीं विहंगतरसा ॥ क्रोधें श्रीपतिलत्ता, हाणुनि पाडी तयास असुगतसा ॥ २५ ॥ ताम्रध्वजास घेरी, येतां पडले तिघेहि भूवर ते ॥ नेणों प्राणगताच्या रीतीतें जाण जाहले वरि ते ॥ २६ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ नरवर स्फुरत तेव्हां मूर्च्छनासां वरूनी ॥ निजरथिं मग वेगें चालिला आरुढोनी ॥ परममुदितचित्तें घेउनी अश्वयुग्मा ॥ रहित कटक संगें पातला तो स्वसद्मा ॥ २७ ॥ ॥ साकी ॥ ॥ पितयालागीं हर्षयुक्त तो, सांगत थोर बढायी ॥ उभय कृष्णातें जिंकुनि समरीं, केले मूर्छित गर्यीं ॥ २८ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ वृषकेत बभ्रुवाहन मदन ॥ हंसध्वजादि सैन्य निवटोन ॥ आणिले दोनी श्यामकर्ण ॥ जाहले अश्वयज्ञ आपुले ॥ २९ ॥ ॥ छंद ॥ ॥ ऐकतां असें वृत्त भूपती ॥ कोपुनी वदे निज सुताप्रती ॥ निर्दया, धमा नष्ट तूं महा ॥ केंवि दाविशी तोंड रे अहा ॥ ३० ॥ पूर्णब्रह्म तो जाण श्रीहरी ॥ टाकिले कसे बाण त्यावरी ॥ आणिता सि त्या प्रार्थुनी जरी ॥ धन्य मानितों तूज रे तरी ॥ ३१ ॥ ॥ पद ॥ ॥ भूपती बोलत कुमरा, वोरखटें चि केलें भारी ॥ ध्रु० ॥ विधि हर सुर मुनि ज्यातें, सप्रेमें हृदयीं ध्याती ॥ निगमागम सर्वहि काळ, सत्कीर्ति जयाची गाती ॥ त्या परमात्म्यावर शर तूं, प्रेरिले सपावुन भ्रांती ॥ ॥ चाल ॥ ॥ तूं जरी प्रार्थुन त्यातें ॥ आणितासि निजसदनातें ॥ तरि होतें बहु सुखमातें ॥ सरपरता अनहितकारी ॥ भूप० ॥ १ ॥ कामदुहा सदनीं येतां, तिजकाष्टें दंडीं येलें ॥ निजभाग्यें अमृत मिळतां, संमार्जन त्याचें केलें ॥ गवसत्या करिं परिसातें, मूर्खत्वें झोकीयेलें ॥ ॥ चाल ॥ ॥ हें विपरित करणें जैसें ॥ भासे तव कृत तैसें ॥ बोलतां सद्गद ऐसें ॥ नेत्रांतुन वाहे वारी ॥ भूपती० ॥ २ ॥ ज्याच्या प्राप्तीस्तव रे, अश्वमेध केले साही ॥ परि तो प्राणविसावा, तुष्टलाच आजवर नाहीं ॥ ह्मणऊन सांप्रत हा रे, मांडिला आणिक पाहीं ॥ ॥ चाल ॥ ॥ तो करुणाघन हृषिकेशी ॥ ममहेतू पुरवायासी ॥ येत होता आज सदनासीं ॥ जो कृष्ण दासकैवारी, भूपती बोलत कुमरा ॥ वोरखटें चि केलें भारी ॥ ३ ॥ ॥ ३२ ॥ ॥ आर्या ॥ इकडे रणांत तेव्हां, सोडुन मूर्च्छेस भक्तकैवारी ॥ सावध करुनी पार्था, करुणामृतदृष्टि दुःखतें वारी ॥ ३३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ कृष्ण बोले मारुनी सर्व सेना ॥ रिपू

गेलाघेउनीश्यामकर्णा ॥ ह्मणेजिष्णूराहिलातरीयज्ञ ॥ परीयाचीतूजला ला जपूर्ण ॥ ३४ ॥ पदींप्रेमेंलागुनीदीनवाणी ॥ वदेकर्ता सर्वतूं चक्रपाणी ॥ दीन- आह्मीलागलोंतुझ्याकांसे ॥ करीआतांमानेलमनातेंसें ॥ ३५ ॥ ॥ साकी ॥ कृष्णह्मणे तोमयुरकेतू, सात्विकआणि दाता ॥ धैर्यवंत बहुसांप्रत तुजला, दाखवितोंचलआतां ॥ ३६ ॥ ॥ छंद ॥ ॥ अर्जुनाप्रतीवदुनियापरी ॥ नटत वृद्धसा विप्रतोहरी ॥ यष्टिकाकरींघेतलीतदा ॥ झोंकजातसेंचालतांसदा ॥ ३७ ॥ श्लोकः ॥ . ॥ चंद्रार्धाकृतिवांकलीवपुदिसेकांपेजेरनें अती ॥ पायींसाजतिपादुकासुबरव्यामाथांजटा शोभती ॥ अंगींलोंबतचर्मभग्नरदतेंदाढीरुळेपांढरी ॥ कांसेचीरसुदाळशुभ्रविलसेंतैसेंच अंगावरी ॥ ३८ ॥ करशिरपदकांपेबोलतांबोलवेना ॥ अवघडपदचालीचालतांचालवेना ॥ मगकरधृतयष्टी पार्थतो शिष्य राणा ॥ धरुनिकरिंपुढेंतोचालला शीघ्रजाणा ॥ ३९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ काप ट्यवेषदोघे, स्वीकारुनियज्ञमंडपाआले ॥ तेव्हांनृपसह अवघे, पाहुन त्यांतें- चकीततेझाले ॥ ४० ॥ द्विजसमुदायासहनृप , सन्मुखजाऊनत्यांससन्मानें ॥ आणुनपूजा प्रीती, केलीसर्वोपचारिंप्रेमानें ॥ ४१ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ बद्धपाणीराहुनीउभाभूप ॥ द्विजापाहेतो दिसेदुःखरूप ॥ सद्गदीत होउनी तयेवेळीं ॥ रडेस्फुंद स्फुंदो नी ढळढळां ॥ ४२ ॥ अश्रुधारालोचनींवाहताती ॥ पाहुनीयांशंकलाभूपचित्तीं ॥ ह्मणेकायजाहलेंदुःखस्वामी ॥ त्वरेंसांगावारीन सर्वतेमी ॥ ४३ ॥ ॥ छंद ॥ ॥ स्फुंदतां हळू विप्रतो ह्मणे ॥ वृत्तवर्तलेंसाच ऐकणें ॥ सांगतां मुखीं शब्दनाफुटे ॥ बोलतां बहू हुंडकाउठे ॥ ४४ ॥ ॥ साकी ॥ ॥ सुनसुनराजाह्मा रबतीका, द्विजमेंहूं रहिवासी ॥ व्याहापूतकांहोयेरवातर, घूमतहूं परदेसी ॥ ४५ ॥ सुनकरतेराकीरतसाथे, चेलापूतमिलेके ॥ आवतथेसोबनमें सिंघनें, पकरेलरकाआके ॥ ४६ ॥ मैंतबतिनकोंहातजोरके, बिनतीवैसीकीया ॥ किरपा करके बछडा सो छोरो, लेकस्मेरीकय्या ॥ ४७ ॥ पंचाननने वैसाकहियो, तरीननहे जरठा ॥ उनकेपलटामें मंगेसो, देउगेबचजाबेटा ॥ ४८ ॥ मयुरध्वजनृपकीकरवतसें तुम, छिनकंरआधीकाया ॥ देवोगेतबि छुरजावचडा, उसकारनमेंआया ॥ ४९ ॥ पद ॥ ॥ सांगेद्विजतोनृपतीला ॥ बितल्यावृत्तातें ॥ सांगे० ॥ ध्रु० ॥ एकुलतें ए

क माझें बाळ ॥ त्यातें भस्मूं पाहे काळ ॥ उदार मोठा तूं भूपाळ ॥ होइं कृपाळ यासम यीं ॥ सांगे हि० ॥ १ ॥ ऐकुनि कीर्ती तुझी हे फार ॥ धांवुन येत होतों साचार ॥ पैथीं जाहला ऐसा कहार ॥ न मिळे थार मज आतां ॥ सांगे० ॥ २ ॥ ऐसें बोलत असतां जाण ॥ दावित व्याकुळ झाला प्राण ॥ दुःखें शोक करी निर्वाण ॥ झाली ह्मणुन थोर स्मणे ॥ सांगे० ॥ ३ ॥ ॥ दुसरें पद ॥ ॥ कहते विप्रजी आपवृत्ता ॥ सुनसुनो नरनाथा ॥ कहते० ॥ ध्रु० ॥ मेरा सतगुनी एकै लाल ॥ वाकों लेजावत है काल ॥ धरमात्मा हो तुम भूपाल ॥ बचन पाल सत आपना ॥ कहते० ॥ १ ॥ तेरी कीरत अपरंपार ॥ सुनकर आवत तेरे दार ॥ देवोगे दरब्य तुम अपार ॥ बिन आधार मैं दुबला ॥ कहते० ॥ २ ॥ ५० ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ऐसी ऐकतां दीन ते विप्रवाणी ॥ नृपाच्या बहू लोचनीं येत पाणीं ॥ ह्मणे वोतरी हे तनू विप्रकार्जी ॥ समर्पून होईन मी धन्य आजी ॥ ५१ ॥ धन सुत पशु जाया सर्वही व्यर्थ माया ॥ क्षणिक मनुज काया निश्चयें जायवायां ॥ तरि चुकत अपायात्याच कीजे उपाया ॥ ह्मणउन मनि राया सौख्य तें देह द्याया ॥ ५२ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ भूपाळ उदार देहदानीं ॥ कर्वत आण विलास भास्थानीं ॥ द्विज ह्मणे स्त्री पुत्र यांनीं ॥ गीत गाउनी कर्वतावें ॥ ५३ ॥ अश्रु आलिया तुझे नयनीं ॥ किंवा रडतां देखिलें कोणीं ॥ कीं मज दूषण लाविलिया ह्मणी ॥ जाईन उठोनी तत्काळ ॥ ५४ ॥ ॥ पद ॥ ॥ विनवी सकळांसी ॥ भूपति विनवी सकळांसीं ॥ ध्रु० ॥ सुफलित माझा जन्म जाहला ॥ न करा वा खेद मनासी ॥ भूपति० ॥ १ ॥ माझें सार्थक करणें आतां ॥ न पडा मायापाशीं ॥ भूपति० ॥ २ ॥ चित्तीं विपरित मानुनि विप्रा ॥ न वदा दुःशब्दासी ॥ भूपति० ॥ ३ ॥ तुमचें आजवर पालन केलें ॥ मान्य करा वचनासीं ॥ भूपति० ॥ ४ ॥ ॥ ५५ ॥ आर्या ॥ दानें अपार देऊनि, नमिले द्विज ताम्रकेतु नातें हो ॥ झाला सिद्ध मराया, मानिति बुध थोर विस्मया तें हो ॥ ५६ ॥ घालुन मस्तकिं कर्वत, ओढिति वधु पुत्र खण खणा वाजे ॥ श्रीहरिनामोच्चारीं, रत ला नृपकीर्ति घोषना वाजे ॥ ५७ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ विप्र बोले तंधवां सुक्या ऐसें ॥ कर्वतातें ह्मणुन मीं जात असें ॥ तदां राजा स्त्रीसुतां खुणावीत ॥ गावें तुह्मीं येईल तसें गीत ॥ ५८ ॥ ॥ छंद ॥ ॥ भूपवाक्य तें ऐसिया रीती ॥ ऐकुनी बहू खेद मानिती ॥ कंठ दाटला स्तब्ध वैखरी ॥ येति हुंदके

गिळिंतितपरी ॥ ५९ ॥ ह्मणती धन्यगा तूं शिखिध्वजा ॥ लाविली जगीं कीर्तिची ध्वजा ॥ कर्वतूनियां निजवपू स्करवें ॥ अर्पिलें द्विजा थोर ह्यारिखें ॥ ६० ॥ इच्छिलें मनीं ब्राह्मणाप्रती ॥ देइ तो अतां कोण पूढती ॥ बोलतां असें दुःखघोटितीं ॥ बाह्यतें द्विजापरि निदाविती ॥ ६१ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ नगरजन करीती थोर आकांतपाहीं ॥ रुदति सकळदुःखें ऐकतां वृत्तगेहीं ॥ अमरगण विमानीं घेउनी सिद्धपुष्पें ॥ ह्मणति अमितकेली ख्याति हे विष्वि भूपें ॥ ६२ ॥ ॥ ओवी ॥ ॥ मुखापर्यंत कर्वतिलें शिर ॥ तों नवल एक वर्तलें थोर ॥ नृपाचे वामनेत्रीं अपार ॥ अश्रुधारा चालिली ॥ ६३ ॥ ॥ साकी ॥ ॥ ऐसें दृष्टी पाहतां द्विज तो, क्रोधें झालाउठता ॥ ह्मणे हा दुःखें रडतो वास्तव, नेघे निश्चय आतां ॥ ६४ ॥ नृपकाल रका और प्रिया तब, ठाडी हात जुराई ॥ कहत भूपको आपको त्यजकर, जावत यात्चकसांई ॥ ६५ ॥ मनमों चिंता राव कर रहे, द्विज तो खान हिं पाया ॥ प्रपंच ना परमार्थ बिनहि, बिना रथ जावत काया ॥ ६६ ॥ बिकल भयात बबडे धीरसों, आपने पास द्विजेंद्रा ॥ हात सें करके सौम्य पुकारत, सो तब आकर ठेरा ॥ ६७ ॥ पाव पकरके नृपत ब बिप्रा, अरज करे दिनबानी ॥ सुनो सुनाजी किरपा करके, बात मेरी निखानी ॥ ॥ पाठ ॥ ॥ सुनो सुनो जी जिसकारनसो, नयन नझरपत पानी ॥ ६८ ॥ सव्य अंगको तुम ले जाते, इनका सार्थक होवे ॥ वाम धडाके सार्थक नहिं सो उसकारन सें रोवे ॥ ६९ ॥ ॥ ओवी ॥ ॥ ऐसी नृपाची दीनवाणी ॥ परिसोनि कळवळला चक्रपाणी ॥ दिव्यरूप चतुर्भुज प्रगटोनी ॥ न्हदयीं धरिलें मयुरध्वजा ॥ ७० ॥ कर्वत कांदितां चितत्काळ ॥ दिव्यरूप झाला भूपाळ ॥ जयजयकारें गर्जती सकळ ॥ सुमनें त्रिदश वर्षती ॥ ७१ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ पार्थे पूर्वरूपतें प्रकटीलें ॥ नृपालागीं आदरें आलिंगीलें ॥ समस्तांसि घेउनी हरी संगें ॥ रणभूमीं पातले जाणवेगें ॥ ७२ ॥ तदां देवें अद्भुत जाण केलें ॥ कृपादृष्टी सैन्य तें उठवीलें ॥ हर्षे सर्व गर्जती तये वेळीं ॥ रत्नपुरा पातले सौख्यमेळीं ॥ ७३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ हरि वदत नृपातें चालगा धर्म भेटी ॥ तव कृत हयमेधें पावलों पूर्ण तुष्टी ॥ सदळ मग तयांतें घेतला साह्य संगें ॥ उभय हय पुढें ते सोडिले जाणवेगें ॥ ७४ ॥ ऐसें चरित्र बरवें हरिनें धि आहे ॥ जन्मेजयासि मुनिजैमिनि सांगताहे ॥ तें कृष्ण

दास वदला अति प्रेम भावें ॥ लाधेजनी परिसतां स्वतें स्वभावे ॥ ७५ ॥ ॥

॥ ॥ इतिश्रीमयुरध्वजआख्यान समाप्त ॥ ॥ आर्या १२ ॥ श्लोक ॥ १२ ॥ साक्या ॥ १७ ॥ छंद ॥ १० ॥ ओव्या ॥ १० ॥ दिंड्या ॥ ११ ॥ पदें ॥ ३ ॥ एकुणसंख्या ७५



## अथ सिंहध्वज आख्यान.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्लोक ॥ ॥ कुरुकुलज विराजे धर्म तो पुण्यराशी ॥ अनुज परम योद्धे वेद संख्या जयांसी ॥ निजजनहितकारी साह्य तो वृष्णिराणा ॥ सतत सकल काजी पूर्ण त्यालागिं जाणा ॥ १ ॥ ॥ साकी ॥ ॥ गोत्रज हत्या पाप हराया, तेणें हयमेधातें ॥ आरंभुनियां अश्व सोडिला, महिवर जिंकायातें ॥ २ ॥ त्यासी रक्षक अपार सेना, घेउन अर्जुन चाले ॥ हिंडत क्षितिवर सिंहध्वजाच्या नगरासन्निध आले ॥ ३ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ श्रीकृष्ण ह्मणे विजयातें ॥ सिंहध्वज दैत्य नांदे येथें ॥ तेणें धरिलिया अश्वोत्तमातें ॥ निश्चयें प्राणांत सर्वांसीं ॥ ४ ॥ कपिध्वज ह्मणे गा अनंता ॥ तो अजिंक्य कैसेनी जाहला तत्वतां ॥ तंव कृष्ण ह्मणे कुंती सुता ॥ ऐकें मूळ कथा तयाची ॥ ५ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ पूर्वी एक सुमित्र नामक मुनी ज्ञानी महासत्पथी ॥ उत्काळाख्य नृपें तयासिं दिधली कन्या सुमेवती ॥ ते बाळा नवयौवना गुणवती कामानळें पोळुनी ॥ मागे भोग पतीस वंक्त नसतां नाना परी प्रार्थुनी ॥ ६ ॥ संध्याकाल असे ह्मणोनि सतितें वारी मुनी त्ये परी ॥

॥ कामें फार भ्रमोनि कंठीं पतिच्या घाली मिठी सत्वरी ॥ होतां भोगविलास-सौख्य मदनीं झाली सती गर्भिणी ॥ उशांतीं दश मासि ते प्रसवली पुत्रत्रयास ह्मणी ॥ ७ ॥ ॥ आर्या ॥ ॥ असुरी वेळा योगें, उद्भवले दैत्य क्रूरएकसरां ॥ गृध्रकेत चीरकेतु, सिंहध्वज नष्ट उग्रतो तिसरा ॥ ८ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ वनामाजी जाउनी तया नष्टें ॥ तपश्चर्या माडिली थोर कष्टें ॥ तपोतेजें पोळतां शचीनाथ ॥ विधात्यासीं जाउनी कथी मात ॥ ९ ॥ विधी विष्णु शंकरा घेउनीयां ॥ मही चौघे पातले धांवुनीयां ॥ अयुताब्दें जोडुनी उभे पाणी ॥ परी दैत्य नायके त्यांची वाणी ॥ १० ॥ साकी ॥ ॥ असुरें करितां ध्यानविसर्जन ॥ हरिहर बोलति वाचे ॥ वांछित हृदयीं असेल तें त्वां मागें सत्वर साचें ॥ ११ ॥ ॥ ओवी ॥ ॥ लोकपाळादि दिवौकस ॥ नरपन्नग दैत्य राक्षस ॥ वृद्ध तरुणाचे हस्तें अपयश ॥ नसावें मज कदापी ॥ १२ ॥ ऐसें ऐकतां चौघे जणीं ॥ तथास्तु बोलोन गेले वाणी ॥ यावरी तो उन्मत्त होउनी ॥ जिंकिता झाला त्रिलोका ॥ १३ ॥ ॥ छंद ॥ ॥ कृष्णजी ह्मणे धरिल तो हया ॥ जाय गाच मूढ हे तरील या ॥ ह्मणुन काळजी माझिया जिवा ॥ वाटत असे जाण पार्थिवा ॥ १४ ॥ ॥ आर्या ॥ ॥ ऐसें बोलत असतां, दैत्यपुरा निकट पातले हरि ते ॥ तेथें पोरज बाळक ॥ क्रीडोत्सविं त्यांसि जाहले धरिते ॥ १५ ॥ पांडववीर पुढें मग, होउनियां त्यांसि झुंजती निकरें ॥ परि ते अर्भक दुर्धर, वधिती वीरां महा धरूनि करें ॥ १६ ॥ तेव्हां अनुशाल्वें बहु, क्षोभुनियां पोरजार्भक वधिलीं ॥ धाया ठीं जाउनियां, नगरीं तें मात सर्व कळवीली ॥ १७ ॥ ॥ साकी ॥ ॥ ऐकुनि वार्ता अंत्यज युद्धा, घेउनि स्वदळा आला ॥ पांडवसेना जर्जर करितां, अनुशाल्वें तो वधिला ॥ १८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ दळपति मग कोटी घेउनी सैन्य वेगें ॥ रणपति निज बंधू घेतला साह्य संगें ॥ समरमहिस आला काळ प्रत्यक्ष जैसा ॥ अमित-चिशर सोडी मेघधाराच तैसा ॥ १९ ॥ क्षितिवर अनुशाल्वा पाडिलें दिव्य बाणें ॥ मग दळमथना नेंमांडिलें फार तेणें ॥ क्षणहि न लगतां चीसारिलें सैन्य मागें ॥ दश ककुभ पळाले वीर ते ही सवेगें ॥ २० ॥ ॥ ओवी ॥ ॥ अनुशाल्वें होउनी सावधान ॥ घेतला सेनापतीचा प्राण ॥ रणपती त्याचा बंधु जाण ॥ तो ही पाडिला यमालया ॥ २१ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ धावुनीयां धाया ळमधीं नारीसीं ॥ सांगतां तो धाव-

लासमैन्येसीं॥ अतिक्रोधें पाडिलेंसे पक्षोणी॥ अनुशाल्वाविंधिलें तीक्ष्णबाणीं॥ २२॥ ॥ श्लोक॥ ॥ त्याकाळीं अनुशाल्वतोखवळला सोडी गदा त्यांवरी ॥ केली ते सानिवेंदुखंड गगनीं येतां शरें सत्वरीं॥ गर्जोनी मग तो रिपू प्रति म्हणे अंती हरी ते स्मरें॥ ऐसें बोलुनि शीर तें उडविलें तत्काळ एक्या शरें॥ २३॥ ॥ साकी॥ ॥ पांडवसेना सरतां मागें, कर्णसुत वेगें उठला॥ क्रोधें खवळुन महा वीरातें, अपार मारित सुटला॥ २४॥ ॥ ओंवी॥ ॥ सोडुनी नारायणास्त्रातें॥ वधिलें सुमित्र प्रधानातें॥ सेना संहारिली क्षणमात्रें॥ हाहाःकार थोर जाहला॥ २५॥ सिंहध्वजासी कळतां वृत्तांत॥ क्रोधें खवळला जैसा कृतांत॥ हाकारुनी सैन्य असंख्यात॥ येता झाला रणभूमी॥ २६॥ ॥ श्लोक॥ ॥ जयाचे रथासा तशें सिंह जाणा॥ वरी बैसला काळसा दैत्यराणा॥ तया देखतां श्रीहरी तो पळाला॥ गिरीकंदरीं जाउनी यां दडाला॥ २७॥ अगणित शर तेव्हां प्रेरिले दैत्यनाथें॥ न वलत मत यानें दाटलें फार तेथें॥ महि वर विचराया मार्ग तो हीं दिसेना॥ मनीं परम भयातें मानिती होय सेना॥ २८॥ ॥ आर्या॥ ॥ तेव्हां पार्थसुतें त्या, स्वशरें निरसोन बाण अंधारा॥ केली सायक वृष्टी प्रलयांबुद वर्षती जशा धारा॥ २९॥ ॥ त्रासुनि दैत्यवरातें, तोडुनियां ध्वज हि सारथी वधिला॥ छेदी सहस्र चापें न करी तो क्षण हि जाण अवधीला॥ ३०॥ तेव्हां सिंहध्वज तो, बोलें दैत्य निघोर हांक केला॥ पार्थसुता सावध हो, म्यां नव असु हरणीं नेम हा केला॥ ३१॥ ॥ छंद॥ ॥ बोलुनी असें दैत्यनायकू॥ होय प्रेरिता रुद्रसायकू॥ हृदयिं लागतां थोर मूर्च्छना॥ पातलीत दा बभ्रुवाहना॥ ३२॥ दृष्टिं देखतां समय या परी॥ धांवला स्वी पौत्र सत्वरीं॥ दिव्य सायकें दैत्यस्यंदना॥ उडविलें नभीं करुनि गर्जना॥ ३३॥ ॥ साकी॥ ॥ कर्णसुतें बहु पृतना वधिली, पाहुनि अतिरोषानें॥ असुरें तेव्हां मूर्च्छित त्यांतें, केलें तीक्ष्णशरानें॥ ३४॥ ऐसें देखुन नीलध्वजादि, उठले सर्व हि वीर॥ परि त्या दैत्या पुढें न धरवे, कोणा क्षण ही धीर॥ ३५॥ ॥ दिंडी॥ ॥ रथीं उभा राहोनि दैत्य पाहे॥ म्हणे कोठें तो पार्थसखा आहे॥ एकुलाची देखतां अर्जुनातें॥ म्हणे केवीं उरगिलें जगन्नाथें॥ ३६॥ तरी पार्था लागुनी वधीतां ची॥ मग सहज होईल भेट त्याची॥ मनीं ऐसें कल्पोनि दैत्यनाथ॥ म्होहना

स्थें मोहिलें समस्तांतें॥ ३७॥ ॥ ओंवी॥ ॥ तों सावध झाला पार्थनंदन॥ पाहे वीर मोहिले संपूर्ण॥ क्रोधें धनुष्या तें लावुन बाण॥ आकर्ण ओढुनी सोडिला॥ ३८॥ तेणें सिंहसहित दैत्यरथ॥ उडविला रविमंडळा पर्यंत॥ तळीं येतां मागुती उडविन॥ ज़ाहल्या ग्रत येरझारा॥ ३९॥ ॥ श्लोक॥ ॥ तंव रविसुतसूनू सांडुनी मुर्छनेतें॥ नवलनयनिं देखे मोहिलें वाहिनीतें॥ निज अनुजरणीं तो एकला झुंजताहे॥ मृतपरिस कळातें देखुनी खेद वाहे॥ ४०॥ अघटित बहु केलें तेध वाकर्ण बाळें॥ असुर उडविला तो सायकें अंतराळें॥ फिरत गगनि वातें दीन ते समजाणा॥ उतरत मग कष्टें भूमिला जीरवाणा॥ ४१॥ ॥ दिंडी॥ ॥ ऐसें शौर्य पाहुनी दैत्यगणा॥ सर्वी त्यातें पावुनी हर्ष जाणा॥ ह्मणे धन्य धन्य तूं वीरराणा॥ परी आतां साहिं या दिव्यबाणा॥ ४२॥ ॥ छंद॥ ॥ बोलुनी असें बाण सोडिला॥ मूर्छित तयाचा ग्रपाडिला॥ देखतां असें बभ्रुवाहनू॥ छेदि सायकें दैत्यस्यंदनू॥ ४३॥ ॥ साकी॥ ॥ दैत्य बसोनी अन्य रथीं तो, प्रेरी मंत्रुनि शूळा॥ तों वृषकेतू सावध झाला, देवें त्याच हि वेळा॥ ४४॥ तेणें सोडुन सायक त्रिशुळा, मधींच खंडन केलें॥ दोघे बंधू भेटति स्नेहें, अरिष्ट मोठें चुकलें॥ ४५॥ तंव त्या असुरें तदा प्रेरिल्लीं कर्णसुता वरि शक्ती॥ अवचित येतां बभ्रुवाहनें, निरसुन केली ख्याती॥ ४६॥ ॥ दिंडी॥ ॥ परस्परें रक्षुनी एकमेकां॥ सिंहध्वजा-हाणिती बघें देखा॥ समस्तांसी मोहिलें दैत्यनाथें॥ तदा दोघे मूर्छीत जाण होते॥ ४७॥ तया योगें चूकलें मोहनाला॥ पुन्हा त्यांतें मोहुं तो विसरला॥ असो होतां युद्ध तें असे देखा॥ नागपूरीं वर्तलें वृत्त ऐका॥ ४८॥ वृषकेतूनी घतां संगरासी॥ प्रिया त्याची गर्भिणी चतुर्मासी॥ दिवसमास होतांचि पूर्ण जाणा॥ प्रसवली सुंदरी पुत्ररत्ना॥ ४९॥ ॥ ओंवी॥ ॥ धर्में पुत्रोत्सव केला थोर॥ आचारिल्ले महीचे नृपवर॥ आणि अठ्यायशींसहस्र ऋषीश्वर॥ याचक अपार मिळाले॥ ५०॥ अमोल्य वस्त्राभरणीं करून॥ धर्में गौरविलें समस्तांलागुन॥ ध्रुवतेज ऐसें नामाभिधान॥ ठेविलें प्रीतीं बालका॥ ५१॥ मिळोनी सकळ नितंबिनी॥ पालखांघातलें बाळ सुगुणी॥ द्रौपदी हेमसूत्र करीं धरूनी॥ हालवी गावोनि कृष्णालीला॥ ५२॥ ॥ पद॥ ॥ जोंजो जोजो जोजो अंगाई॥ ध्रुवतेजा कर गायी॥ वदनी

श्रीहरिचेगुणगाई॥हृदयींत्यातेंध्याई॥जोजो०॥ध्रुवपद॥निगमागमज्याचेगु णगाती॥हृदयींविधिहरध्याती॥ज्याच्याचिंतनेंनिभ्रांती॥दुरितेंविलयाजा- ती॥जोजो०॥१॥मजलागांजीतांसभेसीं,पुरविलें वसनासीं॥येतांदुर्वासछ- ळणासी॥दिधलेंअन्नतयासी॥जोजो०॥२॥सारथिहोउनियांपार्थाचा॥पुर वीवांछितसाचा॥जोकांअभिमानीदासांचा॥कैवारीदीनाचा॥जोजो०॥३॥॥

छंद॥ ॥कृष्णगीततेंबहुतचांगलें॥बाळकाप्रतीगोडलागलें॥त्याचिचिंतनीं चित्तरंगलें॥पार्थसारथीध्यानवेधलें॥४॥नवलतेधवांश्रीहरीकरी॥बाळबो लतेंहोयसुस्वरीं॥पार्थसारथीदाखवीमला॥म्हणुनियांबहू छंदघेतला॥५५॥

॥ श्लोक॥ ॥दावीतीबहुखेळखेळणिपरीनेकेचितेंसर्वथा॥बोलेसार- थिभेटवामगदुजेमागेंचिनातत्वता॥नेव्हांधर्मवृकोदराप्रतिवदे घेवोनियां बाळ का॥जावोनीरणिभेटवीतरितुवांवेगें यदूनायका॥५६॥ ॥आर्या॥ ॥

मेघवर्णपौत्रासह,संगेंघेवोनिभीमध्रुवतेजा॥निघताझालाभेटी,ध्यातीशि वशुकविरिंचिध्रुवतेजा॥५७॥आरुढहोउनसुरथीं,कुस्कमवतीपुरिप्रतीत्वरें आले॥पार्थादिसकळहीनृप,देखतिसेनेसहीतमृतझाले॥५८॥भयचकि तसिंहकेतू,पाहेरिपुसात्यपातले दुरुनी॥सोडुनिमार्गणवेगें, भीमातेंपाडि लें अस्त्रहरुनी॥५९॥मेघवर्णनिजमाया,स्मरुनीविक्राळवासनी यदना॥ये नांम्रास्नूंदैत्यें,पाठविलात्याप्रतीहियमसदना॥६०॥ ॥छंद॥ ॥उभ

यसंगतींमृत्युपावनां॥बाळघाबरें होयतत्वतां॥पार्थसारथीस्मरुनिअंतरीं॥सोडुनीरथाउडतअंबरीं॥६१॥ ॥साकी॥ ॥पार्थात्मजतोसावधहोउ नि,देखेबाळकगगनीं॥म्हणेहामायिकअसुरपातला,अर्भकरूपाधरूनी॥ ६२॥ऐसेंभावुनअंतरिंत्यावर,ब्रह्मास्त्रातेंत्यजीलें॥कडकडाटबहुहोउनतेजें, अर्कातेंलोपवीलें॥६३॥त्यातेंपाहातांनेत्रझांकले, भ्यालें बाळकभारी॥ पार्थसारथीआणुनध्यानीं,विनवींसंकटवारीं॥६४॥ ॥ पद॥ ॥करु णाभाकितश्रीहरितें॥पाउनिबालभया॥करुणा०॥ध्रुव०॥केवळअज्ञानीमी बाळ॥परिलांकेलेंसीवाचाळ॥आतांनकरितांप्रतिपाळ॥श्रीदावाळपडेलकीं॥ करुणा०॥१॥याब्रह्मास्त्राचापरिहार॥नकळेमजलागनसाचार॥आतांकाय

करूं विचार। मोठा कहारओढवला ॥ करुणा० ॥ २ ॥ जाणें एकमी तुझे पाय॥ नकळे दुसरा अन्य उपाय॥ चुकवीं दुस्तर प्राण अपाय॥ पाहसी काय धांव वि- भो॥ करुणा०॥ ३ ॥ नानासंकटीं भक्तजनास॥ रक्षिलें सघाल्युनकास॥ ऐशा द्रौपदीच्यावचनास॥ ऐकुनि आसलागलिसे॥ करुणा०॥ ४ ॥ ॥ ६५॥ ॥ ओंवी ॥ ॥ हरिइच्छेने त्या अवसरीं॥ वातें तृण उडविलें अंबरीं॥ तें बाळकें सहज घेवोनी करीं॥ ब्रह्मास्त्र वरी टाकिलें॥ ६६॥ तेणें अस्त्र होउनी नाश॥ बाळ गर्जे पावुनी तोष॥ सोमवंशीं कर्णात्मज वीरेश॥ त्याचा पुत्र ध्रुवतेज मी॥ ६७॥ ॥ छंद॥ ॥ ऐकतां असें बभ्रुवाहन॥ कर्णनंदना सांगे येउन॥ उभय तां सुखें भेटुनी त- या॥ हर्ष पावुनी करिति विस्मया॥ ६८॥ ॥ दिंडी॥ ॥ ह्मणे बभ्रुवाहनू कर्णपुत्रा॥ अजी केला थोर मी घात होता॥ मुलावरी ब्रह्मास्त्र प्रेरियेलें॥ परी येणें तृण शरें निवारीलें॥ ६९॥ ॥ ओंवी॥ ॥ असो भीमरथीं बैसोनि बाळक॥ दैत्यावरी प्रेरी असंख्य सायक॥ ते हृदयीं खडतरतां प्राणहारक॥ पावोनि धाक घाबरला॥ ७०॥ मग मायिक विक्राळरूप धरूनी॥ गिळों धांवला त्रिवर्गा लागोनी॥ तंव ध्रुवतेजें दिव्य बाणीं॥ उडविला गगनीं क्षणमात्रें॥ ७१॥ विमानीं बैसोनी वृंदारक॥ पाहती बाळयुद्धाचें कौतुक॥ ह्मणती हा त्रिभुवना अजिंक्य॥ तो मारवी श्रीहरि बाळहस्तें॥ ७२॥ ॥ आर्या॥ ॥ शस्त्रास्त्र युद्ध करिती, जेवीं ते हर त्रिपुर आवेशें॥ सिंहध्वजासि तेंवी, भासे तो विष्णु अर्भकावेशें॥ ७३॥ दैत्य ह्मणे वरदानी, मानुनि म्यां तुच्छ बाळ गोवाया॥ चुकलों सांप्रत परि तें, चुकलें माझें न कर्म भोवाया॥ ७४॥ ॥ श्लोक॥ ॥ वदे बाळ दैत्या मती ते धवातें॥ स्मरें अंतकाळीं त्वरें माधवातें॥ तुझी जी हली आजि आयुष्यपूर्ती॥ ह्मणोनी मनीं गांठि हे पापमूर्ती॥ ७५॥ वदोनी असें काढिलें दिव्य बाणा॥ हरीनामतें रेखिलें अग्निजाणा॥ मनीं जिष्णुच्या सारथीया स्मरोनी॥ बळें सोडिला जाण वेगें करोनी॥ ७६॥ दणाणी क्षिती शेष कांपे नच्चाळा॥ अमीता भया वाटलें लोकपाळां॥ पविप्राय तो वैसला कंठनाळीं॥ उडालें नदां शीर वेगें निरांळीं॥ ७७॥ ॥ छंद॥ ॥ मारिला असा दैत्य बाळकें॥ करिति जयजया देव हारिखें॥ घेउनी धडें शस्त्र नेंकरीं॥ पाडिलें तिघां नवलतें परी॥ ७८॥ ॥ ओंवी॥ ॥ निर्ज

रांचा जयशब्द ऐकोनी ॥ रणीश्रीहरीआलाधांवुनी ॥ मगकरुणामृत दृष्टीकरुनी ॥ सकळसैन्य जिवविलें ॥ ७९ ॥ जाह्लाएकचिजयजयकार ॥ विबुधवर्षतीपुष्प संभार ॥ बाळातेंह्रदयींधरोनीश्रीवर ॥ वदनचुंबित आवडी ॥ ८० ॥ भीमार्जुन-आणीसकळ भूपती ॥ कृष्णाचरणींसप्रेमलागती ॥ अनुशाल्व आणिभीमा संगती ॥ बाळधाडिलेंगजपुरा ॥ ८१ ॥ ॥ साकी ॥ ॥ सकळ दळासीं नगर लुटाया ॥ कमळापति आज्ञापी ॥ सप्तदीन अहोरात्र हिलुटिती, नसरे द्रव्यत थापी ॥ ८२ ॥ यावरि मगतें अश्वपुढेंते, सोडुनि मागेंसेना ॥ असंख्य चालत जाणतयाची. नहायशेषागणना ॥ ८३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ अश्वमेधाजैमिनीअ शारीती ॥ जन्मेजयासांगत कथाप्रीती ॥ कृष्णदासमार्धुनीश्रोतयांसीं ॥ ह्म णेगातांजोडतीपुण्यराशी ॥ ८४ ॥ ॥ इत्याश्वमेधीयंदामोदरविरचितेसिं हध्वजाख्यानं समाप्तं ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ आर्या ॥ १३ ॥ श्लोक ॥ १४ ॥ साक्या ॥ १५ ॥ छंद ॥ १ ॥ ओंव्या ॥ २० ॥ दिंड्या ॥ ११ ॥ पदें ॥ २ ॥ ए. ८४




## उखास्वयंवर प्रारंभ.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ ओंवी ॥ ॥ वंदोनिश्रीकृष्ण-चरणातें ॥ करीनरसाळनिरूपणातें ॥ जेश्रवणकरितांभावार्थें ॥ दुष्कृतेंअगाधनासती ॥ १ ॥ बळिपुत्र बाणासुरविख्यात ॥ सहस्त्रभुजामंडितप्रतापवंत ॥ शिवभक्तवरिष्ठ अत्यंत ॥ शोणितापुरींराज्यकरी ॥ २ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ कैलासाप्रति आदरें अ-

दुस्तर निरसुनी लाघ सुपथा॥ परि०॥ १ ॥ मोक्षपुऱ्या सप्तबऱ्या माजीसाजे ॥ श्रेष्ट अयोध्यानामें त्रिभुवनिंगाजे ॥ तेथें हरिश्चंद्राख्य भूपविराजे ॥ परिसुनिज्याचीकीर्ति शुक्रही लाजे ॥ परिसाभा०॥ २ ॥ ॥ ओवी ॥ ॥ जो धैर्यसत्वाचा ध्रुव अढळ ॥ दानीं सुरतरूचसा केवळ ॥ प्रजापालनीं श्रीवेल्हाळ ॥ रविकुळमंडन महात्मा॥ ३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ साधु सुजनीं वेष्टिलें सभेमाजी ॥ बैसलातो असतां भूपगाजी ॥ ब्रह्मपुत्र नारदमुनीतेथें॥ अकस्मातपातलाऊर्ध्वपंथें ॥ ४ ॥ जाउनीयांसन्मुख तयेवेळे॥ वरासनीं आणुनी पूजियेलें॥ रायेंप्रेमेंसत्कार बहूकेला॥ मुनीतुष्टहोउनी दिवींगेला॥ ५ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ जातांवज्रिचियासभेंसमुनितोस्नेहें शचीचापती ॥ सत्कारोनिसुखेंतयांपुसतसे कांहीं विशेषस्थिती ॥ सांगेनारदतेधवांपरिसिजे राजा-हरिश्चंद्रसा ॥ देखीला अवनीवरीन कधिंही पूर्वीमहात्माअसा ॥ ६॥ ॥ आर्या ॥ ॥ ब्रह्मससुरराजर्षी, बसले असतांसभेंत देवर्षे ॥ कथिलें परिसुनित्यांतुनि, डोलविमाथा वसिष्ठ बहु हर्षे ॥ ७ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ ऐकानिनारदाचेवचनातें ॥ गाधिजहृदयींक्रोधाग्निचेते॥ वरीवसिष्ठवाक्याचेंनिघृतें, शिखानभातें कळविती ॥ ८ ॥ ॥ छंद ॥ ॥ ब्रह्मनंदना वदत कोपुनी॥ वानिसीवृथा शिष्यम्हणउनी ॥ सत्वहीनत्या करिनरेपरी ॥ अर्पिनतपानाघडे तरी॥ ९ ॥ ॥ साकी ॥ ॥ येरुम्हणेतेंसत्वनष्टत्वां, करितांत्यानृपनाथा ॥ पूर्वजनिरयींपचोतमाझे, पापेंअगणितमाथां ॥ १० ॥ कौशिकबोलेवर्तमानहें नकरीश्रुतरायासी ॥ बरें म्हणोनीवसिष्ठगेला, भूप यज्ञार्थ तपासी ॥ ११ ॥ इकडे विश्वामित्र अयोध्यें, निकटीं सत्वर आला॥ अनुष्ठानतेंक्रूर करोनी मायारचिताझाला ॥ १२ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ हरिश्चंद्राचियेराष्ट्रीं॥ व्याघ्रसोडिले अकराकोटी॥ तेव्हांप्रजाहोउनी हिंपुटी ॥ पीडितझाल्या अतिशयें ॥ १३ ॥ ॥ आर्या ॥ ॥ ग्रामकपाटें लावुन, वसतीपशुनरगृहांत उपवासी ॥ कळविति नृपामहाजन, वृत्ततदांजेसदा समिपवासी ॥ १४ ॥ ॥ ॥ कडवीं ॥ ॥ श्रवणीं परिसुनदुःखप्रजांचें ॥ अंतरायाचें ॥ सद्गदहोउमिसाचें ॥ कारुण्यंधनाचें ॥ ॥ चाल ॥ ॥ म्हणेयांनिवटुनिदुष्टम्व्या

पदां ॥ द्यावें सौख्य प्रजातें ॥ ऐकाश्यातेसादरचित्तें ॥ प्रेमळ चरितातें ॥ ऐ
का० ॥ १५ ॥ आज्ञाकरितांचिसेनासारी ॥ झालीसिद्ध तयारी ॥ भेरीरणतु
रीअनीवारीं ॥ वाद्यें दळभारीं ॥ ॥ चाल ॥ ॥ वाजतगाजतकाननियेउनवधि
लेंव्याघ्रगणातें ॥ ऐकाश्योते० ॥ १६ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तदागाधिजेंत्याश्र
माभूपयावा ॥ ह्मणोनीत्वरेंयोजिला शीघ्रकावा ॥ सुवर्णासरीअंगदीसीसु
रंगा ॥ अशानिमुनींपाठवीलें कुरंगा ॥ १७ ॥ तयापाठिधांवे भूपतीघोररानीं
॥ श्रमेंपातला आश्रमासन्निधानीं ॥ मनोरम्यत्यास्थानिकासार दृष्टी ॥ नृपें-
लक्षितांलाधलासौख्य वृष्टी ॥ १८ ॥ ॥ गीत ॥ ॥ करुनिस्नानतडागीं ॥
त्याबागांत ॥ देखुनिभव अलयातें शिरलात्यांत ॥ अर्चुन प्रीतिभावें गिरि-
जाकांत ॥ तारामतिसहतेथें घे विश्रांत ॥ परिसाभाविक० ॥ १९ ॥ ॥ दिंडी
॥ ॥ विश्वामित्रें देउळांतयेक्षणीं ॥ शिकवोनी धाडिल्या मातंगीणी ॥ अप्स
राची लावण्यगुणेंतैशा ॥ त्याहींकेलें प्रसन्न नराधीशा ॥ २० ॥ वरंब्रूहिऐकतां
ह्मणेराया ॥ वरीआह्मांत्यागुनीपट्टराया ॥ ऐकतांहें मंत्रियें पिटिलें त्यासीं ॥
येउनीत्यासांगती मुनीपासीं ॥ २१ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ ऋषीक्षोभुनी आलादं
उका ॥ ह्मणे राज्यमदें तूं नृपाळा ॥ ममदासीचाअपमान केला ॥ आणि-
श्वापदेंमाझीं वधियेलीं ॥ २२ ॥ मज विश्वामित्रातें नेणसी ॥ तंवनृपलागे
दृढ चरणासी ॥ येरुतैसाचक्रोधें आश्रमासीं ॥ जाउनी विंदान करितसे ॥
२३ ॥ ॥ गीत ॥ ॥ काननि भ्रमतां भ्रमतां भूपति श्रमला ॥ तेणेंयेउनिनिद्रा
आलयीं निजला ॥ स्वपनीं कौशिक कपटी याचकनटला ॥ वदुनिआंशिसमा
गेदेराज्यमला ॥ परिसा० ॥ २४ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ हरिश्चंद्रउदारसर्वस्वदानी
॥ सोडिलें करीं संकल्पपाणी ॥ मुद्रिकाअंकुशालगामलेखणी ॥ केलीस्वाधी
न विप्राच्या ॥ २५ ॥ सवेंचिनृपझालाजागृत ॥ तारामतीतें स्वप्नसांगत ॥ तों
आणिक वेष पालटुनित्वरित ॥ विश्वामित्रपातला ॥ २६ ॥ ॥ दिंडी ॥ ॥
ह्मणेरायातूं नाथ उदारांचा ॥ पांगफेडींयामजदुबळ्याचा ॥ ओटभरहेमतें म
शीं द्यावें ॥ रावबोले देईनगृहीं यावें ॥ २७ ॥ वदोनीयांयापरी सवेंत्यासी ॥ भूपआ
लाघेउनी मंदिरासीं ॥ प्रवेशतां अंतरींशङ्किकेशीं ॥ धरुनिविप्रेंपाडिली भूमि-

केशी॥ २८॥ ॥ श्लोक॥ ॥नृपवरतंवतेथेंधावुनीशीघ्रआला॥वदतप दधरोनीकायअन्यायझाला॥अवनिसुरह्मणेतेंदक्षिणाजाणमाझी॥रिघसि सदनिंकैसाअर्पित्यावीणगाजी॥२९॥भूपतित्वरित धाडुनिसेवकां॥ आण वोनिधनदेद्विजनायका॥ तोंवदे तंवनृपाप्रतितेक्षणीं॥ अर्पिसीममधना मजलागुनी॥३०॥ ॥ छंद॥ ॥स्वप्निमागतांध्यानतूजसीं॥ अखिलरा ज्यत्वांअर्पिलेंमसि ॥कायरे तुझें मेदिनीवरी॥ राहिलें असे पाहे अंतरीं॥ ३१॥ ॥ ओंवी॥ ॥ऐकोनि भूपाळलागे चरणीं॥ अर्पिली मुद्रा अंकुश लेखणीं॥ सांगे मंत्रियादिकांतेक्षणी॥ विप्राज्ञेंन वर्तावें॥३२॥साकी ॥ ॥द्विजतंव क्रोधें ह्मणेदक्षणा, देईरायात्वरित॥ह्मणउनदंडेंताडणक रितां, नृपसुतचरणाधरित॥३३॥ ॥छंद॥ ॥ब्राह्मण ह्मणेकवणकार टें॥पातलें मधींताडित्याहटें॥भूपतीह्मणे मत्सुत पहा॥ द्विजह्मणेंपुढें श त्रुजाणहा॥३४॥ ॥कडवीं॥ ॥नगरीचेसौदागरतेंवदती हे विप्रकृपामूर्ती॥ आह्मीदेतोंकांचनप्रीती सोडावानृपती॥चाल ॥विप्रवदेयाक्षितिवरधनजें॥ सर्वहि माझेंचितें॥ ऐकाश्रोते०॥३५॥ तंव तो नृपसुतविनवीस्वामी॥तुमचीये धामीं॥ सेवाकरूनि निष्कामीं॥फेडीनपितृऋणामीं॥ चाल॥ ऐकुनि ऐशा नीति भाषणा वाटे बहु विस्मय मुनितें॥ ऐकाश्रोते०॥ ३६॥ ॥श्लोक॥ ॥ नृपालागीं तेव्हां वदत मुनितोक्रोधवचनीं॥ नराहे देशींया कटकअथवाजा ण विपिनी॥तदाराजाबोलेनवशकलधात्रीहिपरती॥ असेकाशी तेथें वसुन ऋणफेडीननिगुती॥ ३७॥परीद्यावीस्वामीमजअवधितेएकमहिना॥ ऋ षी बोलेशापा वरिसिटळतांनेमवचना॥ निके ऐसें राजावदुनमुनिच्यापादन लिना॥ निघेवंदूनीयांसुतसहितकांतासु विपिना॥ ३८॥ कटाव॥ ॥ हरिश्चंद्रनृपनाथ वनासीं॥निघतांझालें दुःखजनासीं॥ कृपण हरपताजें विधनासी॥ अगणित पावेखेद मनासीं॥पौरजपाळापिडुन कपाळा॥ ह्मण तिनृपाळाकाळाकरिकंटाळा॥करुनी दिधलेंबाळापाळायातें॥तरिवाजाळा वयासदनें॥कष्टासक्वावीआह्मावचनें॥ ऐसींउदासचित्तेवदती॥ वदनेंकेउ लवाणीं करिती॥पाणीलोचनीं आणीताती॥वाणीउदमींसर्वहियाती॥

अनवाणींउपलाणी हातीं॥ कवळ तसेंचीजवळनृपाच्या॥ सकळयेउनी विक
ळमनानेंबाहुआकांता॥ करुनीकांतामहिच्यावदती॥ कांतारायेंत्यजुनी कां-
ता॥ सुतधनतुझियासंगेंच्याता॥ ऐसेंश्रांतासोसुपरीना अमुतें सोडीं॥ ऐकु
नभूपति करत्यांजोडी॥ गोडीदावुनतोडीसांगे॥ जोडी मागें कोडीं नकराजा-
हो मागें॥ अतिअनुरागेंमहाभागें॥ स्वांगेंविनवुन सर्वंही लोकां॥ मागें फिरवी
निरसुन शोका॥ संगें घेउन कांतातोका॥ निघताझाला कष्टदेखा॥ मा
त्कनगति हे ऐसी॥ नाटळे ब्रह्मादिकां॥ १॥ ॥ ३९॥ ॥ गीत॥ ॥ मुनि
नें सालंकार देखुनीत्यांते॥ धावुनी तारामतीसीं धरिले हातें॥ ह्मणे मद्रा
ज्यांतीलया आभरणातें॥ ठेवुनि सत्वरजावें मगविपिनातें॥ परिसा०॥ ४०॥
॥ श्लोक॥ ॥ ऐशा ऐकतां त्याचिया भाषणातें॥ तिघेंकाढुनीअर्पिती भूष
णातें॥ चिरें फेडुनी वेष्टिलें वल्कलांसीं॥ त्वरेंचालली पादचारीं वनासी॥ ४१
॥ ओंवी॥ ॥ कौशिकें तपनास आज्ञापिलें॥ द्वादशकळे पाहिजे तपलें॥
मुनिदर्पेतयेंतेजभरवरिलें॥ तेणें भूनगउलोंपाहती॥ ४२॥ वरुणासी आज्ञाकरी
देख॥ नृपपंथेंनसावेंलेशही उदक॥ मुनिधाकें कूपसरितादिक॥ केलीं शुष्कम
चेतें॥ ४३॥ ॥ दिंडी॥ ॥ तिघेंतेव्हां चालतां घोरपंथीं॥ सुकूमार करपोनि
गेली कांती॥ कडेपुत्र घेवोनि राज्ञि अंगें॥ हळूहळू जातसे नृपामागें॥ ४४॥
रोहिदास तेधवा ह्मणे ताता॥ तृषेनें गा चाललाप्राणआतां॥ कडेहूनीरवाल ता
पडोनीयां॥ महीं लोळेगडबडां रडोनीयां॥ ४५॥ ॥ पद्य॥ ॥ उष्णेंपोळेनि
यां प्रबळ॥ कोमाइलें श्रीमुखकमळ॥ कंठीं खरसी दाटु निविकळ॥ झालीत
नुभारी॥ ४६॥ तेव्हां माता धरोनिपोटीं॥ कुरवाळी मुखकर संपुटी॥ ह्मणेबाळा
उघडूनदृष्टी॥ मजकडे पाहें॥ ४७॥ राजा धुंडीजल कांतारीं॥ तडागसरितास
रोवरीं॥ बिंदुमात्रही नदिसेवारी॥ परतुनिये कष्टें॥ ४८॥ स्नेहें कवळून बा-
ळकासीं॥ वाराघालिती पल्लवेंसीं॥ रडतीदेखोनियांत्यासीं॥ दुःखें पशु प
क्षी॥ ४९॥ ॥ छंद॥ ॥ हळूहळू पुढेंचसिंचालती॥ नादिसेपरीसाउलीक्षि
ती॥ दग्धलींवनें करपले तरू॥ विकळजाहलें बहुत लेंकरू॥ ५०॥ समि
रतोनयेलेशही पहा॥ तांपलीमहीरविकरेंमहा॥ पोळती पथीं पाय चटां॥

फोड पेउनी फुटतित्वक्त्वटां ॥ ५१ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ विश्वामित्र वयस्क भूसुर असा रायापुढें ठाकला ॥ भूपें वंदुनि आदरें पुसतसे कोठोनियां पातलां ॥ तो बोले कुमरासहीत वनिता याचस्थ आश्रमींपहा ॥ पंथीं पोळति चालतां चरणरे भोगीतसों कष्टहा ॥ ५२ ॥ ॥ आर्या ॥ ॥ यमयातननाहिंचुकती, देतां दानांसि पादरक्षाया ॥ होती समर्थ तेणें, हरिचे तुजसतत पाद रक्षाया ॥ ५३ ॥ ॥ साकी ॥ ॥ ऐसें ऐकुनि त्रिवर्ग हीतें अर्पितिपादत्राणा ॥ नग्नपाद मग चालति पंथें, कष्टें अपार जाणा ॥ ५४ ॥ पायां तळितें धरा तापली, उष्णें पोळति माथे ॥ अंतरिं पीडित तृषातिघांही, साउलि लेशनपंथें ॥ ५५ ॥ ॥ आर्या ॥ ॥ विश्वामित्र पथीं त्या, घालुनियां याचणें प्रपासन्ना ॥ सेवातोयविचारा, नकरीतां अंतरीं नृपासन्ना ॥ ५६ ॥ केल्या पथिकसुखास्तव, सुमनसुगंधान्विता अमितसेजा ॥ विश्रांति घेतल्याविण, पंथीं श्रमलेति फार नतसेजा ॥ ५७ ॥ सुरतरुछाया शीतळ, रंभे ऐशा सुसदनिं जायाहो ॥ रत्नें जडीत मंचक, क्षणभरि तरि यावरी निजायाहो ॥ ५८ ॥ ॥ कडवीं ॥ ॥ राजा विनवितसे विमासीं ॥ पोई उदकासी ॥ सेवितांचि सुकृतराशी ॥ पावति विलयासी ॥ चाल ॥ ऐसें बोलुन उदक न घेतां ॥ सत्वधीर जात सुपंथें ॥ ऐकाश्रोते० ॥ ५९ ॥ आलीं त्यापाठीं तें नृपराणी ॥ विप्र वदे तिज वाणी ॥ माते श्रमलिस सद्गुणखाणी ॥ प्राशन करीं पाणी ॥ चाल ॥ सति म्हणे जी प्राण गेलियां ॥ नेघें पोई जळातें ॥ ऐकाश्रोते० ॥ ६० ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तदां कौशिकें मोहव्यावा मतितें ॥ असी दाविली मावतारामतीतें ॥ हरिश्चंद्रसा आश्रमीं बैसवीला ॥ सुखें भोग भोगीतसे दाखवीला ॥ ६१ ॥ तेव्हां विप्र म्हणे सती प्रति तुला बाहे पती आश्रमीं ॥ तो पाहें नयनीं तरी झडकरी चालेन होय श्रमी ॥ साध्वी बोलत पश्चिमे प्रतिजरी पावेल मित्रोदया ॥ रायापासुनि हें तथापि न घडे मानीं अशा निश्चया ॥ ६२ ॥ ॥ गीत ॥ ॥ ऐसें बोलून राज्ञी अग्नीं गमन ॥ करिती झाली तंव येनृपनंदन ॥ त्यातें मुनी बोले बा घे जीवन ॥ ये रुह्मणे रविवंशीं घडलें हें न ॥ परिसा भावि० ॥ ६३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ बोलुनी यांबाळ तोय या रीती ॥ पुढें जातां विस्मित विप्रचित्तीं ॥ मग क्रोधें अनर्थ तयें केला ॥ सभोंवतां वणवा लावियेला ॥ ६४ ॥

पक्षिआणि श्वापदें आहाळोनी ॥ प्राणवेगें सोडिती तडफडोनी ॥ धूम्रदाटें कों दल्या दिशादाही ॥ एकमेकां दिसतिना सर्वथाही ॥ ६५ ॥ ॥ साकी ॥ ॥ वण वायेउन आंगीं झोंबतां बाळक मातेकंठीं ॥ मिठी घालुनी रडतां जननी ॥ धरित कवळुन पोटीं ॥ ६६ ॥ भूपति बोले मरणाति घात्रीं, आले निश्चय आतां ॥ विप्र ऋणातें मोचन नोहे, बसले दृढतर माथां ॥ ६७ ॥ बाळक कडिये घेउनियां मग, भूपति अग्नीं जात ॥ आडरानीं ते एकटी राज्ञी, चुकली आरण्यांत ॥ ६८ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ सभोवती पाहे घाबरोनी ॥ ह्मणे पती पुत्र गेले जळोनी ॥ आतां कायमीं सार्थक वांचुनी ॥ देबा वन्ही ठाव पोटीं ॥ ६९ ॥ ह्मणे तान्ह्या रोहिदासा ॥ कोठें चुकला सि बाराजसा ॥ हे प्राणपते रविवंशावतंसा ॥ कां वो मज सींउपेक्षिलें ॥ ७० ॥ ॥ आर्या ॥ ॥ ऐसा विलाप करुनी, घाया स्वप्राण होय सिद्ध सती ॥ धर्मशिळेवर ज्यापरि, पार्थुनि अनलाउभी प्रसिद्ध सती ॥ ७१ ॥ ऐसें देखुन मुनिनें, वैश्वानरशी प्रशांत तो केला ॥ वृद्ध ब्राह्मण वेषें, सति सन्मुख येउनी उभा ठेला ॥ ७२ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ मुनि वदता तियेतें कोण तूं सांग येथें ॥ गमन करिसि कैसें काननीं आडपंथें ॥ ह्मणत सति तयांसी जाण पांथस्थ आह्मीं ॥ ममसुत पति पंथें देखिले कायतुह्मी ॥ ७३ ॥ येरु ह्मणे पैल समीप भागीं ॥ प्रेतें पहातीं पडलीं स्वआंगीं ॥ दावीत यां ऐसिं च निर्मुनियां ॥ ती तें खरीं भासलिं देखुनीयां ॥ ७४ ॥ मग सती धरणीवर कायती ॥ त्यजुनियां विलपे मग कायती ॥ नृपवरा सुगुणा ममजीवना ॥ मज कसें त्यजिलें आजि जीवना ॥ ७५ ॥ ॥ छंद ॥ ॥ बाळकू नृपा हृदय कवळुनी ॥ विलपत मुखवीं वदन ठेउनी ॥ ऐकतां तिचीं शोक उत्तरें ॥ रुदति श्वापदें थोर गहिंवरें ॥ ७६ ॥ ॥ ओंवी ॥ बारे कवणा घालूं भोजन ॥ कवणा वो पूं स्तनपान ॥ कडिये घेउनियां वचन ॥ बोलूं आतां कवणाशीं ॥ ७७ ॥ ऐसा विलाप करितां सती ॥ अस्तमाना गेला गभस्ती ॥ ऋषी ह्मणे वृथा शोक किती ॥ करिसी चाल ममगृहा ॥ ७८ ॥ कडवीं ॥ ॥ ताऱ्यमाति तव बोलत स्वामीं ॥ त्यजुनी पति पुत्रा मीं ॥ वस्तु हे ठेउन व्यर्थ शिकामीं तरि पापपरिणामीं ॥ चाल ॥ पतिच्या संगें निश्चय आतां ॥ सेविन गा अनलातें ॥ ऐका ओतें ॥ ७९ ॥ येरु बोलतं तव भर्त्यासीं ॥ ऋण आहे ऐसी ॥ घातीं पडलीस श्र

ण्गासीं ॥ तरिवारितयांसी ॥ चाल ॥ ऋणमोचनतेंविना झालिया ॥ नपवेतो सद्गतितें ॥ ऐकाश्रोते० ॥ ८० ॥ ऐसेबोधुनतिजसीत्वरित ॥ द्विजझालागुप्त ॥ अंधकारतोपडलाबहुत ॥ नदिसेसन्निधवस्त ॥ चाल ॥ विश्वामित्रेंमायीक- व्याघ्र ॥ धाडुननेलींमेतें ॥ ऐकाश्रोते० ॥ ८१ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ व्याघ्रेंविदारिलींमेतपोटें ॥ धांवेमुखपसरोनीमोठें ॥ गुरगुरोनीपुच्छआपटीनेटें ॥ सतिहृदयफाटेदेखतां ॥ ८२ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ आकांत तेव्हांसतिलागिंझाला ॥ घायानसेचीउपमा तयाला ॥ दुःखेंकरीशोक विलापकारी ॥ तों पातला तो उदया तमारी ॥ ८३ ॥ ॥ गीत ॥ ॥ तंवतो भूपति तेथें, बाळक स- हित ॥ हिंडत त्याचिपंथें, आलात्वरित ॥ हर्षेंसति पदिं लागुनि, वृत्ताकथित ॥ परिसुनिभूपतिझाला, विस्मितबहुत ॥ परिसा भाविक० ॥ ८४ ॥ ओंवी ॥ ॥ कष्टेंलोटला एकमास ॥ तिघांहीन लाभेसुखाचा लेश ॥ दुःखावेगळें एकनिमिष ॥ गाधिजजावोंनदेची ॥ ८५ ॥ असो कुमारकांता सह नृपती ॥ परमकष्टेंचालतां पंथीं ॥ वाराणसीमुक्तिपुरीमती ॥ देखतांनमिती साष्टांग ॥ ८६ ॥ स्वर्धुनीजळीं करूनिस्नान ॥ घेतलें विश्वेश्वराचें दर्शन ॥ तों विश्वामित्र ह्मणे येउन ॥ दक्षिणा माझी देइजे ॥ ८७ ॥ ॥ आर्या ॥ ॥ भूप- ह्मणे मुनिवर्या, भरला ऋतपूर्णवायदासाचा ॥ आजी सूर्यास्तवरी, नाहीं विश्वास काय दासाचा ॥ ८८ ॥ कौशिक ह्मणे बहु बरें ॥ जातों येतो फिरोनि आ- जिमला ॥ देतांनदक्षिणा तूं, शापिन मगमीं नृपानव्हेचिभला ॥ ८९ ॥ दिंडी ॥ नृपाहस्तीं मुद्रिका त्रिशंकूची ॥ विकोनीनेघेतृण पेंढिसाची ॥ हातवटींबांधुनी तृणमाथां ॥ रावबोलेआसुतेंघ्याजितांता ॥ ९० ॥ सभोंवतेगोठलेलोकपाहीं ॥ विलोकाया कौतुक तयेठायीं ॥ सतीबोलेरायासितेधवांते ॥ विकाआधींनिजकरें स्वयेंमातें ॥ ९१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ भूपह्मणेमीं झाल्लो, निष्ठुरतुजलागुनी विकायाला ॥ राक्षस पिशाचयेतिल, मजपाशीं कठिणपणाशिकायाला ॥ ९२ ॥ ॥ छंद ॥ ॥ मगसतीचिया मस्तकीं तृणा ॥ बांधुनीउभीकेलीत्याक्षणा ॥ देखतांजिचें वदन लोचनीं ॥ होयचंद्रतोक्षीणलाजुनी ॥ ९३ ॥ ग्राहिकें बहू आलीं तेक्षणीं ॥ सुरूपदेखुनी वदत कुंटिणी ॥ कायतंइचें मोलसांगणें ॥ एक

भारद्या हेमतोह्मणे॥९४॥ ॥ साकी॥ ॥तारामतितें रोदनकरुनी, लागत मुनिपदिंभावें॥ह्मणेपसरुनीपदरमागतें, इजसीं मजनविकावें॥९५॥ तंव त्यासमयीं काळकौशिक, नामें द्विजवरआला॥ घेउनिसतिला एक भारतें, कांचनदेताझाला॥९६॥ ॥श्लोक॥ ॥तोविप्रतीतें ह्मणेचालबाईआयेरी निघेलागुन कांतपायीं॥ आतां ह्मणे दुर्लभपाय झाले॥ बोलोनिकष्टें मगशी घ्रचाले॥९७॥शिशुवदे मजदारववी एकदां॥ जननि पाहिनयावरितेकदा॥नृ पह्मणेतुटला अनुबंधवा॥बडविवस्त्रकुमार धबाधबा॥९८॥ ॥आर्या॥ विप्रेंसतीसनेतां, शिशुशोकें ह्मणुनिअंब अंबरडे॥ पाहुन वत्सापरित्या, फो डितसेमायगाय हंबरडे॥९९॥ ॥ ओंवी॥ ॥बाळकधांवोनी लवलाहें॥ ह्मणे मातेउभीराहें॥ मजसांडोनिजननीये॥ कोठेंजातेस सांगपां॥१००॥ आर्या॥ ॥राज्ञीविप्रासि ह्मणे, बापापळमात्रसोडराहूं दे॥ मगमजदुर्लभ हो इल, शिशुचेंमुखपोटभरुनपाहूं दे॥१॥ ॥ओंवी॥ ॥उभीराहोनीनृपवेल्हाळा ॥पोटीं कवळिलेंसुकुमारबाळा॥ स्तनघालोनीमुखकमळा॥ कुरवाळोनीबुझा वी॥२॥आंसवें भरोनीउभयनयन॥ हाहाशब्दें करीरोदन॥ विप्रह्मणेहोस्नेह- सोडुन॥चालसत्वरींसुपंथीं॥३॥ ॥आर्या॥ ॥द्विजकेश धरुनिओटी,ओ टीतो शिशुहिवस्त्रकवळून॥रववळुनलत्ताइाणीं, विप्रनपरिहोयदूरजवळून ॥४॥ओंवी॥ ॥राज्ञीलागोनविप्रपायीं॥ ह्मणेताता एवढें बाळघेई॥जेंवींव त्सआणिगाई॥ एकेठायींमळविजे॥५॥करुणायेवोनिद्विजोत्तम॥ त्याचेंअ र्घीभार देउनी हेमा॥ कुमारासहित्राजभामा॥स्वकीयधामाआणिली॥६॥ आर्या॥ ॥विप्रेंकेलीत्यापरि, व्हांवीं धनदासहीरखरेदीन॥ भाक्तनफिरतांहो ती, जेंप्रभुतेदासहीरखरेदीन॥७॥ ॥साकी॥ ॥हरिश्चंद्रतें ह्मणे ईश्वरा, आतां हे सुतजाया॥ दृष्टिनपडतीह्मणउन दुःखें, घालीमहिवरिकाया॥८॥ मगतो आपुले माथां तृणतें, बांधीविकोनघ्याया॥ चोहटींराहुनउभाजनासीं, बोलेमजसींघ्याया॥९॥ धनाढ्यमोठावीरबाहुतें, महारग्राहकआला॥ दोन भारतेंकांचनदेउन, नृपासघेताझाला॥१०॥ ॥ कडवीं॥ ॥ राये ओटभार हेमासीं॥ विश्वामित्रासीं॥अर्पोनिलागतचरणासीं॥ बोलत वचनासीं॥

॥ चाल ॥ ॥ स्वामितेंम्यां बहु श्रमविलें ॥ आतां जाय अयोध्येतें ॥ ऐकोन्नो-
ते० ॥ ११ ॥ डोंबासंगें मग नृपनाथ ॥ गृहिंत्याचे जात ॥ मांसाची दुर्गंधी बहु येत ॥
कंटाळे चित्त ॥ ॥ चाल ॥ ॥ डोंबपत्नी त्या पाहुनि बोल तयोग्य नव्हा दास्यातें ॥ १२
॥ ॥ श्लोक ॥ ॥ तंव वदत नयासी भूपतो दीनवाणा ॥ करिन सकळ काजा थोर सा
नाहिं जाणा ॥ तुम्हि मज करिनां नीं वेचिल्या द्रव्य राशी ॥ मुरवत नरिंगाझी कास-
यानीं तुह्मासीं ॥ १३ ॥ त्या लागीं पट कुरजीर्ण मग ते देवोनि आंगावरी ॥ लावीला नृप
चाकरीस गृहिंचा तो काम धंदा करी ॥ येती हस्त किं फोड ते तरत गं धान्या दळीतां सदा
॥ वाहे रक्त नयांत तिल बहु परी कोणा न दावी कदां ॥ १४ ॥ झाडोनी सकळां गणा-
सि गदळा नवोनि त्या कीदुरी ॥ घेवोनी शिरिं घागरी जळ भरी धांवोनि गंगातिरीं ॥
गाधीजें तंव गुप्त रूप धरतो भंगोनियां पाडिला ॥ तेव्हां आणिक डोंबपत्नि जव
ळी मागोनियां घेतला ॥ १५ ॥ ॥ गीत ॥ ॥ या परि घट भंगितां शिरिंचे दाही म
हारीण क्षोभून लत्ता हाणित पायीं ॥ मग मुनि राजणिं छिद्र करील वळा हीं ॥ अ
वघा दिन जळ भरितां नुरले कांहीं ॥ परिसा भाविक० ॥ १६ ॥ ॥ छंद ॥ ॥ डों
ब भोजनीं उदक मागतां ॥ खवडवडीत तो राजण रिता ॥ धरुनियां शिरिं खंडोंब
त्यास दा ॥ मार मारुनी करिति आपदा ॥ १७ ॥ ॥ आर्या ॥ ॥ बांधुनि ता-
डिति ओढिति, खाटिक जैसे झडो पडो बकरें ॥ तैसें राया हाणिति, दंडें पादें
हि उग्र डोंब करें ॥ १८ ॥ ॥ छंद ॥ ॥ ह्मणत मांस हें रांधिरे तरी ॥ भाजती मि
रा फुंकितां चुली ॥ सूर्य अस्त तो झालिया पुढें ॥ पदरिं घेत से धान्य रोकडें ॥ १९
॥ श्लोक ॥ ॥ पिष्टाचे मग रोट चार बरवे केले सदा त्यांतुनीं ॥ अर्पायाअतिथीस
अर्ध उरले ते आपणा लागुनी ॥ विश्वामित्र धरोनि वेष दुसरा मागे तदां भोजना ॥
रायें पूजुन वाढितां सकळ ही तो भक्षित्या चिक्षणा ॥ २० ॥ ॥ आर्या ॥ ॥
नित्य नवा वेष मुनी, भक्षी घेवोनि पान गे चारी ॥ बोले ऐसी तृप्ती, भासन व्हे स्व
र्गिंच्या हि उपचारीं ॥ २१ ॥ भूपत सा त्व उपाशीं, नित्य निजे वीरबाहु दारांत ॥ उष
सीं उठे दळाया, गणिला जो बुधजनीं उदारांत ॥ २२ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ ऐसें वर्ष
लोटतां जाण झालां ॥ हरिश्चंद्र अत्यंत रोड झाला ॥ ह्मणाति डोंब लागला रोग या
सी ॥ व्यर्थ गेल्या आमुच्या हेम राशी ॥ २३ ॥ नव्हे काज या लागिं स्मशानातें ॥

रक्षणार्थ ठेवुनी वदति त्यातें॥ विना द्रव्य घेतल्या कदापाहीं॥ येतजाळ्यें धावें नसर्वथाही॥२४॥ ॥ साकी॥ ॥ इकडे तक्षकाकाळु कौशिका, सदनीं सुखी असतां॥ उसंत नोहे अहोरात्रकीं, कष्टें धंदाकरितां॥ २५॥ शिष्य तयाचे त्यांत असे नो, बाळक रोहीदास॥ तयासंगती काळक्रमोनी, शिणवितसे दे हास॥२६॥ ब्राह्मण बोले समस्तांसत्या, पुष्पें तुळसी कमळें॥ दर्भसमीधा घेउनि यावें, सत्वर पूजनवेळे॥२७॥ ॥ छंद॥ ॥ पातली वनासर्व बाळकें॥ तुळसि दर्भही खुडिति कौतुकें॥ कमळ देखुनी तंव सरोवरीं॥ रोहिदास तो शिरत अंतरीं॥ २८॥ पूर्वि कौशिकें तक्षकापती॥ धाडिला वसे ज्यांत दुर्मती॥ तेंचि पद्मतो बाळ तोडितां॥ व्याळ सत्वरी होय डंखिता॥२९॥ ॥ ओवी॥ ॥ हाक फोडोनी रोहिदास॥ मूर्च्छीत पडला धरणीस॥ बाळें आक्रंदती बहुवस॥ बा तुझे मातेस काय सांगों॥३०॥ ॥ पद्य॥ ॥ तंव तो बोले तुम्ही गृहासी॥ जातां माता पुसेल मजसी॥ माझा प्रणाम सांगुन तिजसी॥ न करूं द्या शोका॥३१॥ ऐसा बोलत असतां आला॥ झोंडू त्याचिया वदनाला॥ वेगा सरिसा त्यजितां झाला॥ पंचही प्राणांसी॥ ३२॥ बाळें रोदत सदना आलीं॥ तारामतीतें कथितीं झालीं॥ परिसुन माता शरीर घाली॥ धरणीवर दुःखें॥३३॥ ॥ आर्या॥ ॥ एकुलतें मम बालक, नेलें तें केंवि निष्ठुरें काळें॥ काळें करुन नृपासीं, भेटलिया दावुं काय मुख काळें॥ ३४॥ ॥ गीत॥ ॥ मग ते वृत्त विचारी संगति यातें॥ कोठें त्यजिलें बा रे मम वत्सातें॥ अनाथ होउन पडलें कवण वनातें॥ काय तुम्हांसी वदलें मसिं सांगा तें॥ परिसा भाविक हो०॥ ३५॥ करितां बहु वस धंदा ब्राह्मणें मजलागीं॥ मातें श्रमलिस वैसें मीं निज अंगीं॥ रगडितों पाय तुझे अति अनुरागीं॥ तो मज सांडुन गेला कैसा वेगीं॥ परिसा भाविक हो०॥ ३६॥ ॥ कडवीं॥ ॥ केला काय मी पंक्तिभेद॥ कीर्तन उच्छेद॥ किंवा अवमानुन साधूवृंद॥ लाविला शब्द॥ ॥ चाल॥ ॥ अथवा धरुनी व्रतनियमातें॥ अपूर्ण त्यजिले त्यातें॥ ऐका श्रोते०॥ ३७॥ केला द्रव्याचा अभिलाष॥ कीं हरिपूजन ऱ्हास॥ क्षुधितासुखिंचा काढुन ग्रास॥ दिधला बहु त्रास॥ ॥ चाल॥ ॥ किंवा पाडस-

डस आणि कुरंगी ॥ विघडीलें म्यां त्यातें ॥ ऐका श्रोते० ॥ ३८ ॥ ॥ श्लोक ॥ जळत हृदयिं ऐशी दुःख शोकानळातें ॥ तळमळित्यजि तांची मीन जैसा जळातें ॥ गलबल करितां तो विप्र येई लरागा ॥ ह्मणउनि करि धंदा त्याभयें श्रेष्ठ भागा ॥ ३९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ सारुन सर्वहि धंदा, झालीया मध्यरात्रिउप्रांतीं ॥ कोठें बाळक पडिला, हुडकाया मग निघे वन प्रांतीं ॥ ४० ॥ ॥ ओवी ॥ ह्मणे बारे मज डोळसा ॥ कोठें आहेस राजहंसा ॥ सख्या ओदेई बापा डसा ॥ रोहिदासा सकुमारा ॥ ४१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ नृतें सिंहू फराळा, केलें स्नानार्थ तोयहीऊन ॥ ऊनवनी तुज बाधिल, पाहें पथ मीस चिंत होऊन ॥ ४२ ॥ ॥ ओवी ॥ ॥ धांवतां आंधारीं चहूं कडे ॥ क्षणक्षणा अडखळोनी पडे ॥ भाळीं आदळती वृक्ष रोकडे ॥ अश्रू न्हवाहे नकळे तें ॥ ४३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ सरोवरीं बाळक प्रेत होतें ॥ सतीपुढें टाकिलें गाधिजें तें ॥ लागतां चीं पायांस चांचपोनी ॥ ओळखीलें सुत शवा तये क्षणीं ॥ ४४ ॥ निढळासी निढळ मिळविलें ॥ करी शोकें आक्रोश्न तये वेळें ॥ ह्मणें कां बा सोडिलें विदेशासी ॥ बोल कांहीं पाडसा मजपासीं ॥ ४५ ॥ स्नेह पान्हा फूटला तदा मूखीं ॥ घालि स्तन घेउनी प्रेत अंकीं ॥ विप्रवेषें गाधिज प्रघटोनी ॥ ह्मणे कोण रडसि तूं यथास्थानीं ॥ ४६ ॥ ॥ साकी ॥ ॥ सती ह्मणे बा सर्पें डंखुन, वधिलें मम पुत्रासीं ॥ विप्र वदे तरी आतां चरात्रीं दहन करावें यासीं ॥ ४७ ॥ डोंब देखतां न देति जाळूं, ऐसें बोलुन वेगें ॥ गंगातीरीं आणुन प्रेता, केलि तयारी आंगें ॥ ४८ ॥ प्रेत घालुनी सरणीं वेगें, आपण झाला गुप्त ॥ तारामति ते रोदन करितां, ऐकुन ये नृपनाथ ॥ ४९ ॥ ॥ छंद ॥ ॥ केशिं धरुनियां ओढिलें तिसीं ॥ धन दिल्याविणें कें विजाळसी ॥ लाथ दीधली तीज सोभुनी ॥ सरण विझविलें तोय सिंचुनीं ॥ ५० ॥ सति पुढें त दां प्रेत टाकिलें ॥ केश जळुनियां आंग भाजलें ॥ विभल होउनी पडले लेंकरूं ॥ सति ह्मणे अहा कर्म दुस्तरू ॥ ५१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ राजा ह्मणे अहाहा, कोणे काहो महामहीपतिचा ॥ बाळक काळ कवळ हा, नाहीं परिहार मृत्युच्या गतिचा ॥ ५२ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ नृपवर तिज बोले, कोण तूं चारुगात्री ॥ रुदन करिसि येथें येकली मध्यरात्रीं ॥ नकळत कवणाचा पुत्र हा जाळितेसी ॥ त्वरित मजसि सां

गेंसत्यतेंनिश्चयेंसीं ॥ ५३ ॥ ॥ आर्या ॥ ॥रावअयोध्यापतिची, भार्यामी रोहिदाससुतत्याचा॥ तक्षकदंशेंमेला, मालविलावंशदीपसवित्याचा ॥ ५४ ॥ऐकुनमहिवरमहिवर, मूर्छायेवोनिवृक्षसापडला ॥ रडलादुःखभरेंब हु, नमरेजोडोंबहस्तिसांपडला ॥ ५५ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तारामतीबोल्लतजा णत्यातें ॥ तूंकोणहेंसत्यनिरोपिमातें ॥ सांगेहरिश्चंद्रअसेंतियेसी ॥ मातेंज नींबोलतिनिश्चयेंसीं ॥ ५६ ॥ ॥ ओवी ॥ ॥ काळकौशिकेंतुजनंलियावरी ॥ म्यांविकोनघेतलेंडोंबाघरीं ॥ मजअन्ननाहींवर्षभरी ॥ सांप्रतस्मशान रक्षितसें ॥ ५७ ॥ ॥ आर्या ॥ ॥राज्ञीश्वपचासमती ॥ पतिचीपाहोनदुर्द शारडली ॥ घडलीदुर्गतितुह्मां, ऐसेंबोलोनमूर्छितापडली ॥ ५८ ॥ ॥ ओवी ॥ ॥असोएकमेकांचेगळांपडोन ॥ शोककरितीअत्यंतदारुण ॥रा येंपुत्रप्रेतांकवळुन ॥ मांडिलाविलापआक्रोशें ॥ ५९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ चांडाळाज्ञानसतां, होमावापावकांतसुतकाय ॥ तरितेंमुक्तनव्हेची, क रणेंयातें उपाय तोकाय ॥ ६० ॥ ॥ ओवी ॥ ॥मगआज्ञाघ्यायाडोंबास दनीं ॥ नृपजातांमुनीतेथेंयेउनी ॥ तारामतीस ह्मणेययेस्थानीं ॥ विवशी तूंतें भक्षिल ॥ ६१ ॥ ॥ साकी ॥ ॥देवालयतेंपैलअसेत्या, माजीक्षण भरबैसें ॥ मगतेप्रेताघेउनआली, देउळीं ऐकुनी ऐसें ॥ ६२ ॥दुःखनिजेनें तिजशींव्यापितां, विप्रेंफोडुनप्रेत ॥आंतडींकाढुनतिचेमुखासीं, सरक्तलावि लींत्वरित ॥ ६३ ॥शंखध्वनिमगकरितआपण, बाहेरयेताझाला ॥ वेसकरा सीं ह्मणें लांवहो, आलयिंभक्षितबाळा ॥ ६४ ॥ ॥ ओवी ॥ ॥ माझेपा- ठीस होतीलागली ॥ म्यांभेणेंहांकफोडिली ॥ तुह्मादेखोनदेवळांतगेली ॥मा राभक्षीलसकळांतें ॥ ६५ ॥ ॥ दिंडी ॥ ॥प्रातःकाळजाहलातदापाहीं ॥ लोकतेथेंपातलेलवलाहीं ॥ महारांहींजावोनिदेउळांत ॥ धरुनकेशींबांधि लेंगळांप्रेत ॥ ६६ ॥उफराटेहस्ततेआकळीले ॥ नेत्रदोन्हीतैसेचबांधियेले ॥ ताडितचीआणिलीराजद्वारा ॥ अमितशोकातेंकरीभूपदारा ॥ ६७ ॥ ॥ आर्या ॥ ॥रडतांरडेलकितिते, झालेंअतिशुष्कजाणनरडेंतें ॥ नरडेंउल टेक्लेशा, तुळितांनपुरेधंराहिपरडेंतें ॥ ६८ ॥ ॥ ओवी ॥ ॥डोंबातेंआ

ज्ञाफरी चौधरी ॥ लांबेच्याशिरच्छेद करावासत्वरी ॥ केशीधरूनतयानिष्ठु रीं ॥ पुरीबाहेरनेलीपैं ॥ ६९ ॥ वीरबाहू हरिश्चंद्रालागुन ॥ ह्मणेइयेचें करी-शिरच्छेदन ॥ येरू ह्मणे आज्ञाप्रमाण ॥ ओळखिलेंनिधानतारामती ॥ ७० ॥ छंद ॥ ॥ स्वर्धुनीजळींस्नानकरवुनी ॥ उभीवधावयाकेलीतत्क्षणीं ॥ येरी अंतरींस्मरुनिमाधवा ॥ मागतअसेंहेंचितेधवा ॥ ७१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ नाथहरिश्चंद्रअसो, जन्मोजन्मींगुरूवसिष्ठमुनी ॥ सुतरोहिदास याचक, कौशिकमागेंअसेंसतीनसुनी ॥ ७२ ॥ ॥ रावबधायाउचली, करतंवहांहांह्मणोनियेहरितो ॥ नृपकरसशस्त्रआकळि, स्मरणेंअधनगसमस्तजोहरितो ॥ ॥ ७३ ॥ ॥ ओवी ॥ ॥ नृपातें आलिंगी जगजेठी ॥ येरें चरणींघातलीमिठी ॥ रोहिदासाउठविलें अमृतदृष्टी ॥ हृदयींधरिलीतारामती ॥ ७४ ॥ झालाएकविजयजयकार ॥ सुमनसंभारवर्षतीसुरवर ॥ प्रकट होउनीगाधिकुमर ॥ हृदयीं धरितत्रिवर्गा ॥ ७५ ॥ ॥ कडवीं ॥ ॥ कोटीवर्षे विश्वामित्रें ॥ तपकेलेंहोतें ॥ अवधेंअयतें भूपाळातें ॥ दिधलेंनिजहातें ॥ ॥ चाल ॥ ॥ वीरबाहुआणिकाळकौशिका ॥ उद्धरिलेंकमलाकांतें ॥ ऐकाश्रोते० ॥ ७६ ॥ आलासद्गुरुवसिष्ठ दावुनी ॥ अतिप्रेमेंकरुनी ॥ नमितिनृपसहराज्ञानें ॥ ऐकाश्रोते० ॥ ७७ ॥ ॥ गीत ॥ ॥ मगत्या विश्वामित्रें गजरें करूनी ॥ सपरिवारनृपासींअयोध्याभुवनीं ॥ आणुनियांस्थापिलें सिंहासनीं ॥ गुढियाजनउभवितीहर्षेंसदनीं ॥ परिसा० ॥ ७८ ॥ ॥ साकी ॥ ॥ अयुताब्देंवरिराज्यकरूनी, रायाहरिश्चंद्रानें ॥ स्वपुरीसंहमगवैकुंठातें, गेलाआनंदानें ॥ ७९ ॥ ऐसें प्रेमळचरित्रगातां, अगाधदुरितें हरती ॥ कृष्णादासकरि विनतीयींस्तव, परिसाजनहो प्रीती ॥ ८० ॥ ॥ इतिश्रीकृष्णदासदामोदर कविविरचितं हरिश्चंद्रोपाख्यानं समाप्तं ॥ ७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ गीत ११ ॥ ओव्या ३४ ॥ दिंड्या ११ ॥ श्लोक ॥ २४ ॥ आर्या २१ ॥ छंद १५ ॥ साक्या २५ ॥ कडवीं १५ ॥ कटाव १ ॥ पद्यें ७ ॥० येकूण संख्या १८० ॥ ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥



## अथ मार्कंडेय आख्यान प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ साकी ॥ ॥ मृकंड नामक महातपस्वी, मुनिवर सत्य पथगामी ॥ प्रियातयाची लागुनचरणीं, विनवीगुजनिजधामीं ॥ १ ॥ संतानेविणाजिणेंजगींमज, भासेव्यर्थपसारा ॥ यास्तवंस्तवुनी गौरीशासुत, मागाकुल उद्धारा ॥ २ ॥ ॥ आर्या ॥ ॥ पुत्राविणेनसद्गति, आकर्णुनिभाषणाअशास्त्रीच्या ॥ मानीकृतमुनियास्तव, नवदेहेआश्रयेंअशास्त्रीच्या ॥ ३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ प्रियेचीयाअंतराजाणुनीयां ॥ वनींगेलातोतपानिघोनीयां ॥ शीतउष्णासोसुनीतापभारी ॥ अनुष्ठानींबैसला निराहारी ॥ ४ ॥ षडक्षरीविध्युक्तमंत्रकोटी ॥ जपहोतांपावलाईशतुष्टी ॥ मुनीसन्मुखयेउनीतत्क्षणीं ॥ अरंभ्रूहीयापरीवदेवाणी ॥ ५ ॥ ॥ आर्या ॥ ॥ परिसुनमहेशवचना, सुखकारकत्यामृकंडसंतानें ॥ बोले विरक्तमीपरि, निरसा वेदुःखजेंअसंतानें ॥ ६ ॥ सांगे प्रभुगुजऐकें, मूर्ख कुरूप हिशतायुसुतपाहें ॥ अल्पायुसाधुधीमान्, कवणारुचेयांतसांगसुतपाहें ॥ ७ ॥ ॥ ओवी ॥ ॥ ऐकोनिमुनीझालातटस्थ ॥ दोहींकडे वेधलें चित्त ॥ मगप्रभूतेंविनवीजोडुनिहस्त ॥ अवघी किंचित्‌मज धावी ॥ ८ ॥ कोणतापुत्रकांतेलागुनी ॥ मानवेयेतोंविचारुनी ॥ ऐसेंबोलोनस्वाश्रमीपेडनी ॥ स्त्रीतें साकल्यकथियेलें ॥ ९ ॥ ॥ छंद ॥ ॥ वंदुनीसती प्राणनायका ॥ वदतमू

खंतो सुतनकानका ॥ उपलयाजगींथोर बहु दिसी ॥ काकधूकने दीर्घ आयुषी- ॥ १० ॥ डागसकुळामूर्खत्यागुणें ॥ व्यर्थकायसेंहीनते जिणें ॥ म्हणउन सांगत्येंस त्यभायका ॥ ज्ञाताघुमूढतोसुतनकानका ॥ ११ ॥ ॥ साकी ॥ ॥ साधू सुंदर सुगुणीज्ञाता, जरितोअल्पवयाचा ॥ तरीवंशातें मंगलकारक, ठेवासत्यसुखाचा ॥ १२ ॥ सत्कर्मातेआचरितांतो, त्याचीपुण्य प्रभावें ॥ गिरिजावल्लभ पावुनि तुष्टी वारिल विघ्नस्वभावें ॥ १३ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ ऐकुनीयांयापरीप्रीयवाणीं ॥ त्वरेंआलाज्यास्थळींशूळपाणी ॥ म्हणेदेवादेमसीसुतज्ञाता ॥ शंभुअस्तुबोलुनी होयजाता ॥ १४ ॥ ॥ आर्या ॥ ॥ स्वाश्रमीमुनिमगयेउनी, रमतांवनितेंसितोस्वभावानें ॥ अंतरवत्नीझाली, सतिईशाच्यावर प्रभावानें ॥ १५ ॥ नवमासपूर्णभरतां, प्रसवलिशुभलग्निंतेसुपुत्रास ॥ पाहुनितद्वदनातें, गमलेद्वी: सुरवउणें चिविप्रास ॥ १६ ॥ मार्कंडेयाख्यअसें, प्रीतीनें ठेविलेंचिजनकानें ॥ परिसुनिमधुबाळवचा, हर्षतिमातापितासुजनकानें ॥ १७ ॥ ॥ ओवी ॥ ॥ पांचवर्षें लोटतां साचार ॥ सुनीनें केलाद्विजत्वसंसार ॥ चतुर्वेदषट्शास्त्रें समग्र ॥ विद्याकळाभ्यासिल्या ॥ १८ ॥ ज्याची धीप्रभाअंतरींझळके ॥ श्रवणेंचिसर्वआकळीतकें ॥ पुराणेंइतिहास नाटकें ॥ वेदांत सिद्धांतसर्वही ॥ १९ ॥ ॥ आर्या ॥ यापरिसुखांतजातां, पळघडिदिनरात्रमासकाळजिला ॥ ब्रह्मादिरांकतीत्या, वाहतीमातापिताहिकाळजिला ॥ २० ॥ ॥ साकी ॥ ॥ षोडशवर्षे पुत्रवयातें, सन्निधआलीं भरत ॥ जाणुनिवृद्धेंदुरवेंनिशिदिनिं, रुदतीअपारग्रस्त ॥ २१ ॥ अहाअहारे देवाह्मणुनी, शोकें बडवितिभाळा ॥ अल्पायूसुतकशासदिधला, आमुतेंत्रिभुवनपाळा ॥ २२ ॥ ॥ पद ॥ ॥ हरहर शिवशंभोकैलासवासी ॥ कांरे दुःखडोहींढकलिसिआम्हासीं ॥ ध्रु० ॥ अघटितआमुचेंप्राक्तनसूत्र ॥ स्वल्पायू म्हणुनी त्वां दिधलासी पुत्र ॥ हरहर० ॥ १ ॥ दावुनिसुखलेशदुःख अनिवारीं ॥ भोगविशीकेसेंबा त्रिपुरारी ॥ हरहरशिवशंभो० ॥ २ ॥ ॥ २३ ॥ ॥ साकी ॥ रोदनकारणकळतांतनया, मानिलभयतोभारी ॥ यास्तवअंतरीं निशिदिनिझुरती, नकळतयापरभारीं ॥ २४ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ तथापीतेंनाकदांदुःखझाले ॥ सर्वेंद्रीयांशोकाब्धिबाह्यफांके ॥ अश्रुधारा लोचनीं बळें येती ॥ देखु

नीयां शंकीत पुत्र चित्ती ॥२५॥ ह्मणे काय कारण रोदमासी ॥ तदा सांगे त्या कल्यमाय त्यासीं ॥ अरे बाळा षोडशवत्सरांतीं ॥ तुला जाणें निश्चयें मृत्यु पंथीं ॥ २६॥ ह्मणोनीयां काळजी मनावाटे ॥ कसें थोर विघ्न हें वरी वाटे ॥ ऐसें वाक्य बोलुनी तयाकंठीं ॥ स्फुंदस्फुंदोनी तदा घालि मीठी ॥ २७॥ ॥पद ॥ ॥ कसिरे गतमीं करूं ॥ वत्सा कसिरे गतमीं करूं ॥ धु० ॥ अतिदुस्तर भवसागर आतां, तुजविण केवीं तरूं ॥ वत्साक०॥ १ ॥ त्यजितां बपु तें पापास्तरन्यातू, निश्चय आह्मीं मरूं ॥ वत्साक०॥ २ ॥ यातवदुर्घट वियोगदुःखा सांग-कशानें हरूं ॥ वत्साक०॥ ३ ॥ ॥२८॥ ॥ आर्या ॥ ॥ आकर्णुनि वृत्तातें, वंदुनि बोले सुतो कवचनासी ॥ स्मरतां भवपद अकशार, अनुकंपाले वबुन-कवचनासी ॥ २९ ॥ मग उभयांन सुनीतो, निघता झाला विचारुनी मूल ॥ नश्वर सर्व हि जाणुनि, आश्रयिलें दृढ जगल्लता मूल ॥ ३०॥ मृत्युंजयाविणें हें, कोण जगींया अशेषभयनाशी ॥ ऐशा निश्चय जाणुनि, तत्पर झाला तदीयभजनाशीं ॥ ३१ ॥ स्वीकारुनि शिवदीक्षा, पंचाक्षरि मंत्र अंतरीं जपत ॥ रुद्राक्ष भस्मधारण, करुनीयां काळवंचनीं जपत ॥ ३२॥ ॥ ओंवी ॥ ॥ ऐसा मृकंडात्मज निष्ठावंत ॥ शिवभजनीं सदैव निरत ॥ यात्रामिषें अवनी हिंडत ॥ कावेरीतटीं पातला ॥ ३३ ॥ त्याच दिवशीं यमगंड समजुनी ॥ पार्थिवपूजन आदरीं मुनी ॥ अंतरीं शिवपादपद्म धरुनी ॥ पद्मासनीं बैसला ॥ ३४ ॥ ॥ आर्या ॥ ॥ जो जीवाचें शासन, कर्ता निवडोनि सत्यन्यायातें ॥ तो निज अनुचर धाडी, मार्कंडेयास शीघ्र न्यायातें ॥ ३५ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ मुनींद्रावरी यथाकाळीं ॥ अंतकें दूत धाडिले तत्काळीं ॥ ते अतिविक्राळ भ्यासुर बळी ॥ आले स्मातळीं अनिवार ॥ ३६ ॥ पाश खड्ग खेटक पाणी ॥ धांवतां वसुंधरा दणाणी ॥ ओढा विदारा ऐसी वाणी ॥ गर्जती विशाळ भयानक ॥ ३७ ॥ ॥ साकी ॥ ॥ पार्थिक हस्त किं शिवनामीं रत, मुनि तें देखुन भ्याले ॥ धीमंत हि बळि पळों पाहाती, ह्मणती युक्ति न चाले ॥ ३८ ॥ भ्याले समजुनि शिवपूजेतें, गर्जत नामहरांचें ॥ तेणें न चले बळ तें कांहीं, लेश हि यमदूतांचें ॥ ३९ ॥ पूजा सरतां आकळुं ह्मणुनी ॥ तिष्ठति सन्नीधानीं ॥ जाणुनि मुनि हें वर्म भवाचें, रतलां अधिकं चि ध्यानीं ॥

॥ ४० ॥ ॥ दिंडी ॥ ॥ मुनीदंगदेखुनी शंभुनामीं ॥ दूतगेलेपरतोनकाळधामीं ॥ ह्मणतीईशपूजनीमग्नविप्र ॥ नचलेबळआमुचेंलेशमात्र ॥ ४१ ॥ नामवाचे ध्यातसेशंकरातें ॥ करावेंजीआह्मितें कायतेथें ॥ कृतांततें ऐकुनीक्रुद्ध झाला ॥ करींदंडघेउनीस्वयेंआला ॥ ४२ ॥ ॥ आर्या ॥ ॥ तेव्हांमुनिवर अंतक, घालायास्तवजपोनिघालाहो ॥ महिषारूढगणांसह, क्रोधोत्कर्षे त्वरें निघाला हो ॥ ४३ ॥ शमनस्वयेंमुनीच्या, कंठींपाशाबळें झुगारीतो ॥ झांकुनिनेत्रमिठी तै, कवटाळुनिशंकरासमारीतो ॥ ४४ ॥ ईशासहीतपडतां, पाशगळां मुनिभवास हांकारी ॥ धांवविभोकरुणाकर, दीनाचाह्मणविशी सहाकारी ॥ ४५ ॥ ॥ साकी ॥ ॥ दुर्धरअतिशय संकट पडलें, कायकरूं तरिआतां ॥ कृपाघना यासमयींनुबगीं, तुजविणनाहींत्राता ॥ ४६ ॥ ॥ पद ॥ ॥ शिवशिवसांबसदाशिव सांब ॥ हरहर धांवविभो ॥ शिवशिवसांब० ॥ ध्रु० ॥ घालु निदुस्तर कृतांतपाश ॥ ओढूंपाहे नचअवकाश ॥ करितांउपेक्षात्वंनाश ॥ होईलप्राणासजापासि हें ॥ शिवशिव० ॥ १ ॥ अखिल जगाचातूंयजमान ॥ तुजलादीनाचा अभिमान ॥ तरींबानकरीतांअनमान ॥ सोडवींमानयमकरिंची ॥ शिवशिव सांब० ॥ २ ॥ ॥ ४७ ॥ ॥ साकी ॥ ॥ ऐसीकरुणापरिसुनिअंतरीं, भोळानाथ निवाला ॥ लिंगापासुनि पिंड जटाजुट, सायुध प्रगट झाला ॥ ४८ ॥ हास्यकरोनी रोषोत्कर्षे, हाणुनि लत्ता काळा ॥ महिस पाडितां दूत पळाले, सर्वहि दाहि दिशांला ॥ ४९ ॥ मृकंडबाळा करुणाघनप्रभु, स्नेहें हृदयीं धरित ॥ ह्मणेबावत्सा कृतांत किंकरें, श्रमलासीगा बहुत ॥ ५० ॥ दिंडी ॥ ॥ सुप्रसन्न होउनी शंभुभोळा ॥ चिरंजीव अक्षयीत्यास केला ॥ तदा ब्रह्मादि देव बद्धपाणी ॥ स्तवोनीयांबोलती नम्रवाणी ॥ ५१ ॥ त्वांचि वर्षे षोडशनेमकेला ॥ ह्मणुनियातेंअंतकें धरीयेला ॥ नसेत्याचा अन्याय यांतकांहीं ॥ क्षमाकरुनीतरिकृपादृष्टीपाहीं ॥ ५२ ॥ ॥ ओवी ॥ ॥ ऐकतांसुर वाक्य शूलपाणी ॥ संतोषोनीवदेनीतिवाणी ॥ जेशिव भजनीं- निरतप्राणी ॥ काळभीती तयांनसे ॥ ५३ ॥ षोडशवर्षेचिमद्विरासत्य ॥ परीजो काळजायमद्भजनांत ॥ तोनहोयउणागणतींत ॥ यमनिश्चित जाणिजे ॥ ५४ ॥

मग उठवोनी अंतकातें ॥ गेले सकळही स्वस्थानातें ॥ कृष्णावास विनवी-श्रोतयांतें ॥ सर्वेशदासांतें रक्षी असा ॥ ५५ ॥ ॥ इतिश्रीदामोदर कविविरचितायां प्राकृत टीकायां मार्कंडेयाख्यानं संपूर्ण ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ आर्या १५ ओंव्या ११ छंद २ पदें ३ दिंड्या १० साक्या १४ एकूणसंख्या ५५



## अथ गोमाई-चरित्र प्रारंभ:

श्रीगणेशायनमः ॥ ॥ कडवीं ॥ ॥ वैकुंठाहुनि तो जगजेठी ॥ पुंडलिका भेटी ॥ आला जगतारायासाठीं ॥ भिंवरेच्चे कांठीं ॥ ॥ चाल ॥ ॥ तिष्ठत सत्वर कोणी यावें ॥ भेटुन मातें स्वहित करावें ॥ १ ॥ यात्रे पंढरिच्या जन हो-जावें ॥ विठ्ठल भजावें ॥ यात्रे० ॥ ध्रु० ॥ आषाढी कार्तिकी दोनी वारी ॥ येती जन भारी ॥ त्यांसीं मुक्ती देतो हरि चारी ॥ पाहुन अधिकारी ॥ ॥ चाल ॥ ॥ भाविक प्रेमळ नमितां भावें ॥ करितो भवपार स्वभावें ॥ यात्रे पंढरिच्या० ॥ २ ॥ ऐसी ऐकुन श्रवणीं मात ॥ एक वराड देशांत ॥ वृद्धा ब्राह्मणी विधवा राहात ॥ केरळ ग्रामांत ॥ ॥ चाल ॥ ॥ धरिला अंतरिं हेतु तियेनें ॥ जाऊन विठ्ठल दर्शन घ्यावें ॥ यात्रे० ॥ ३ ॥ नाहीं तिज कन्या किंवा पुत्र ॥ कीं जिवलग मित्र ॥ नमिळे चि अन्नहि अथवा वस्त्र ॥ कीं फुटकें पात्र ॥ ॥ चाल ॥ ॥ भिक्षा मागुन असतां नेथें ॥ ह्मणे सार्थक कांहीं करावें ॥ यात्रे पंढरिच्या० ॥ ४ ॥ ॥ अभंग ॥ ॥

आषाढीची वारी सन्निध पातली ॥ मनीं चिंतावली गोमाईते ॥ १ ॥ ह्मणे द्रव्य नाहीं लेश मज पाशीं ॥ पंढरीस कैसी जाऊं तरी ॥ २ ॥ नाहीं वाटखर्ची धान्य मूठ भरी ॥ जाणें पादचारी दूर देशा ॥ ३ ॥ ह्मणोनी यां फार मनी वाहे चिंता ॥ रडे त्यां संचिता आठवोनी ॥ ४ ॥ ॥ ५ ॥ ॥ आर्या ॥ ॥ पंथीं सांभाळुनियां, नेइल सांगाती कोण तो मजला ॥ वृद्ध अशक्ता अति मी, घेववती लांबिच्या कश मजला ॥ ६ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ हिंडोनीयां गावांत येवेळे ॥ मीठ पीठ साहित्य मेळवीलें ॥ बहू चिंध्या जोडुनी एके ठायीं ॥ बांधियेल्या मोटळ्या त्यांत पाहीं ॥ ७ ॥ नित्य यात्रा जातसे त्याच मार्गे ॥ हळू हळू चालली तया मागें ॥ नेसुं वस्त्र फाटकें जीर्ण पाहीं ॥ त्यासि ग्रंथी दीधल्या ठायिं ठायीं ॥ ८ ॥ करीं यष्टी टेकीत अनवाणी ॥ चाले माज बांधुनी दैन्य वाणी ॥ यात्रुकरां संगती महाकष्टें ॥ गुरस ळ्या सन्निध आलि नेटें ॥ ९ ॥ ॥ ओवी ॥ ॥ तों चंद्रभागेसीं आला पूर ॥ पाहोनि गोमाई चिंतातुर ॥ ह्मणे मी द्रव्यहीन दुबळी फार ॥ नेईल परपार मज कोण ॥ १० ॥ मग दशमीचिया दिवशीं ॥ यात्रा राहिली उंबऱ्याशीं ॥ प्रातःकाळ होतांच तयासी ॥ नांवा चालिल्या भिंवरींत ॥ ११ ॥ ॥ छंद ॥ ॥ भाग्यवंत ते तरीं त बैसुनी ॥ जाति तारकां द्रव्य देउनी ॥ आह्मणी तदा कोळियापाशीं ॥ जाउनि ह्मणे उत्तरि बामशीं ॥ १२ ॥ तारकां तियें वदति उत्तरा ॥ द्रव्य देउनी चाल सत्वरा ॥ येरि त्यां ह्मणे द्रव्य बा नसे ॥ ओंजळभरी पीठ घ्या कसें ॥ १३ ॥ ॥ पद्य ॥ ॥ ऐसें बोलुन नौकेआंत ॥ बैसावया सन्निध जात ॥ तंव त्यांनि र्दयीं उदकांत ॥ ढकलिली तिजला ॥ १४ ॥ तेणें वस्त्र भिजोन गेलें ॥ उदकीं पीठ ल्लवंडलें ॥ रडत चीत येवेळे ॥ बाहेर ये मगती ॥ १५ ॥ दीर्घस्वरें हांका फोडी ॥ नांवाडियां हात जोडी ॥ कृपा करुनी पैलथडी ॥ न्या मज बापानों ॥ १६ ॥ नेत्रीं अश्रु धारा वाहाती ॥ विनवी येऊन काकुळती ॥ परी कोणाचिये चित्तीं ॥ नुपजे ची कवण ॥ १७ ॥ सर्वहि यात्रा गेली पाहीं ॥ एकली उरली गोमाई ॥ ह्मणे आतां करु तरि काई ॥ ह्मणुनीयां रडत ॥ १८ ॥ ॥ पद ॥ ॥ दुस्तर माझें संचित हें ॥ कोणा शब्द नसे ॥ दुस्तर० ॥ ध्रु० ॥ विठ्ठल दर्शनी धरुनीं आस ॥ केले नाना बहु सायास ॥ त्यांची सार्थकता व्हायास ॥ कां देवास नावडलें ॥ १ ॥ बसली होउन चिंतातुर ॥ ह्मणे मज हरिनें धरलें दूर ॥ आतां कैचें पंढर पूर ॥ क

रीचुरसुर निरुपायें ॥ २ ॥ नाहींपदरीं एकहि दाम ॥ त्याविणनसरे एकहि काम ॥ मजला भेटेना घनश्याम ॥ दिनविश्राम वाटतसे ॥ ३ ॥ दुस्तर० ॥ १९ ॥ ॥ साकी ॥ ॥ ऐसीऐकुन करुणावाणी, विठ्ठलसद्गद झाला ॥ कोळीयाच्या वेषा धरुनी, धांवुनि तेथें आला ॥ २० ॥ माजकरुनी वरी बांधिती, सांगडतें-लपला हीं ॥ गोमाईच्या सन्निध येउन, तिजशीं बोलत कायी ॥ २१ ॥ कोण ह्मणे तूंब सलिसयेथें, सांगें सत्वर मजशीं ॥ पैलतिरातें असेल जाणे, चाल तरी वेगेसीं ॥ २२ ॥ तंवती बोले कोण सांग तूं, मज हें आधीं बारे ॥ देव ह्मणे मज पांड्या कोळी, बोलति जन तेसारे ॥ २३ ॥ ॥ पद्य ॥ ॥ ह्मणे बापा मीं दुर्बळ ॥ नाहीं धनतें माझेजवळ ॥ घेउनपीठ हें जरी ओंजळ ॥ नेसील तरयेतें ॥ २४ ॥ ऐकुन बोले पन्नगशायी ॥ नेघें कोणाचें मीं कायी ॥ दीनदुबळ्या उतरूं पाहीं ॥ पंढरीत राहतों ॥ २५ ॥ वृद्धा बोले एकचि वस्त्र ॥ तें बा भिजतां पीडिल शीत ॥ येरु वदे मीं कोरडी नेत ॥ बैसें मम स्कंधीं ॥ २६ ॥ उचलुन हरिनें मग तां तडी ॥ नेली तेशी चपेल थडी ॥ बोलत तेव्हां ती थेरडी ॥ पावुनियां शंका ॥ २७ ॥ ॥ आर्या ॥ ॥ वाटे अद्भुत चित्ता, न तुझें भिजलें चिलेशही आंग ॥ पातें ही त्याच परी, आणि-लिबा कोरडी कशी सांग ॥ २८ ॥ श्रीहरि ह्मणे सराइत, तारक भवसिंधु मीं न आडा नी ॥ आडानीं पहुपारे ॥ त्यांच्या विकला न जाय पाडांनीं ॥ २९ ॥ ॥ पद्य ॥ ॥ वृद्धा बोले उपकार ॥ झाले मजवर तुझे फार ॥ जन्मांतरींते साचार ॥ फिटती ना मजशीं ॥ ३० ॥ मुठभर पृथुहे मुलांस नेईं ॥ किंवा पीठ तरी हें घेईं ॥ देव वदे तें वि प्रां देईं ॥ द्वादशिच्या दिवसीं ॥ ३१ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ वदोनी असें श्रीहरी गुप्त झा ला ॥ करी ब्राह्मणी थोर त्या विस्मयाला ॥ मनीं तेधवां थोर आनंद वाटे ॥ ह्मणे देव चीं भेटला काय वाटे ॥ ३२ ॥ त्वरित मग निघाली दर्शना विठ्ठलाचे ॥ परम मुदित चित्तें गातसे नाम वाचे ॥ विपणिं तुलसिमाळा घेउ कारवार काही ॥ ति नहि मिळुन एका सापिक्या माजि पाहीं ॥ ३३ ॥ महाद्वारीं आली तंव दिसत दाटी बहु जनीं ॥ करीं पाहोनी यां मग अमित चिंता निज मनीं ॥ ह्मणे- आजी मातें न घडत हरी दर्शन खरें ॥ दिसे मोठें येथें अवघड चिहें विघ्न दुसरें ॥ ३४ ॥ करूं आंतां कायी श्रम सकल ही भासत वृथा ॥ कथूं कोणासी हें अ

घडितें निजभक्तन कथा ॥ वदोनीयां ऐसें रडत बसली फार मगती ॥ तदां ज्ञा लां तेथें प्रगट मगतो रुक्मिणिपती ॥ ३५ ॥ ॥ ओवी ॥ ॥ विप्रवेषें येउनी हरी तेथें ॥ ह्मणे कां हो रडत बसली येथें ॥ येरी ह्मणे जावया दर्शनातें ॥ रिघाव देउळीं दिसेना ॥ ३६ ॥ मजपाशीं असतें जरी कां धन ॥ तरी कोणीही करविता द र्शन ॥ तंव हरी ह्मणे तूं यजमान ॥ मीं क्षेत्रोपाध्याय तुझा असें ॥ ३७ ॥ समयीं द्रव्य यजमानापाशीं ॥ नाहीं ह्मणोन काय सोडणें त्यासी ॥ ऐसें वदोन दर्शन तिज शीं ॥ करवुन आणिली मागुती ॥ ३८ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ रात्रभरि ऐकुनी कीर्त नातें ॥ मनोभावें वंदिलें वैष्णवातें ॥ प्रात होतां द्वादशी सानुरागें ॥ स्नान केलें भीवरें जळीं वेगें ॥ ३९ ॥ ह्मणे आजी द्वादशी पर्वकाळ ॥ शिधा देऊं ब्राह्मणा पी ठडाळ ॥ बांधुनीयां पदरीं तेउठाउठी ॥ येउनीयां बैसली वाळुवंटीं ॥ ४० ॥ ब्राह्म णासीं बोलतां नम्रवाचे ॥ पीठ ध्यावें दान हें पानग्याचें ॥ विप्र ह्मणती सांडुनी उन्त मान्ना ॥ पुसे कोण या तुझ्या रूक्ष अन्ना ॥ ४१ ॥ ॥ छंद ॥ ॥ ह्मणति नेटकी सु ळिंचबांडकी ॥ अपशकून हा फार दोडकी ॥ वदुनियां असें झटकती पुढें ॥ खिन्न ते तदां वृद्ध बापुडें ॥ ४४ ॥ ॥ साकी ॥ ॥ दोन याम तेटळ तां बोलत, काय क रूं देवाजी ॥ शिधा दीधल्याविन ब्राह्मणा, न घे अन्न मी आजी ॥ ४३ ॥ ऐसा नि श्चय जाणुनि विठ्ठल, ब्राह्मणवेषा धरुनी ॥ गोमाईच्या सान्निध येउन, बोले क रुणावाणी ॥ ४४ ॥ दोंदिवसांचा उपवासी मीं, दुबळा वृद्ध ही पाहीं ॥ द्वादशि आजी पर्वणि मोठी, धर्म करावा कांहीं ॥ ४५ ॥ ॥ ओवी ॥ ॥ एक पानग्या चें तरी पीठ, देतां तु घेल वैकुंठपीठ ॥ पानगे भाजून त्यास वेमीठ ॥ वाटिलिया सायुज्य पावशी ॥ ४६ ॥ मजला कोठेंची थारा नसे ॥ देउळीं बिऱ्हाड घेतलें असे ॥ तरी भोजन घालीं करोनि कसें ॥ ऐकतां आल्हाद तियेसीं ॥ ४७ ॥ स्वागेंची शुभावें चुनी हरी ॥ थाळ घालून देत सत्वरी ॥ येरी भाजून पानगे त्यावरी ॥ पा त्रावरी वाटितसे ॥ ४८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ लगबग अति भक्ती देव्रतो पानग्या तें ॥ बहुरुचि मिटक्या दे चोळुनी पोट हातें ॥ तंव जरित चिरूपें येरमा त्या स्थ ळातें ॥ वदत त्यजुनि देवा जेविता कें विमातें ॥ ४९ ॥ गोमाईस ह्मणे धरामर तदा आतां सुवासीनि ला ॥ घांली भोजन सांगतें सहजची मे हूंणा झालें तुला ॥

होते दोनचि पानगे बरखवतां त्यालागिं ते पातली ॥ गोमाई समवेत विठ्ठलसिजी रुक्मीण हे जेवली ॥ ५० ॥ ॥ कडवीं ॥ ॥ झाला श्रीहरी तिजवर तुष्ट ॥ भक्तु- नियां पिष्ट ॥ निष्पाप हो निति तिची उत्कृष्ट ॥ केलि कृपादृष्ट ॥ ॥ चाल ॥ ॥ वैकुं- ठाहुन विमान येउन ॥ ह्मणतीशी धृति लाचलावें ॥ यात्रे पंढरिच्या० ॥ ५१ ॥ ने ली बसवून तीस विमानीं ॥ विष्णुगणांनीं ॥ ठेवी निज हरिसन्नीधानीं ॥ अस्त- यस्थानीं ॥ ॥ चाल ॥ ॥ कृष्णदास ह्मणे भाविकयां तें ॥ भावें भक्तचरित्र गावें ॥ यात्रे पंढरिच्या० ॥ ५२ ॥ ॥ इति गोमाई चरित्र समाप्त ॥ ॥ ॥ ॥



## अथ मुरली चरित्र प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ आर्या ॥ ॥ वंदुनि विघ्नहरातें, नमिली भावें चि क्र ष्णगुरु मूर्ती ॥ मुरलीचरित्र कथनीं, द्यावी मज लादयानिधे स्फूर्ती ॥ १ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ करी ब्रह्म वीणा सुखीं कृष्ण लीला ॥ त्रिलोकीं गती चंचल पुण्यशी ला ॥ असा तो विधी पुत्र मुक्तीपुरीं ते ॥ हरीमंदिरा पातला हर्षचित्तें ॥ २ ॥ नमोनी तपा आदरें कृष्णराणी ॥ वदे भीमकी आर्धुनी नम्र वाणी ॥ वसे माझि या एक संदेह चित्तीं ॥ समर्थें परीहार णें सत्य उक्ती ॥ ३ ॥ ॥ आर्या ॥ ॥ हरिअ धरांमृतिं जडली, मधुसेवनीं मक्षिका नसी मुरली ॥ मुरली मनि सुख सेवुन,

ऐसीते कायपुण्य आचरली ॥ ४ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ रुक्मिणीचाऐकोनिप्रश्न-
जाणा ॥ कथासांगेसुरसींक मुनीजाणा ॥ शिवग्रामीनांदतविप्र एक ॥ धुंडि
शर्मातयासनामदेख ॥ ५ ॥ मुखोद्गतज्यापरीवेदचारी ॥ साहिशा निष्णा
त सदाचारी ॥ तयागेहासन्नीधअनामीक ॥ असेधूर्तनामत्या मेष ना-
क ॥ ६ ॥ ॥ साकी ॥ ॥ प्रातःकाळीं उठोनि द्विजतो, पदवी वेदसुताला
॥ अनामिकानेंऐकुनद्वारीं ॥ तोही प्रवीण झाला ॥ ७ ॥ मगत्यादुष्टेंमनीं क
ल्पिलेंनसही आपुली याती ॥ त्यजुनी ब्राह्मणधर्माचरितां, होइलसुखधन
प्राप्ती ॥ ८ ॥ द्विजवेषामग अवलंबोनी, हिंडतदेशोदेशीं ॥ ब्रह्मपुरींमगयेउ
न राहे, लोभेंधनउद्देशीं ॥ ९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ दावुनउत्तमविद्या, भुलवीले-
विप्रदांभिकाचरणीं ॥ पूजितिदेउनित्यातें, ॥ धनजनभावेंचिलागुनीचरणीं ॥ १०
॥ ॥ श्लोक ॥ ॥ विद्यावंतबहूसुकर्मठभला ऐसागुणीजाउनी ॥ ग्रामींचाद्वि
जएकत्यामतिगृहींने आदरें भार्युनी ॥ सांगेआवडल्यामुलांसी शिकवाशास्त्रे
श्रुती सत्कळा ॥ जाणाहें तुमचें हिहोगृह असे विद्यार्थिमी आपुला ॥ ११ ॥
॥ आर्या ॥ ॥ स्वल्पचि काळें वेदी, बाळांतेनिपुणहोयजो करिता ॥ मागेनिरो
पजाया, द्यावीमज दक्षिणा ह्मणेत्वरिता ॥ १२ ॥ ॥ छंद ॥ ॥ ऐकतांगृहस्वा
मियारिती ॥ कांहोजातसां ह्मणत त्याप्रती ॥ अंत्यजह्मणे माउलीपिता ॥ वाट
पाहतीजाणतत्वतां ॥ १३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ होणेंअसे लग्नअझून माझें ॥ वाटे
ह्मणुनी शिरिंफार ओझें ॥ ऐकोनियां खिन्नगृहस्थझाला ॥ बोलतदानोमग-
कायत्याला ॥ १४ ॥ माझीउत्तम कन्यकाबहुगुणी नामेंअसेलक्ष्मी ॥ जेकां
सुंदररूपकोमलतनू भासेदुजीलक्ष्मी ॥ तेतुंह्मांनिजआदरेंचिदिधलीजाऊंनका
सर्वथा ॥ पाहोनीसुमुहूर्तअर्पिदुहिता त्याअंत्यजातेंपिता ॥ १५ ॥ ॥ साकी ॥
मगतोदुर्जनपांचवरूषें, श्वशुरासदनीं राहे ॥ पुनरपिआज्ञामागतजाया, निज
देशालवलाहे ॥ १६ ॥ मायपितादिकवाटपाहाती, भेटुनयेतोंत्यांसी ॥ श्वशूरते
व्हां बोलतत्यातें, संगेंन्यावेंस्त्रीसी ॥ १७ ॥ ऐकुनआज्ञानिघताझाला, घेउनसं
गेंकांता ॥ पंथिंचालतांमनांतत्यासीं, लागुनगेलीचिंता ॥ १८ ॥ ॥ ओवी ॥ ॥
मातापिताअभंगळ निश्चिंती ॥ झोंपडीभोंवत्या पदरूंच्या अस्थी ॥ देखतांविप्रात्मजे

जेंसिचित्ती॥ कळेलयातीपैंमाझी॥१९॥ हेबाहेर फुटतांगोष्ट॥ जनींअन्यायहो ईलप्रकट॥ मजसीशिक्षाकरतीलस्पष्ट॥ यातें विचाराकैसाकरूं॥२०॥ ॥ श्लोक॥ ॥विश्वासदाउनतरीसतिच्यामनाला॥ पाषाणघालुनशिरीं हरुजी वनाला॥ तोंलागलीतिजतृषाअनिवारजाणा॥ कूपातटींत्वरितजाचचितोयपा ना॥ २१॥ सेवीजोंउदकासिअंजुळिभरीतोंत्याकृतघ्नेंझणी॥ लोटोनीतिजतोज ळींपळतसेतेथोनित्याचक्षणीं॥ तेव्हांशोकजळांतफारअबळा दीर्घस्वरेंचीकरी ॥दैवें वृक्षमुळींकरींगवसलीजाणासदासत्वरी॥ २२॥ ॥ छंद॥ आठवू- नियांपतिपदांप्रती॥ रोदनाकरीफारतेसती॥ कायसीचुकीमजपासुनी॥ नेणुं जाहलीस्वामिसेवनीं॥ २३॥ ॥ पद॥ ॥ करिविलापद्विजदुहिता॥रडतांदी र्घस्वरें॥ करि०॥ध्रु०॥दुःखेंकरीतहायहाय॥रोदतमोकलोनीधाय॥ सेवेंअंत रपडलें काय॥ हेपतिरायमजसांगा॥ करि०॥१॥ मुकलेंमाहेरानिभ्रांत॥कैसावो ढवलाप्राणांत॥ नयेधांवुनकांहोकांत॥ करि आक्रांत म्हणवोनी॥ करि०॥२॥ अगाकृपाळाकमळापती॥ संकटींअनाथतुजजपती॥ टाकुनगेलेमजलापती ॥करुणानुजप्रतीयेऊंदे॥ करिवि०॥ ३॥ ॥२४॥ ॥आर्या॥ ॥परिसुनिकरु णाशब्दा, आलीबहुकींवतेहरीसतिची॥ द्विजवेषें प्रकटुनियां, अविलंबें आधि तेहरींसतिच्या॥२५॥ ॥साकी॥ ॥माहेरींच्यादाउनीपंथा, श्रीहरिझालेगु प्त॥ लक्ष्मुमितेथुनजनकासदनीं, येतीझालीत्वरित॥२६॥ प्रकटनकरितांपति अन्याया, सांगतचतुराईनें॥ पतिनेंमजलाकथिजेलीतीं, ऐकेंताताचनें॥२७॥ दुर्गमपंथाक्रमितांपायीं, पावसिबहुदुःखाला॥ यास्तवमागेंफिरोनजावें, प्र स्तुतजनकगृहाला॥२८॥ स्वल्पचिकाळेंसुरवयानींतुज, बसवुननेइनदेशीं॥ युक्तभाषणेंसंपादणिते, करितीझालीऐशी॥२९॥ ॥ दिंडी॥ ॥इकडेतेव्हां अंत्यजनिजदेशा॥पावलातोंजाहलीघोरदशा॥ अनावृष्टीहोउनीतयादेशीं॥ म रतिलोकतडतडांउपवासी॥ ३०॥ द्रव्यगांठींअसोनिधान्यकोठें॥ मिळेनाचीदु- र्भिक्षपडलें मोठें॥मायबापसोयरेआप्तमित्र॥सर्वकूळतयाचेंझालेंनष्ट॥३१॥ ॥ श्लोक॥ ॥त्यातेंहीनमिळेचअन्नकिमपीझालाबहू हिंपुटी॥ तेव्हांएकमनां तयुक्तिबरवीयोजीतयासंकटीं॥ कांतेचापथिंजीवजाण हरिलागावें कोणा

नसे ॥ दुष्काळें तरि मृत्यु पावली कथूं ताता तियेच्या असें ॥ ३२ ॥ **ओवी** ॥ यापरि करून संपादणी ॥ राहावें सुख रूप तयेस्थानीं ॥ पुनरपि द्रव्य संपादुनी ॥ विवाह दुजा करावा ॥ ३३ ॥ ॥ **आर्या** ॥ ॥ ऐसा विचार योजून, मग तो अंत्यज तयास्थळीं आला ॥ अवलोकितां प्रियेतें, दचकुनियां अंतरीं बहु भ्याला ॥ ३४ ॥ ॥ **छंद** ॥ ॥ नम्र होउनी लक्ष्मी तदा ॥ लागे येउनी पतिचिया पदा ॥ पंथिंची खूण प्रगट ना करी ॥ सत्यशील ते सत्य सुंदरी ॥ ३५ ॥ ॥ **श्लोक** ॥ ॥ श्वशूरास तेव्हां नमस्कार केला ॥ मनांतील जो धाक तो सर्व गेला ॥ तयानंतरें द्वाद शाब्दें तिनें तें ॥ वसोनी सुखें भोगिलें आत्मजें तें ॥ ३६ ॥ ॥ **साकी** ॥ ॥ उदरीं तियेच्या पुत्र जन्मला, सुंदर लावण्य गुणी ॥ वीर्या ऐसा विपरीत क्रीडे, ओ करव त्याची करणी ॥ ३७ ॥ ग्रामाबाहेर जाउन पशुच्या, गोळा करुनी अस्थी ॥ खे ळ खेळतां पाहुनि लक्ष्मी, झाली शंकित चित्तीं ॥ ३८ ॥ पतिशीं बोले अवगुणी बाळ कहे कां हो ऐसें ॥ याचें लक्षण शास्त्रीं पाहुन, सांगा मजला कैसें ॥ ३९ ॥ ॥ **दिंडी** ॥ ॥ कामिनीची ऐकोनि प्रश्नवाणी ॥ मनामाजी तो म्हणे पापखाणी ॥ पूर्वि म्या जो अन्याय केला पाहीं ॥ इणें कोणा तो कळों दिला नाहीं ॥ ४० ॥ तरी ऐशा साध्वीतें निजयाती ॥ सत्यपणें सांगतां नसे भीति ॥ मनी ऐशा आणोनी विचारातें ॥ गुज गोष्ट ऐकांति कथी तीतें ॥ ४१ ॥ ॥ **श्लोक** ॥ ॥ अनामीक कर्मा झिंगेयात साची ॥ म्हणोनी पहा पुत्र खेळे तसाची ॥ असें ऐकतां शंकली विप्रबाळी ॥ म्हणे हे हरी काय माझ्या कपाळीं ॥ ४२ ॥ ॥ **पद** ॥ ॥ दुस्तर ही दैवगती ॥ आहा रे दुस्तर ही दैवगती ॥ ध्रु० ॥ उत्तम वंशीं जन्मा येउनी ॥ अंत्यज आला पती आहा रे० ॥ १ ॥ काय करूं मी कांहीं सुचेना ॥ कुंठित ही झाली मती ॥ आहा रे० ॥ २ ॥ व्यर्थचि झाला जन्म म्हणोनी ॥ दुःखित फार सती ॥ आहा रे० ॥ ३ ॥ ४३ ॥ ॥ **ओवी** ॥ ॥ क्रोधें धुधुःकारित सर्पिणी ॥ तैसी क्षोभली द्विजनंदिनी ॥ पित्याजवळी शीघ्र येउनी ॥ पुसती झाली शास्त्रार्थ ॥ ४४ ॥ म्हणे धातु पात्र विटाळल्या निश्चिती ॥ ते शुद्ध होय कवणे रीती ॥ जनक वदे तिये प्रती ॥ अग्नी देतां शुद्धि ये ॥ ४५ ॥ ॥ **छंद** ॥ ॥ ऐकतां असें कोपली सती ॥ ज्ञापि जाळले आपुला पती ॥ सहित पुत्र तू होउनी खळा ॥ पृथ्वीवाहसी भार आगळा ॥ ४६ ॥ ॥ **आर्या** ॥

माझ्या सन्मुख भागीं, छेदीतिल लोक तत्वदीया शिरा ॥ तेव्हां तव रक्ताचा, लेविनटिकला नलावितां ऊशिरा ॥ ४७ ॥ ॥ साकी ॥ ॥ एशा देउन शाप सती तें ॥ धरोनि धैर्या चित्तीं ॥ घेऊन बालक सदनीं निजली, भावी हरिपदि चित्तीं ॥ ४८ ॥ गृहासवेगें लाउन वन्ही माकित करुणा वाणी ॥ तुजविण वाता जगदुद्धारा, नाहीं मजला कोणी ॥ ४९ ॥ ॥ पद ॥ ॥ करुणा भाकित द्विजबाळी ॥ धांवें झड करी वनमाळी ॥ नष्टें भ्रष्ट करोनि मजला ॥ भ्रष्टविलें द्विजयातीया ॥ जडलें लाञ्छन वंशाला ॥ सुकल्यें सर्वही स्वार्थाला ॥ विधिनें लिहिलें हें भाळी ॥ धांवें झड करी वनमाळी ॥ १ ॥ पतिनें मजला उदकांत ॥ लोटिलें येऊनी यां घात ॥ कपट दुष्टाचे चित्तांत ॥ नकळे मजला ही मात ॥ साहिलें दुःख तये वेळीं ॥ धांवें झं० ॥ २ ॥ आतां निजपदीं मज थारा ॥ देऊन तारीं दातारा ॥ ऐकुन सतिच्या हाहाकारा ॥ आलीकींव जगदुद्धारा ॥ पावला दिनबंधू तत्काळीं ॥ धांवें झड करीं वनमाळीं ॥ ३ ॥ ॥ ५० ॥ ॥ साकी ॥ ॥ माग म्हणे वर प्रसन्न झालों, बोले लक्ष्मि तेव्हां ॥ तुमच्या वदनीं माझें सुख हें ॥ प्रीति असावें देवा ॥ ५१ ॥ पुत्रासी या हस्त किं धरणें, तथास्तु बोले हरी ॥ या परि वांछित देउनि तीतें, गेलों दिनकेवारी ॥ ५२ ॥ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ मुक्त केलीं दोघांसि जगन्नाथें ॥ कलेवरें दग्धलीं परी तेथें ॥ तयावरी लोटतां काळ कांहीं ॥ घोरारण्य वाढलें नया ठायीं ॥ ५३ ॥ सतिदेहापासून वंशजाणा ॥ उद्भवला अद्भुत तया स्थाना ॥ सन्निधानीं त्याचिया पुत्र तोही ॥ उगवला होउनी वेत्र पाहीं ॥ ५४ ॥ ॥ ओवी ॥ ॥ त्यावरी लोटतां कित्येक दिवस ॥ गोकुळीं अवतरला श्रीनिवास ॥ उद्धराव या निजजनास ॥ गोधनें चारीत कांतारीं ॥ ५५ ॥ वंश वेत्र उद्भवले ज्या स्थळीं ॥ तेथें क्रीडत पैऊनि वनमाळी ॥ वेत्र स्वीकारिला करकमळीं ॥ आणिक मुरली केली वंशाची ॥ ५६ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ निजवदनें वेणु ते सुखा प्रती ॥ लाउनीया वाजवी रमापती ॥ धरोनीयां वेत्र तो करीं पाहीं ॥ तेणें वळिल्या काननीं सर्व गाई ॥ ५७ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ सांगे नारद भीमकीस बरवी अत्यादरें ही कथा ॥ झालीया रिति कृष्णजीस मुरली ते सुप्रिया तत्वतां ॥ व्यासें स्कंदपुराणिं जाण कथिलें ऐशा चरित्रा प्रती ॥ मातें आवडि कृष्णदास विनवी श्रोत्यांसि प्रीती अती ॥ ॥ इति दा० क० वि० मु० च० संपूर्ण ॥ ६७ ॥




# अथ ध्रुवाख्यान प्रारंभः

## चाल दिंडी.

सूर्यवंशीउत्तानपादराया ॥ रूपवंतीतयासिंदोनजाया ॥
कनिष्ठेसीं अत्यंतप्रीतिमाया ॥ पट्टराणीनावडेतयाराया ॥ १ ॥
वरिष्ठेसीं जाहलाएकपुत्र ॥ ठाणमाणरेखिलेंजेंविचित्र ॥
सुकूमारआकर्णपद्मनेत्र ॥ ठाणमाणरे खिलेंजेंविचित्र ॥ २ ॥
पांचवर्षेंलोटलीं ध्रुवा आंगीं ॥ पिताठाऊकनाहिंतयालागीं ॥
ह्मणेमातेसीं भक्तराजयोगी ॥ तातकोठेंतो सांगमजवेगीं ॥ ३ ॥
ह्मणेमायतान्हयातोचितूझा ॥ धराधीशबोलतीज्यासिराजा ॥
येरुबोलेपाहिनपिता माझा ॥ नकोआऊंमारील राज भाजा ॥ ४ ॥
पूर्वपुण्येंसूदीनउगवला ॥ मुलांसंगेंतोराजगृहा गेला ॥
राजदृष्टीसन्मूखउभाठेला ॥ पितापाहे तों मोह झळंबला ॥ ५ ॥
अनीवारमोहासि पूर आला ॥ उचलोनी मांडियेबैसवीला ॥
बाळशब्दें खेळवीतनूजाला ॥ नसाहेची राणियेकोप आला ॥ ६ ॥
उचंबळे क्रोधाग्नि शिखाटाकी ॥ ह्मणेकोण बैंसलाराजअंकीं ॥
रावकेंसारखेळवी कवतूकीं ॥ ध्रुवराजहोईलनिश्चयेंकीं ॥ ७ ॥ ॥
धरूनीयांसापल भावचित्तीं ॥ पदीलोटोनी पाडियेलाक्षिती ॥

रडतगेला माउली जेथें होती ॥ नखंडतितेनेत्र अश्रुपातीं ॥ ८ ॥
ह्मणेमाय तान्हया काय झालें ॥ कोणेपापीयें तुज गांजियेलें ॥
मजरायेंमांडियें बैसवीलें ॥ राजभाजेनेपदीं लोटियेलें ॥ ९ ॥ ॥
बुझावीतां मांउली कायबोले ॥ नाहिंपूर्वीं देवासिं आराधीलें ॥
स्वामिजैसें मांडियें बैसवीलें ॥ रमारंगें स्थापितां काय चाले ॥ १० ॥
ध्रुवबोले तो देव कसा आहे ॥ वसेकोठें तोसांग लवलाहें ॥
तयामागें अविनाशएकठाव ॥ पदमागोंनूठवी दुजीमायं ॥ ११ ॥
अरेबाळा वल्कलेंजटाधारी ॥ भस्मअंगींलाविती दिगंबरी ॥
सर्वभोगींउदासब्रह्मचारी ॥ निरंजनी धुंडिती निराहारी ॥ १२ ॥
अधोमूखपंचाग्निधूम्रपानी ॥ उर्ध्वबाहुआकाशमहामौनी ॥
शीतउष्णापर्जन्यतापतीन्ही ॥ जयालागी सोशिती महामूनी ॥ १३ ॥
तुह्मीबुद्धीकायबावयसान ॥ तुजकाय होईलदरशन ॥
ध्रुवबोले त्यजीन मीप्राण ॥ नभेटे तो देणार दरशन ॥ १४ ॥ ॥
उभाहोतातैसाचिजायवेगें ॥ रडतपाठीलागली मायमागें ॥
पुत्रगेलारायासि दूतसांगे ॥ रावझालाघाबरा मोह संगें ॥ १५ ॥
सर्वसौख्यानें मूळ बाळ माझें ॥ ध्रुवगेलाघेणार राज्य ओझें ॥
त्यजिलप्राणवनांतलोकलाजे ॥ नेणोकाय मारिलें दुष्टभाजें ॥ १६ ॥
लवलाहें धांवला ध्रुवापाठी ॥ ह्मणेबाळा आईक एक गोष्टी ॥
बुझावी तोधरून हनूवटी ॥ तुजवीण दाटलाप्राण कंठीं ॥ १७ ॥
ध्रुवबाळचालिला हृषीकेशीं ॥ बाळाकुळभूषणआह्मांहोसी ॥
नाहीं दूजें आमुच्या वंशासी ॥ तुजवीणहोउंगापरदेशीं ॥ १८ ॥
नकोजाउं देईन एक गांव ॥ ध्रुवबोले देईल देवराव ॥
पांचगांवदीधलेफीरमागें ॥ ध्रुवबोले देईल रमारंग ॥ १९ ॥
नकोजाउं देईन एक देश ॥ ध्रुवबोले देईल जगदीश ॥
फिरमागे देईन एक प्रांत ॥ ध्रुवबोले देईल रमाकांत ॥ २० ॥
अर्धराज्यदीधलेंफीरआतां ॥ ध्रुवबोले मागेनजगन्नाथा ॥

संवेराज्यदीधलेंआणनूझी ॥ ध्रुवबोलेदेवासलाजमाझी ॥ २१ ॥
सहजबोलाचा रागधरीयेला ॥ सहजहास्याचा निकुरकसाकेला ॥
ध्रुवयोगाचीवाटतमजसंती ॥ नमस्कारेंअपराधक्षमाहोती ॥ २२ ॥
प्रेममर्यादेचिवासिमानणें ॥ बाळशब्दअपशब्दकायजाणे ॥
ह्मणेउन्द्धवचिह्ननदयावंत ॥ शांतदांतआनंतकृपावंत ॥ २३ ॥
ध्रुवाकेसासांडिलामोहआजी ॥ तोंडकाळेंजाहलेंजगामाजी ॥
ध्रुवबोलेतयासितातदेवा ॥ आतांयेतोंमीलोभअसोंद्यावा ॥ २४ ॥ ॥
हरीभक्तीचाडोलकसापाही ॥ अनूतापें कोंदल्यादिशादाही ॥
ह्मणेधांवेंपावेंगामायबापा ॥ कृपावंताअनंताश्यामरूपा ॥ २५ ॥
निरंजनींयेउनीउभाराहे ॥ नामघोषमूखानेंगर्जताहे ॥
दुरूनीयांभरह्प्तासूतपाहे ॥ तयालागीकैवल्यदिसताहे ॥ २६ ॥
जवळयेउनीपुसेबाळकासी ॥ वयसानतूंकोणवनवासी ॥
पूर्ववृत्तसांगतांनारदासी ॥ कृपातोषेंतोषला देवऋषी ॥ ३७ ॥
गुरुमंत्रावांचूनिदेवकेंचा ॥ असेबोलेसर्वहीवेदवाचा ॥
अभयहस्तठेउनी शिरींसाचा ॥ मंत्रसांगेद्वादशअक्षरांच ॥ २८ ॥
ध्रुवाकानीं सांगुनीमुनीगेला ॥ जपतांचिहृदयींप्रकाशला ॥
लोकलीलावैकुंठपाळआला ॥ तयासन्मुखदेवउभाठेला ॥ २९ ॥
सर्वतेजाची एकमूसझाली ॥ दिव्यकांतीचीदीप्तिप्रकाशली ॥
चतुर्भुजसायुज्यधननीळी ॥ दिव्यमूर्ति त्याध्रुवेंदेखियेली ॥ ३० ॥
नमस्कारेंपूजिलाहृषीकेशी ॥ ह्मणेदेवतूंमागइच्छितोसी ॥
मनोवेगाधावासतुझपायीं ॥ गर्भवासें कष्टलोंवदोंकायी ॥ ३१ ॥
धराधीशकीं स्वर्गभोगवासी ॥ करूंइन्द्रकींसागआपणासी ॥
तुझेभक्तीचाडोलकसादेई ॥ तदीजे नूठवी दुजीआई ॥ ३२ ॥

श्लोक

वैकुंठाहूननिगरुडहरीनेंतत्काळपालाणिला ॥
जेथेंउग्रंतपेंधरूनिमहिलात्यापर्वतींपातला ॥

इंद्रादुर्लभ उंचथोरपदजें तेथें ध्रुवास्थापिला ॥
मेरूचे शिरवरी अनंतकविनें लसोनियां वंदिला ॥ १ ॥

दिंड्या

दिव्य विमानीं वाहोनि ध्रुव नेला ॥ अटळपदीनेउनी बैसवीला ॥
ध्रुवाख्यान ऐकतीगाति वाचे ॥ ध्रुवलोकीं अक्षयवास त्याचे ॥ ३४ ॥
ब्रह्मानंद आनंद थोर झाला ॥ अटळपदीं तो ध्रुव बैसवीला ॥
बाळभक्तीची बहू धन्य झाली ॥ शिरीं सुरवरें कमळवृष्टि केली ॥ ३५ ॥
चंद्रसूर्यादिक ग्रहगणतारा ॥ मुनीसर्व घालिती त्यासि फेरा ॥
औदार्यदीक्षी राधिसदनाचे ॥ उद्धवचि हुन गुण गायत्याचे ॥ ३६ ॥



## अथ वर्षप्रतिपदा कथा.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीदत्तात्रेयायनमः ॥ ग्रंथारंभीं शिवसुत ॥ माझी मती स्तवन करीत ॥ परमसंकटीं गांजिले भक्त ॥ विघ्ने छेदितयांचीं ॥ १ ॥ तोगजाननाचा शुंडादंड ॥ निर्विघ्नकारक प्रचंड ॥ सदासत्कर्मी अखंड ॥ विद्वज्जन स्मरती आदी ॥ २ ॥ ऐसाजोकांचराचर ॥ त्यासि माझा नमस्कार ॥ जोकां निर्गुण निराकार ॥ जोपरात्पर सर्वाद्य ॥ ३ ॥

आतां ब्रह्मकुमरी सरस्वती ॥ जिच्या चरणीं जडली मती ॥ मुकेतेही वाचाळ होती ॥ ऐसी कीर्ति त्रिभुवनीं ॥ ४ ॥ जळीं टाकितां तैल बिंदू ॥ पसरोनि होय जैसा सिंधू ॥ तैसा मतिमंद तो सुबुद्धू ॥ जिच्या प्रसादें होतसे ॥ ५ ॥ तियेलागीं साष्टांग नमन ॥ सद्गुरुचरणीं परम लीन ॥ सज्जन श्रोते भाविक जन ॥ तयां तें नमिलें मनोभावें ॥ ६ ॥ ॐ नमोजी दत्तदेवा ॥ देईं मजला चरणसेवा ॥ माझा मनोरथ पुरवावा ॥ माथां ठेवावा वरद हस्त ॥ ७ ॥ जो कां व्रतराज ग्रंथकर्ता ॥ महा पुण्यशील धर्मरक्षिता ॥ येवोनि जनाची ममता ॥ दाविलें पंथा सोज्वळ ॥ ८ ॥ तया माझें असो नमन ॥ सकळ कवी विद्वज्जन ॥ आदि शक्तीचें करूनि ध्यान ॥ कथा पावन रसाळ जी ॥ ९ ॥ तीं प्राकृत भाषें करून ॥ करितों व्रतराजाचें कथन ॥ पाहतां पावती समाधान ॥ विद्वज्जन अभ्यंतरीं ॥ १० ॥ वर्तती पाहोनि जया परी ॥ धरोनि निष्ठा प्रेम अंतरीं ॥ त्यांचीं दुरितें पळती दुरी ॥ ऐशा परी कथितों हें ॥ ११ ॥ हे व्रतराजसार प्राकृत ॥ पयापासोनि काढिलें घृत ॥ जया पुढें तुच्छ अमृत ॥ जे यथार्थ अभीष्ट वदतसे ॥ १२ ॥ जे कां पाहती प्रीति करून ॥ चाली चालतां ऐकुनी विधान ॥ तयां दूर नाहीं नारायण ॥ सत्य जाण भाष माझी ॥ १३ ॥ असो आतां पूर्वसंधान ॥ पुढें द्यावें अवधान ॥ भगवान सांगे जी रचूण ॥ तें निरूपण ऐकावें ॥ १४ ॥ मासामाजी उत्तम मास ॥ चैत्र शुक्ल प्रथम दिवस ॥ सूर्योदयव्यापिनी प्रतिपदेस ॥ करीं सायास ऐशा परी ॥ १५ ॥ जो कां जगन्निवास नारायण ॥ प्रकट तयाच्या नाभीपासून ॥ ज्यास ह्मणती चतुरानन ॥ विस्मित मन तयाचें ॥ १६ ॥ पुनरपि गेला स्वस्थानां ॥ लागला प्रभूच्या चिंतना ॥ आटविला कां प्रेमपान्हा ॥ अशा स्तवना आरंभिलें ॥ १७ ॥ ह्मणे मजला काय कारण ॥ उत्पन्न केलें जी आपण ॥ मीं आहें कोठील कोण ॥ हें सप्रमाण सांगावें ॥ १८ ॥ ऐकतां क्षीर सागरनिवासी ॥ स्वरूपज्ञान दाविलें तयासीं ॥ ह्मणे आतां जाऊन अहर्निशी ॥ करीं उत्पत्तीसीं ब्रह्मदेवा ॥ १९ ॥ यापरी आज्ञा होतां त्वरीत ॥ मंगरजोगुणी विभूती रचित ॥ प्रातःकाळींच केली मात ॥ अकस्मात ऐशापरी ॥ २० ॥ हा शुद्ध पाडव्याचा दिन ॥ उत्पत्तीस आदिकारण ॥ प्रजापतीनें संपूर्ण ॥ जगनिर्माण केलें पैं ॥ २१ ॥ वर्तलें आणिक तया दिनीं ॥ षवीस

राज्यपदीं बैसवुनी ॥ त्रिलोकींचा भूप करोनी ॥ पावला समाधानी तेचद्विंव त्रीं ॥ २२ ॥ आणि तया सुदिनाचे ठाईं ॥ कैसें वर्तलें कथितों पाहीं ॥ रवीचें जनन सोम तोही ॥ बृहस्पति तोही निर्मिला ॥ २३ ॥ शनी महा दुःखरूपी जाण ॥ एक एक राशीतें दारुण ॥ छळातें देतो कृपाघन ॥ तोही आपण उद्भविला ॥ २४ ॥ राहूकेतू आणि मंगळ ॥ बुधाचें स्वरूप कोमळ ॥ ऐसे नवग्रह सकळ ॥ केले प्रबलोसन्न ब्रह्मदेवें ॥ २५ ॥ रात्रीअंतरें ग्रहपीडा होतां ॥ जप करवावा सर्वथा ॥ ब्राह्मण द्वारें ग्रह यज्ञ करितां ॥ दानदेतां पीडा हरण होय ॥ २६ ॥ साठ संवत्सर तेच क्षणीं ॥ निर्माण केले नामें ठेवुनी ॥ अन्यग्रंथीं सांगीतल्या वरूनी ॥ आणाव्यानीं सकळिक ॥ २७ ॥ तयासंवत्सराचे दिन ॥ त्रिशतविंशतित्रयजाण ॥ अहोरात्र घटिका प्रमाण ॥ साठ परिपूर्ण असती जया ॥ २८ ॥ आतां सांगतों ऋतूंचीं नावें ॥ वसंत ग्रीष्म चित्त द्यावें ॥ वर्षा तो शरद हेमंत भावें ॥ शशीरो पाहें सहावा ॥ २९ ॥ एक संवत्सरा द्वादश मास ॥ तया मासाचे त्रिंशति दिवस ॥ तया मासाचे पक्ष परीस ॥ दोन जयास ह्मणती हे ॥ ३० ॥ आणि संवत्सराचे स्वामी स्वभावें ॥ उत्पन्न केले ब्रह्मदेवें ॥ सभास्थान जीवें भावें ॥ रचिलें देवें अपूर्वतें ॥ ३१ ॥ तया सभेचें वर्णन करितां ॥ शेषही थकला सर्वथा ॥ जयापुढें इंद्र भुवनाची वार्ता ॥ वर्णितां सर्वथा तुच्छ होय ॥ ३२ ॥ तयासभेमाझारीं जाण ॥ देव सकळ येती परिपूर्ण ॥ बैसोनि पाहती सभास्थान ॥ आनंदें मन तयेवेळीं ॥ ३३ ॥ ब्रह्मदेव आसनीं करिती ध्यान ॥ स्वरूपीं पावती समाधान ॥ तों सकळ देव विनीत होउन ॥ करिती स्तवन तयाचें ॥ ३४ ॥ हे कमलोद्भवा चतुरानना ॥ सुहास्यवदना पद्मलोचना ॥ सकळ जगाचे उत्पत्तिस्थाना ॥ करिती नमन तयासी ॥ ३५ ॥ तूं एक आह्मांस सकळांस आधार ॥ निर्मिलें ऐकाचराचर ॥ स्थावर जंगम अपार ॥ तया सोज्वळ आधार तुझा ॥ ३६ ॥ तुजवीण आह्मां नसे ठावा ॥ तुं जातारक दुर्धर भवा ॥ तूंचि आमुचा प्राण विसांवा ॥ तारक जीवां सकळिकां ॥ ३७ ॥ ऐसें करितां बहुत स्तवन ॥ नेत्र उघडोन पाहे श्यामनंदन ॥ प्रसन्न झाला आनंदघन ॥ बोले वचन अभीष्टतें ॥ ३८ ॥ सर्वांसीं धर्मोपदेश केला ॥ मार्गसोज्वळ दाविला ॥ हीतों ईश्वराचीच लीला ॥ धर्मानदळे कोणी ही ॥ ३९ ॥ सकळ देवांसीं स्थानें नेमित ॥ राहोनि येथें रक्षा समस्त ॥ दुष्टां दंड करावा.

निश्चितं ॥ भक्तांस रक्षित असावें ॥ ४० ॥ तयापासुनी धर्मस्थिती ॥ जगसंबंधि लोक चालती ॥ धर्मावरी ठेवोनि अतिप्रीती ॥ नांदती क्षीतीं समग्र ॥ ४१ ॥ आतां वर्षप्रतिपदेच्या दिवसीं ॥ आज्ञा होकांच तुर्वर्णासी ॥ प्रातःकाळीं उठोनि त्वरेंसी ॥ मांगलिकस्नान करावें ॥ ४२ ॥ स्नान झालियावरी जाण ॥ करूनियां एकाग्रमन ॥ चित्तीं करावें अखंड चिंतन ॥ आठवी नारायण सद्भावें ॥ ४३ ॥ द्वारांमाजी आनंद देणारीं ॥ चिन्हें करावीं ऐशापरी ॥ ध्वज उभारू निश्चळ करी ॥ वाद्यें परोपरी ऐकावीं ॥ ४४ ॥ जीं कां मंगलदायक असती ॥ तीं आणावीं धरोनि प्रीती ॥ जयामाजी मंगलगीत गाती ॥ तयांसाव चित्तीं परिसावें ॥ ४५ ॥ ज्याज्या वर्णाचा जोजो धर्म ॥ त्याणें नित्यनैमित्तिक करावें कर्म ॥ जाणोनि आपुलें कल्याणवर्म ॥ परकीय धर्म नाचरावा ॥ ४६ ॥ परधर्मे होत महद्भय ॥ बुद्धी भ्रष्ट होवोनि जाय ॥ ऐसा कासया करणें उपाय ॥ अंतरती पाय देवाचे ॥ ४७ ॥ स्वधर्मानुष्ठानीं जो निष्णात ॥ तया करणें न लगे पुनीत ॥ होती पूर्ण मनोरथ ॥ उत्तम स्तोत्रांत जनन तया ॥ ४८ ॥ आपुलें स्वकर्म झाल्यावरी ॥ मग घेऊनि ते अवसरीं ॥ मृत्युलोकीं अमृतापरी ॥ वृक्ष निर्धारीं पारिभद्र ॥ ४९ ॥ तयाचें पत्र पुष्पसहित ॥ चूर्ण करोनी मेळवी जयांत ॥ मरीचि हिंगु लवण समस्त ॥ जीरक तयांत असावें ॥ ५० ॥ अजमोदा त्यामाजी ॥ एकत्र चूर्णी मिळवाजी ॥ एवं भक्षितां सुख सहजीं ॥ जीव राजी होय सदा ॥ ५१ ॥ तया भक्षणे करुनी जाण ॥ विपुळ आयुष्य विद्याधन ॥ लक्ष्मीची वृद्धी होवोन ॥ सुखावे मन परोपरी ॥ ५२ ॥ नानाविध रोगांची पीडा ॥ नासून जाय जयापुढां ॥ ऐसा जयाचा पवाडा ॥ वदती भडभडां ग्रंथ बहु ॥ ५३ ॥ ऐसा हा भक्षणविधी करूनी ॥ मग लागावें गणेशचरणीं ॥ पंचांगस्थ जो लिहिला लेखनी ॥ तया पूजनीं लागावें ॥ ५४ ॥ करूनि तयाचें पूजन ॥ धूपदीपनैवेद्य समर्पून ॥ तांबूल दक्षिणा ठेवून ॥ करावें नमन तयासी ॥ ५५ ॥ सुप्रसन्नवदन बैसावें ॥ एकाग्र मन करावें ॥ वर्षफळ यथासांग ऐकावें ॥ जिवेंभावें करोनियां ॥ ५६ ॥ ब्राह्मणाच्या सुखें करुन ॥ करावें पंचांगश्रवण ॥ राजा मंत्री स्वामी कोण कोण ॥ फळें संपूर्ण ऐकावीं ॥ ५७ ॥ मंग करूनि विप्रपूजा ॥ दक्षिणा देवोनि द्विजराजा ॥ प्रमाण करावें आपुल्या काजा ॥ आशिर्वाद सहजां देतसे ॥ ५८ ॥ पंचांगश्रवण झालियावरी ॥ आनंदें येवोनि गृहद्वारीं ॥ अभ्यंगजांची.

पूजाकरी ॥ ध्वजषोडशोपचारीं पूजावा ॥ ५९ ॥ ब्राह्मणहस्तें करावीशांती ॥ सर्व विघ्नें दूर होती ॥ ऐसीधरितां श्रद्धमती ॥ फलप्राप्ती करितो ही ॥ ६० ॥ नानाउत्पातांचा नाश होणें ॥ कलिसंबंधी दुःखजाणें ॥ आयुर्दैची वृद्धीपावणें ॥ लक्ष्मी रहाणें चिरकाल ॥ ६१ ॥ जैशाशुक्लपक्षीं चंद्रकळा ॥ वृद्धीतें पावती सकळा ॥ तयापरी सौभाग्य अढळा ॥ ऐसीलीलाशांतीची ॥ ६२ ॥ इहलोकीं सुखकारी ॥ परलोकींही ऐशापरी ॥ जोकांसद्भावठेवोनिकरी ॥ शांतिआदरें करोनियां ॥ ६३ ॥ ब्राह्मण द्वारें करावी शांती ॥ सर्व विघ्नें दूर होती ॥ ऐशीधरितां श्रद्धमती ॥ पावेल स्थितीसुखाची ॥ ६४ ॥ तयाशांतीमाजीजाण ॥ मुख्य देवताचतुराननं ॥ तयाचें यथाविधी पूजन ॥ देवतासुप्रसन्न करावी ॥ ६५ ॥ यथाविधीशांती होतां ॥ मगप्रार्थना करयाची आतां ॥ त्याचामंत्र त्याची देवता ॥ आहे तत्वतां मंत्रांमाजी ॥ ६६ ॥ तोमंत्रकरितोंलेखन ॥ हस्तजोडुनी करावा पठण ॥ मगपुष्पांजलीवाहून ॥ साष्टांगनमन करावें ॥ ६७ ॥ ॥ मंत्र ॥ ॥ ॐ नमोब्रह्मणे तुभ्यंकामायच महात्मने ॥ नमस्तेस्तु निमेषाय त्रुटयेचनमोस्तुते ॥ १ ॥ इतिमंत्रः ॥ ॥ नानाप्रकारचीं पक्कान्नें करून ॥ आराध्यदेवतेसीं समर्पून ॥ आपणकरावें भोजन ॥ इष्टमित्रसुजनसमवेत ॥ ६८ ॥ आल्या अतिथीचा आदर ॥ करूनियथाशक्तीसत्कार ॥ अन्नवाढावें पोट भर ॥ कीर्तिपसार होयतेणें ॥ ६९ ॥ ऐसाआनंदाचादिवस ॥ लोटतांजाय एकवर्ष ॥ ऐशासुखें दिवसें दिवस ॥ पावे सुखास जन्मवरी ॥ ७० ॥ ऐशिया प्रकारें करून ॥ सांगीतलें व्रतराजीं जाण ॥ तेंयथामती निरूपण ॥ देवोनि अवधानवर्तावें ॥ ७१ ॥ एक अब्दसुख होणारें ॥ कांनवर्तावें ग्रंथाधारें ॥ जेंकांसांगीतलें थोरवडें खरें ॥ अत्यादरें करावें तें ॥ ७२ ॥ हें केलेंजें सर्वकथन ॥ श्रोते होउनीसावधान ॥ सुखभोगोनि होती पावन ॥ स्वधर्मानुष्ठानें करूनि ॥ ७३ ॥ गोडकथारसाकपाहतां ॥ हरपोनिजायदुःखव्यथा ॥ मगतयापरीवर्तेजो तत्वतां ॥ त्याचीसुखवार्ता कायवर्णूं ॥ ७४ ॥ ॥ इतिश्रीवर्षप्रतीपदा कथासमाप्ता ॥ ॥ ॥ ७ ॥ ॥०॥



## ॥ अथशीतलासप्तमी कथा प्रारंभः ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥जयजयाजी परब्रह्मा ॥ जयजयाजी विश्रामधामा ॥ जय जयाजी पूर्णकामा ॥ मनोरमादीनबंधू ॥ १ ॥ जोकांकृपेचासागरू ॥ तयामाझा नमस्कारू ॥ सर्व सुखाचा आगरू ॥ करीभवपारू दयानिधे ॥ २ ॥ शुक्लपक्ष श्रावण मास ॥ सप्तमी तिथी माध्यान्हींस ॥ शीतलादेवीच्या व्रतास ॥ करि- तां सुखास पावती ॥ ३ ॥ हें व्रत स्त्रियांनींजाणिजे ॥ सौभाग्याकारणें आच रिजे ॥ माध्यान्हव्यापिनी तिथीधरीजे ॥ पूजन करिजेयया विधी ॥ ४ ॥ प्रातः कालीं स्त्रियांनींउठोन ॥ करावेंमस्तकावरून स्नान ॥ व्रतस्थअसावेंजाण ॥ देवतास्थापन मध्यान्हीं ॥ ५ ॥ साळीघालावी तयावरी ॥ अष्टदळकाढावेंसुंद री ॥ पूर्णकलश ते अवसरीं ॥ ठेवानितयावरी अच्छिद्र ॥ ६ ॥ तयाकलशाच्या माथां ॥ पूर्णपात्र ठेवीमाथां ॥ तयामाजीकुंकुमाक्षता ॥ शीतलादेवता स्थापा- वी ॥ ७ ॥ सुवर्णाचीप्रतिमाकरून ॥ पूर्णपात्रामाजीस्थापून ॥ मग करावें पूजन ॥ धारणा ध्यान करोनियां ॥ ८ ॥ ॥ ध्यानमंत्र ॥ ॥ वंदेहं शीतलांदेवींरा सभस्थां दिगंबराम् ॥ मार्जनी कलशोपेतां शूर्पालंकृत मस्तकां ॥ १ ॥ कुंभे संस्थापयेद्देवीं पूजयेन्नाम मंत्रतः ॥ शीतले दह मे पापं पुत्रसौख्य फलप्रदे ॥ २ ॥ धनधान्यप्रदे देवी पूजां गृण्ह नमोस्तुते ॥ ॥ इतिमंत्रः ॥ ॥ ऐशामंत्रेंकरूनि- ध्यान ॥ करावें षोडशोपचार पूजन ॥ गंधपुष्पअक्षताजाण ॥ वस्त्राभरणें अ-

पावीं ॥ ९ ॥ हळदीकुंकुमवाहीं ॥ कंठसूत्रताडपत्रतेंही ॥ कंचुकीककंणासहीं ॥ नाना परिमळहीं तियेसीं ॥ १० ॥ धूपदीपनैवेद्य अर्पावा ॥ प्रदक्षिणा तांबूल ठेवावा ॥ भावें नमस्कार करावा ॥ मार्गे पावावा सोज्वळ ॥ ११ ॥ यावें दधिभाताचें वायन ॥ करूनि ब्राह्मणाचें पूजन ॥ तांबूल दक्षिणा देऊन ॥ स्त्रिय समाधान करावें ॥ १२ ॥ पूजन होतां कथानक ॥ ब्राह्मणमुखें सकळिक ॥ जें कां कल्याण दायक ॥ तें चि ऐकसावचित्तीं ॥ १३ ॥ सागराचें करोनी मंथन ॥ रत्नें काढिलीं चवुदेश जाण ॥ तेंवीं अष्टादश पुराण ॥ शोधुनी कथन करितों हें ॥ १४ ॥ ही सुरस कथा सुरेख ॥ भविष्योत्तर पुराणी देख ॥ श्रीकृष्णें सांगीतली ऐक ॥ ती सकळिक श्रवण करी ॥ १५ ॥ हस्तनापुरामाझारी ॥ इंद्रद्युम्न नाम धारी ॥ तया राजयाची सुंदर नारी ॥ नाम निर्धारी धर्मशीला ॥ १६ ॥ ती महापतिव्रता देख ॥ जिचा त्रिलोकीं लौकिक ॥ परम उदार दान धार्मिक ॥ जियेस कळिकवानिती ॥ १७ ॥ झाला एक पुत्र तिजला ॥ महाधर्म हें नाम जयाला ॥ आणि जेशी पूर्ण चंद्राची कळा ॥ कन्या सुदाळा शुभकरी ॥ १८ ॥ नामा सारिखी जिची कृती ॥ स्वरूपें पाहतां प्रकाशेक्षिनी ॥ गुणें पाहतां केवळ सती ॥ जैसी दमयंती तये परी ॥ १९ ॥ सामुद्रीक लक्षणें करूनि जाण ॥ युक्त असे ती परिपूर्ण ॥ पद्महस्ता आकर्णनयन ॥ सुहास्यवदन जियेचें ॥ २० ॥ ती कन्या झाली उपवर ॥ पिता पाहे दृष्टिभर ॥ इंद्रद्युम्नें केला विचार ॥ करावें स्वयंवर कन्येचें ॥ २१ ॥ करूनि मनाचा निर्धार ॥ कन्यके योग्य आहे वर ॥ नामें सुमित्र प्रतापघोर ॥ त्याचा कुमर योजावा ॥ २२ ॥ ऐसें मनीं आणोनियां ॥ प्रधान धाडिला तये ठाया ॥ मुहूर्त निश्चय करूनियां ॥ आला कळवाया राजेंद्रा ॥ २३ ॥ तो पुत्र महागुणाची खाण ॥ ईच्या भाग्यें मिळाला जाण ॥ तया करावें कन्यादान ॥ योजिलें लग्न उत्तम दिनीं ॥ २४ ॥ मांडिला समारंभ आपण ॥ मंडप घातला दारुण ॥ हिरे माणिकपाचू जडवून ॥ केला विस्तीर्ण सुशोभित ॥ २५ ॥ देशोदेशींचे राजे आणिले ॥ सभे माजी येवोनि बैसले ॥ कौंडिण्यपुराहूनि निघाले ॥ विवाहा चालिले आनंदें ॥ २६ ॥ उत्साह टयंत्रांचा भडमार ॥ नाना वाद्यांचा गजर ॥ घेउनी संगें सैन्यभार ॥ सामोरे अपार चालिले ॥ २७ ॥ परस्परें होवानि भेटी ॥ मंडपीं आणोनि बैसवीती

वस्त्रालंकारभूषणेंदेती॥ वरापूजितीआनंदे ॥ २८ ॥सावधानह्मणोनिमंत्रास्त
ता॥टाकित्याउभयतांचेमाथां॥ब्राह्मणबोलतीसर्वथा ॥ यांच्याकथाजगींगाती॥
२९॥जाहलाविवाहाचासोहळा॥आंदणदीघलेंभूपाळा॥पोषाखदेउनीसकळां॥
सर्वभूपाळबोलाविले॥ ३०॥पुत्रासहसुमित्रवीर॥जोकांप्रद्युम्नउदारधीर॥ तया
सींह्मणेसत्वर॥ निरोपनिर्धारदेईआह्मां ॥ ३१ ॥आतांकौंडिन्यपुरासी॥ घेवानि
तुमच्याकन्येसी ॥ निरोपावेंस्वस्थमानसीं ॥ऐसेंआनंदेंपुसतसे ॥ ३२॥ मातापि
त्यासिकन्यका॥नमनकरोनीप्रार्थीऐका॥आज्ञाद्यावीमजबाळका॥ सासरीदेखा
जावया ॥ ३३ ॥ आज्ञादेतांमायबापें ॥ रथावरीचढेआनंदरूपें ॥ तोंउपदेशिलीप्रद्यु
म्नप्रतापें ॥ जातीलपापेंनासुनी ॥ ३४ ॥ आपुल्याश्वशूरगृहींजाऊन॥ व्रतकरा
वेंआचरण॥ शीतलासप्तमीचेंजाण॥ विसरूनकोआणमाझी ॥ ३५॥ऐसेंऐकतां
कन्याबोले॥ब्रह्मदेवेंजेंसांगितलें॥ तयातेंपाहिजेऐकिलें ॥ निश्चयेंधरिलेंम्याहृ
दयीं ॥ ३६ ॥मुख्यऐकेंपतिव्रताधर्म ॥ तयाह्नीस्त्रियांसअन्यकर्म॥नेणेदुसऱ्याव्र
ताचाधर्म ॥ वाटेअधर्ममजलागीं ॥ ३७ ॥ परीतूंपितादेवासमान ॥ तुझीआज्ञावं
दनकरून॥ आतांयेथेंचीवासकरून ॥ करित्यें आचरणव्रतातें ॥ ३८ ॥ऐसेंवंदोनी
पतीसहीत॥राहिलीपित्याच्यानगरांत ॥ करूनिअंतःकरणसुचित ॥पुढीलवृत्तां
तपरियेसीं॥ ३९ ॥ सौभाग्यदेईनिर्धारीं ॥वैधव्यपणाचानाशकरी ॥ ऐशाव्रता-
तेंआचरी॥ निश्चयअंतरींधरोनियां॥ ४० ॥ आपुलापुरोहितपत्नीसहीत॥ घेऊ
निनिघालीसमवेत॥जातीझालीअरण्यांत॥ प्रेमभरीततेकाळीं ॥ ४१ ॥ व्रतस्थ-
राहोनीआपण॥ करोनिसचैलस्नान॥ एकसरोवरालागुन॥ पाहतांमनउल्हासे
॥ ४२॥ करावेंयेथेंचव्रत॥ तोंवर्तलेंअद्भुत॥ पाठीनाहींपुरोहित॥ झालेंगुप्तसरोव
र॥ ४३ ॥ निद्रालागलीपुरोहिता ॥ मार्गीमाजीजातांजातां ॥ तोनदिसेचीतत्व-
ता॥ खेदचिन्ताबहुझाला॥ ४४ ॥ मजवरीदेवीकोपली॥सर्वसंगतीमाझीगेली॥
जीकांजगाचीमाउली॥पाउलापाउलीं आठवित्यें॥ ४५॥ ऐसेंवदोनीभयभीत॥ये-
कलीफिरेअरण्यांत॥श्रमजाहलेतयेबहूत॥जाहलेंचित्तउद्विग्न॥ ४६॥ इतुकीया
माजीअकस्मात॥वृद्धस्त्रीप्रगटहोत॥ राजकन्येलागीह्मणत॥अंतरीभीतनराहावें॥
४७॥चिरंजीवीभर्तातुझा॥आशीर्वादघेईमाझा॥हेतुपुरवीलतुझा॥ करितांपू-

जा देवीची ॥ ४८ ॥ आतां येई माझ्यामागें ॥ दावितें सरोवर वेगें ॥ पूजा करोनी पाई लागे ॥ प्रगटेल वेगें शीतळा ते ॥ ४९ ॥ ऐसें वदोनी वेगेंसीं ॥ घेऊन गेली सरोवरासीं ॥ आतां षोडशोपचारें पूजेसीं ॥ शीतळास समीशी करावें ॥ ५० ॥ पितयाची आज्ञा स्मरोन ॥ मग घालोनी आसन ॥ बैसली एकाग्र मन ॥ लाविलें ध्यान देवीकडे ॥ ५१ ॥ पूजासामग्री सकळ ॥ भातावरी रेखिलें अष्टदळ ॥ कलश पूर्णपात्र निर्मळ ॥ प्रतिमा सोज्वळ स्थापिली ॥ ५२ ॥ त्या सुवर्णप्रतिमेचें ध्यान ॥ करूनि आवाहन पूजन ॥ षोडशोपचार अर्पून ॥ झाली प्रसन्न शीतळादेवी ॥ ५३ ॥ ह्मणे मांग जें इच्छित ॥ शीतळा देवी असें वदत ॥ शुभकरी ह्मणे सौभाग्ययुक्त ॥ देह विपरीत न व्हावा ॥ ५४ ॥ वैधव्य न यावें कोणे काळीं ॥ तुझें व्रत करिती ज्या वाळी ॥ स्मरतां उभी राहें जवळी ॥ पुरवीं आळी हे माझी ॥ ५५ ॥ ऐसें वरदान मागतां ॥ देउनी अदृश्य झाली देवता ॥ सख्यांसहीत परतोनि आतां ॥ जावें मातां सदनासी ॥ ५६ ॥ राजकन्या मार्गीं जात ॥ सर्पदंशें करूनि घात ॥ मार्गामाजी पडलें प्रेत ॥ ह्मणे पुरोहित आपुला ॥ ५७ ॥ आकांत स्त्रियेनें मांडला ॥ काय बोले राजकन्य केला ॥ मी सहगमनाचा नेम केला ॥ वैधव्य मजला सोसेना ॥ ५८ ॥ पतीसह गमन करितां सहज ॥ प्राप्त होईल स्वर्ग मज ॥ वैधव्यदुःखाची गजबज न सोसवे मज सर्वथा ॥ ५९ ॥ पुरोहिताची स्त्री बोलत ॥ अग्नी जाळी पतीसमवेत ॥ तोंये थें राहावें सावचित्त ॥ मग नगरांत जाइजे ॥ ६० ॥ ऐसें ऐकतां भाषण ॥ राजपुत्रीस दुःख दारुण ॥ शीतला देवीचें करूनि स्मरण ॥ मांडिलें स्तवन सप्रेमें ॥ ६१ ॥ प्रसन्न झाली देवता ॥ ह्मणे इच्छित माग आतां ॥ उठवीं आसुच्या पुरोहिता ॥ भाषण ऐकतां काय बोले ॥ ६२ ॥ तूं बहु कोमळ हृदयाची ॥ दया करिसीं कुळगुरूची ॥ तरी केला संग्रह वेंवी ॥ नो हे दुःखाची तुज बाधा ॥ ६३ ॥ माझें तुवां केलें व्रत ॥ तें पुण्य अर्पावें त्वरित ॥ ऐसी बोलोनियां मात ॥ देवी गुप्त झाली तेथें ॥ ६४ ॥ मग ऐकोनी राजबाळा ॥ पुण्य अर्पी तया वेळा ॥ तया सुखाचा सोहळा ॥ ब्रह्मबाळा भोगितसे ॥ ६५ ॥ निद्रिस्तापरी अकस्मात ॥ ब्राह्मण उठिला त्वरित ॥ अंग मोडोनी ह्मणत ॥ करीं व्रत राजकन्ये तूं ॥ ६६ ॥ सकळ वृत्तांत जो जो जाहला ॥ तितुका समजाउनी तयाला ॥ ब्राह्मणस्त्रियेस आनंद झाला ॥ त्याच्यां मोळा पार नाहीं ॥ ६७ ॥ इतुकें झालियांवरी ॥ ब्राह्म

णविस्मित झाला अंतरीं॥ ह्मणे धन्य हीराजकुमरी॥ कीर्ति निर्धारी त्रिभुवनीं॥ ६८॥ काळमुखांतून सोडविलें मजा॥ अक्षयी सौभाग्य राहो तुज॥ स्तुती करितां बोले गुज॥ आज्ञा मज देई आतां॥ ६९॥ पतिआज्ञा विप्रस्त्रीस॥ होतां चि केलें व्रतास॥ होउनी संतोष मानस॥ पावली सुखास अंतरीं॥ ७०॥ तेथूनि मार्ग क्रमीत॥ राजपुत्री ब्राह्मणासहित॥ चालली पुढें अकस्मात॥ जाहलें प्राप्त विघ्न ऐसें॥ ७१॥ राजकुमरीचा भ्रतार॥ करितां अरण्यांत शिकार॥ तेथें काळसर्प अनिवार॥ डंखोनि भूमिवर पाडिला॥ ७२॥ मार्गी जातां भूपती॥ पडला दृष्टीं पाहे स्थिती॥ आकांत मांडिला निश्चिती॥ माझी गती कोणती॥ ७३॥ पती पावतां मरण॥ अश्रु भरी झांकी नयन॥ दुःखित होउनी अंतःकरण॥ विव्हळ जाण पडियेली॥ ७४॥ वारे माझ्या अंगावरी॥ आकाश कोसळलें निर्धारी॥ आतां कैसें जन्मवरी॥ दुःख डोंगरीं असावें॥ ७५॥ पूर्वी म्या कोणाचा केला घात॥ विघड पडला भ्रतारस्त्रींत॥ ईश्वरें न नेलें मज समवेत॥ ऐसिया दुःखांत ठेविलें॥ ७६॥ मनामाजी विचार करून॥ केलें शीतलादेवीचें ध्यान॥ मजवरी पडलें निर्वाण॥ धांवणे जाणायास मया॥ ७७॥ ऐसा ऐकोनियां धांवा॥ देवी प्रत्यक्ष पावली भावा॥ जो कां जीविंचा विसावा॥ तो न्हिवाचा उठवोनी॥ ७८॥ गगनी चमकती सौदामिनी॥ तेणें प्रकाशे मेदिनी॥ ऐसी दिव्यरूपें करूनी॥ प्रगटोनि सन्मुख राहिली॥ ७९॥ अतिकोमळ कांति सुंदर॥ नाना प्रकारचे अळंकार॥ कुंकुम रेखिलें सुंदर॥ किरीट मनोहर जडितांचा॥ ८०॥ तीच्या तेजापुढें जाण॥ चंद्रसूर्य जाती लपोन॥ स्वरूप पाहतां झांकी नयन॥ ऐसें ध्यान देखियेलें॥ ८१॥ जे ध्यान योगियांना तुडे॥ ते पाहिलें उभें पुढें॥ चरणीं मस्तक ठेउनी पवाडे॥ गाई रोकडे राजबाळा॥ ८२॥ देवी ह्मणे सांग कारण॥ कां केलें माझें चिंतन॥ सती ह्मणे काळें येउन॥ नेले प्राण मम पतीचे॥ ८३॥ देवता ऐकोनि तिच्या बोला॥ माझ्या व्रताचा प्रताप ऐकिला॥ नये वैधव्य कोणाला॥ ऐसी लीला असे माझी॥ ८४॥ आतां सोडोनी देई भीती॥ पतीन दे काळा हातीं॥ अभयवचन हें निश्चितीं॥ जाई सती पतिजवळी॥ ८५॥ आतां जाउनी त्वरित॥ पतीच्या शरीरीं फिरवीं हात॥ प्राण प्रगटोनी देहांत॥ उठेल गत झाला तो॥ ८६॥ राजकन्या जाउनी लवलाहीं॥ अंगावरी हात फिरवून पाही॥ निजला जैसा जागा होई॥ तैसा तो ही उ-

ठेवेगेसीं ॥ ८७ ॥ सर्वांसीं आनंद झाला ॥ एकविजयजयकारकेला ॥ ऐसाभा ग्योदयउदेला ॥ दान धर्म केला अनिवार ॥ ८८ ॥ देवाची प्रार्थना करून ॥ ह्मणंती· आह्मीं स्त्रियादीन ॥ तयां कृपादृष्टीन्यहाळून ॥ वैधव्यनसावें कवणासीं ॥ ८९ ॥ देवीह्मणेकोणी हीजाण ॥ माझेंव्रतकरिंतीआचरण ॥ तयास्त्रियाशीं वैधव्यजाण ॥ नयेवरदान हेंचिमाझें ॥ ९० ॥ देवीवदोनीगुप्तझाली ॥ पतीसहकन्यकानगराआली ॥ दानधर्मकरितीझाली ॥ धन्यत्वपावलीं मायबापें ॥ ९१ ॥ राजकन्यापतिसमवेत ॥ मायबापांसीं वंदन करीत ॥ जातीं आपुल्यानगरांत ॥ घेऊनिजांत आज्ञेनें ॥ ९२ ॥ ऐशाव्रतप्रभावें करून ॥ विप्रस्त्रीराजकन्याजाण ॥ पुत्रपौत्रादिसौभाग्यवर्धन ॥ झालीजाण प्राप्ततयां ॥ ९३ ॥ ऐसेंयाव्रताचेंअभिमान ॥ जेकांकरितीनेमेंकरून ॥ तयांदेवी प्रसन्न होऊन ॥ करीसमाधानसर्वोपरी ॥ ९४ ॥ ज्याकोणी स्त्रियाजाण ॥ हेंव्रत करिती आचरण ॥ तयांसंकट नपडेजाण ॥ करीआचरणायथाविधी ॥ ९५ ॥ शीतलासप्तमीव्रतकीजे ॥ सौभाग्यअखंडपाविजे ॥ राजकन्येपरीआनंदभोगिजे ॥ दरिद्रजाइजेदेशघडी ॥ ९६ ॥ पुत्रपौत्रआदिकरून ॥ संततीवृद्धीहोईलजाण ॥ अल्पायुषी नहोईल कोण ॥ ऐसेंवचनदेवीचें ॥ ९७ ॥ सर्वसिद्धीकारक व्रत ॥ तयावरीठेवूनिप्रीत ॥ करीलजीकांदेविभक्त ॥ होईलमुक्तसर्वथा ॥ ९८ ॥ श्रीकृष्णाजोकांआठवा ॥ त्याणेंसांगीत लाकथेचाठेवा ॥ जोकांस्त्रियांलागीं विसांवा ॥ तोप्रकटावासर्वांसीं ॥ ९९ ॥ ऐशाभावें करूनिजाण ॥ केलेंप्राकृतवर्णन ॥ तयावरीभावठेवून ॥ कथाश्रवणकरावी ॥ १०० ॥ ॥ इतिशी· स· क· संपूर्ण ॥



# अथ विजयादशमी कथा प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीकुलदेवतायैनमः ॥ ॐनमोजीगौरीकुमरा ॥ सकलविद्यांच्यासागरा ॥ तूतेंस्मरतां बुद्धीचाप्रसारा ॥ ग्रंथविस्तारा होतसे ॥ १ ॥ ऐसाजोकांज्ञानघन ॥ निर्गुणनिराकारसनातन ॥ तोतूंसगुणझालासीआपण ॥ भक्तांसिजाणरक्षावया ॥ २ ॥ तुझ्यासगुणपणाचेंवर्णन ॥ चतुर्भुजआदिगजवदन ॥ विशाळदोंदशोभायमान ॥ आकर्णनयनविराजती ॥ ३ ॥ चरणकमळअतिकोमळ ॥ कटींनागबंधसबळ ॥ दंतपंक्तीचाझळाळ ॥ भासतकेवळहिऱ्यापरी ॥ ४ ॥ नमोसद्गुरुचिन्मयरवाणी ॥ जगव्यापकदिनमणी ॥ अज्ञानतमनिरसोनी ॥ लाविलेंध्यानीआयुष्या ॥ ५ ॥ ऋद्धिसिद्धीसरस्वती ॥ वंदीतयाचरणांप्रती ॥ जेकांसाधूविमलमती ॥ भाविकचित्तीनमियेले ॥ ६ ॥ जेकांसुजनश्रोतेवक्ते ॥ कृपाळूजेभावाचेभोक्ते ॥ माझीवचनें प्राकृतें ॥ सांगेनचितयांपासीं ॥ ७ ॥ आतांजीकांउपास्यदेवता ॥ वदवीजोकां रसाळकथा ॥ रसनावाहे अमृतसरिता ॥ दत्तदेवताप्रणिपात ॥ ८ ॥ मागेंवर्णिलेंकथानक ॥ वर्षफळातेंपाहतीलोक ॥ विजयादशमीमहात्म्यसुरेख ॥ तीकथा ऐकापुढती ॥ ९ ॥ जोकांआनंददायकदिवस ॥ विजयादशमीह्मणतीतयास ॥ तोशरदृतु आश्विनमास ॥ उत्साहदिवससर्वांचा ॥ १० ॥ सूर्योदयापासून असावीस्थिती ॥ वीसघटकानंतरशास्त्रमतीं ॥ तीदशमीव्रतासीयोग्यह्मणती ॥ श्रवणनक्षत्र तेदिनीं असावें ॥ ११ ॥ ऐसीउत्तमतिथीपाहीं ॥ एकादशीयुक्तदशमीतेही ॥ श्रवणनक्षत्रतिथीच्याठायीं ॥ घ्यावीतेहीउक्तअसे ॥ १२ ॥ जरीवीसघडीदशमी असे ॥ श्रवणनक्षत्रतयादिनींनसे ॥ तरीती घेऊंनयेशास्त्रअसे ॥ व्रतराजपरिसें बोलला ॥ १३ ॥ ऐसेंतिथीचें ऐकेंप्रमाण ॥ पुढेंविधियुक्तआचरण ॥ तेंहीकथितोंसंपूर्ण ॥ धरुनिप्रमाणचालावें ॥ १४ ॥ ऐसी विजयदायकतिथीसी ॥ मांगलिककरावेंस्नानासीं ॥ नित्यनैमित्तिककर्मासीं ॥ सरस्वतीपूजनासीं करावें ॥ १५ ॥ जीहोतांप्रसन्नजाण ॥ जगामाजीवाढेलमान ॥ तयेचें षोडशोपचारें पूजन ॥ एकाग्रमनेंकरावें ॥ १६ ॥ उत्तमंप्रकारेंपदार्थनिर्मुन ॥

करावेंषड्रसांचेंसेवन॥ पंक्तीस घेणें सुवासिनीब्राह्मण ॥ करणेंभोजनंस्वस्थ चित्तें॥१७॥वीसघटकाभरलीयाउपरांत॥ सीमोल्लंघनकरावेंत्वरित॥ वस्त्रालं- कारभूषणमंडित॥ सुहृदजनसहितनिघावें॥१८॥ समागमेंनानावाद्यघोष॥ अश्वआदिकरूनीवाहनेविशेष॥ आरूढहोऊनउत्तरदिशेस॥ जावेंशमीसआ णावया॥१९॥ तेथेंगेलियावरीजाण॥ पंचोपचारशमीपूजन॥ धूपदीपनैवेद्यस मर्पून॥ तांबूलदक्षिणाअर्पावी ॥२०॥ मगसर्वांनींकीजेप्रदक्षिणा॥ ईशान्यसमु खकरोनीप्रार्थना॥ लिहिलेमंत्रवदोनिवंदना॥ करूनीसुवर्ण लुटावें॥२१॥ मंत्र॥ शमीशमयतेपापंशमीशत्रुविनाशिनी॥ अर्जुनस्यधनुर्धारीरामस्यप्रियवादि नी॥२२॥शमीशमयतेपापंशमीलोहितकंटका॥ धारिण्यर्जुनबाणानांरामस्य- प्रियवादिनी॥२३॥ करिष्यमाणयात्रायांयथाकालंसुखंमया॥ तत्रनिर्विघ्नक- र्त्रित्वंभवश्रीरामपूजिते॥२४॥ ॥ ऐशामंत्रेंप्रार्थनाकीजे॥ शमीवरुतीअक्षताद्य किजे॥आणिमुळासहशमीकाढिजे॥ गृहींयेइजे आनंदें ॥२५॥शमीअर्पावी देवासी॥ मगपुजावेंब्राह्मणासीं॥इष्टमित्रसकलजनासीं॥ शमीसुवर्णासींअ र्पावें॥२६॥ परस्परे घ्यावेंघ्यावें॥ एकमेकांनमनकरावें॥ ऐसेंव्रतआचरावें॥ बहुसद्भावेंकरोनियां॥२७॥ आतांमनींशंकाआलीपाहीं॥शमीवृक्षज्याठायीं नाहीं॥ त्यांनींकवण्यापुजावेंपाहीं॥ सांगेलवलाहीसकळासीं॥२८॥वनराज वृक्षह्मणतीजयाला॥ सद्भावेंकरूनीपूजीतया॥येणेंमंत्रेंप्रार्थुनियां॥देईलविः जयातयापरी॥२९॥ ॥ मंत्र ॥ ॥आदिराजमहाराजवनराजवनस्पते॥ इष्ट दर्शनमिष्टान्नशत्रूणांचपराजयः॥३०॥ ॥ऐशामंत्रेंकरूनिजाण॥करावींवन रा जप्रार्थना॥पूर्वविधीनेंकरूनिपूजन॥ घेऊनीसुवर्णाजाईमन॥ ३१॥ येणेंप्र- कारेंसकळजनें॥ वर्तावें आपुल्याजयाकारणें॥आतांसार्वभौममांडलिकानें॥ करावींपूजनेंकोणेपरी॥३२॥ अतरगुलाब चमेलीदेख॥ अर्गजादिकरूनिसुगं धीक॥ आंगालावुनीपरिमळसुरेख॥ स्नानलौकिककरावें॥३३॥मगसारुनि सकळक्रिया॥ दानधर्मकरूनिसदया॥ टालघावीचंद्र पाहुनियां ॥ शत्रुवधावया- कारणें॥३४॥नानाप्रकारचीं वस्त्रेंसुरेख॥ मंदीलशिरपेंचतुराअमोलिक॥ अं- गभूषणेंमुद्रादिक॥शृंगारसकळिकसाजिरा॥३५॥ कोणेंबेळींकीरीटकुंडलें॥

अंगींकवच झळाळिलें॥ हस्तींखड्ग धनु पिवळें॥ ठाणा दिधलें सुरेख॥ ३६॥ करूनि ढालनिशाणपूजन॥ वाजीवारण समग्र जाण॥ रथशिबिकाआदिकरून॥ शस्त्रास्त्रेंसकळ पूजावीं॥ ३७॥ मग षड्रस भोजन पक्वान्न॥ ब्राह्मणासि इच्छादानदेउन॥ प्रधानसेन्यसह आपण॥ अन्नसेवन करावें॥ ३८॥ त्रयोदशगुणउपचारीं॥ तांबूल भक्षावें निर्धारीं॥ वामकुक्षकरोनी स्वारी॥ होतातयारी निघावें॥ ३९॥ चतुरंगसेनासिद्ध करून॥ मानमान करी सर्व पाचारून॥ अष्टप्रधानसंहितजाण॥ सभेस आपण बसावें॥ ४०॥ वाजीअलंकारभूषणयुक्त॥ वारणश्रृंगारुनी करी मुक्त॥ शिबिकारथध्वजसहित॥ गजरअद्भुतवाद्यांचा॥ ४१॥ नगारानिशाणझर्जरी॥ डंकानोबतीवाजती परोपरी॥ रणवाद्यांचीघाई भारी॥ निघावीस्वारी ऐशारिती॥ ४२॥ पुढें करावा आपुला पुरोहित॥ ब्राह्मणसमुदायासहीत॥ पायदळ चतुरंगसेना अपरमित॥ आनंदयुक्त चालावें॥ ४३॥ रथावरी रथ लोटती॥ अश्व एकापुढें एक धांवती॥ गजचालिले मंदगती॥ पाहती भीती जनलोक॥ ४४॥ चोपदार आणि भालदार॥ पुढें ललकारती अपार॥ भाट वर्णिती गुण सुस्वर॥ शोभा अपरंपार दिसतसे॥ ४५॥ स्वामीगमन व्हावें पूर्वेकडे॥ सीमाउल्लंघन होतां रोकडें॥ वास्तुपूजन करितां तिकडे॥ पडेना संकट सर्वथाही॥ ४६॥ वेदोक्तपुराणोक्त मंत्रें करून॥ अष्टदिक्पाळही पूजावे जाण॥ इंद्रादिदेवतासर्वस्थापन॥ मार्गदेवताही पुजावी॥ ४७॥ अर्घ्यपाद्यपुष्पादि सकळ॥ धूपदीपनैवेद्य परिमळ॥ तांबूलदक्षिणा अर्पूनि सकळ॥ चरणीभाळ ठेवावें॥ ४८॥ मागें जीकांसागीतली रीती॥ तयापरी शमी पूजावा प्रीती॥ प्रदक्षिणा करूनी सावचित्तीं॥ मंत्रप्रार्थी ऐशापरी॥ ४९॥ ॥ मंत्रः॥ ॥ अमंगलानां शमनीं सर्वसिद्धिकरींशुभाम्॥ दुःस्वप्नशमनीं धन्यां प्रपद्येहं शमी शुभाम्॥ ५०॥ ॥ शत्रुभावमनीं आणून मृत्तिकेची प्रतिमा करून॥ तीतें छेदावया लागून॥ करावें ध्यान श्रीरामाचें॥ ५१॥ तो जाण एक रघुनायक॥ रविकुळभूषणदीपक॥ जो कां त्रिभुवनीं पूज्य देख॥ ध्याती सकळिक योगीजन॥ ५२॥ ऐसा जो कां श्रीरामचंद्र॥ कंठीं अखंड धरितो रुद्र॥ ध्यानीं धरितां होय भद्र॥ तेज सूर्यचंद्रकोटीगुणें॥ ५३॥ भक्तांसी असे मागेंपुढें॥ अभक्तांसी शासन रोकडें॥ तयासी तापतीचे पवाडे॥ गातां सांकडें न पडे कदां॥ ५४॥ जयाचें एकपत्नीव्रत पाहें॥ एकशय्या

एकबाणआहे॥ तयाचें धरितांध्यान नोहे॥ शत्रुभयकदांकाळीं ॥ ५५ ॥ तो सच्चिदानंदघननिर्मळ॥ सांचला सुस्वरूपें केवळ॥ ज्यालाम्हणती तमाळनीळ ॥ जोकांकेवळपरब्रह्म॥ ५६॥ पद्मनयनविशाळभाळ॥ जडितमुगुट कर्णी कुंडल॥ गळांशोभेवैजयंतीमाळ॥ पाहतांकेवळआजानबाहू॥ ५७॥ ज्याच्या चरणीं ध्वजांकुश॥ चिन्हें असती ऐसी विशेष॥ करितां स्मरणशत्रुनाश ॥ हस्ती धनुष्यबाण घेतला॥ ५८ ॥ ऐशारीतीधरूनिध्यान॥ स्वस्थकरावेंआपलें मन ॥ एकाग्र लक्ष लावून॥ मांडावेंठाणरामापरी॥ ५९ ॥ सुवर्णपुच्छांचाकरू निषाण॥ ओढी धनुष्यासीं ओढून॥ शत्रुप्रतिमेचें हृदय टाकितां फोडुन ॥ शत्रुभयापासूनिमुक्तहोय॥ ६०॥ इतुकेंहीजालियावरी ॥ पुरोहितब्राह्मणेंराजावरी॥ मंत्राक्षताटाकूनि शिरीं॥ यथार्थआशिर्वादकरावा॥ ६१ ॥ वेदमंत्राचें सामर्थ्य॥ सकळपुरवितीमनोरथ॥ हेंजाणोनीयथार्थ ॥ ठेवींभावार्थविप्रांवरी॥ ६२॥ विप्रांसिम्हणती भूदेव॥ तयांवरीज्यांचानसेभाव॥ होयतयालागींदूरदेव ॥ ऐसास्वभावनधरावा॥ ६३ ॥ असोआतांपुरोहितासीं ॥ तयापरीसर्वविप्रांसीं॥ पूजावेंवस्त्रअलंकारेंसीं॥ संतोषमानसीं करावा॥ ६४॥ विपुलदेउनीदक्षिणा॥ करूनिसाष्टांगनमना॥ मगनिघावेंराजसदना॥ घेउनी सेनापरतावें॥ ६५॥ मार्गीयेतानासकळिक॥ वाजीवारणपशूदेख॥ परीक्षाकरणें बाळकौतुक॥ पाहतीलोक सर्वही ॥ ६६॥ ऐसें आनंदें मिरवत॥ सकळजनकौतुक पहात ॥ अबाजनानापरीहोत॥ अत्यद्भुतऐशापरी॥ ६७॥ नगरासन्निधजाण ॥ चालला तो कांचाझणाण ॥ बंदुकजंजाळकडाविना॥ आवाजपरिपूर्ण होताती॥ ६८ ॥ ज्यादिशेसदीधलीटाल ॥ तेथीलभींतीपावेलभूपाळ ॥ हेंतो विजयादशमीचें फळ॥ करभारसकळआणिती॥ ६९ ॥ राजद्वारींराजा आलियावरी॥ गणिका आरती घेऊनिकरीं॥ येतीसामोऱ्याझडकरी॥ ओवाळिती परोपरी भूपातें॥ ७०॥ मगजाउनीमंदिरांत॥ शमीअर्पावादेवद्विजांप्रत॥ पुढील कवण्यापरी आना॥ वर्णितोंयथार्थपरिसेपां॥ ७१॥ राजाबैसतां सिंहासनी॥ सुवर्णेपूजावा सकळजनीं॥ अष्टप्रधानआदिकरुनी॥ आपुलाधनीम्हणोनियां॥ ७२॥ सकळसेना सुवर्ण देती॥ भूपातेंमुजराकरिती॥ चोपदारपुढेंललकारती॥ पाळूनशक्तीअंगींजया॥

॥७२॥ जाहलीयावरी राज सोहळा॥ प्रधानबोलती भूपाळा॥ वस्त्राभरणें देउनीं सकळां॥ हे प्रतिपाळा संतोषवी॥७३॥ ऐसें ऐकतां सत्वरगती॥ वस्त्रें वांटावीं बहु प्रीती॥ आज्ञा देउनी प्रसन्नचित्तीं॥ सर्वां प्रती आनंदवी॥७४॥ मग वस्त्राभरणें ल्यूजून॥ प्रधान मंत्री सकळ जन॥ पावलेस कळ समाधान॥ होतां दान आदरें॥७५॥ ऐसा जो कां राजा व्रत करी॥ प्रतिवर्षीं नेमें करूनि निर्धारीं॥ त्याच्या विजया नाहीं सरी॥ कोणी निर्धारीं करिता जो॥७६॥ करितां व्रतनियम ऐसा॥ पावेल फळ तो कैसा॥ पुढें कथितों परियेसा॥ चित्त उल्हासा पावे कीं॥७७॥ ऐसें चालतां नृपनाथें॥ मार्कंडेय आयुर्दा यत्यातें॥ आरोग्य होईल देहातें॥ रोग जयातें नातळती॥७८॥ ऐश्वर्याची वृद्धि होय जाण॥ दशवदना परी परिपूर्ण॥ संगती पावोन सुजन॥ बहु समाधान होतसे॥७९॥ विजयालागीं जैसा जय॥ होय शत्रूंचा पराजय॥ शमीपूजनें करूनि होय॥ स्वल्प उपाय पाहे पां॥८०॥ ऐसा जो कां सुगम पंथ॥ चालतां पावेल समस्त॥ सांगीतला जो कां वृत्तांत॥ आचरी समस्त संवत्सरीं॥८१॥ जो कां चालेल ऐशा रिती॥ कधींन होय मंदमती॥ होईल सकळ विद्यांची प्राप्ती॥ जाय दुर्मती विरोनियां॥८२॥ परशत्रु येतां आपणावरी॥ भयें उचकोनी अंतरीं॥ विरोनि जाय एकसरीं॥ तरंगापरी नासतसे॥८३॥ विजयादशमीची मात॥ सर्वांस सुख होय प्राप्त॥ व्रतराज आणि इतर ग्रंथ॥ दाविती पंथ सोज्वळ॥८४॥ ॥ इति श्री विजयादशमीकथा संपूर्ण॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ ॥



## अथयमद्वितीया कथा प्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥जयासीह्मणतीवक्रतुंड॥ तयासीभजतीजेकाअखंड॥ त्यांचाचुकेलयमदंड॥ काळप्रचंडस्पर्शेना॥ १॥ ऐसेंवदतीसंतजन॥ सकळां आधींजयाचें पूजन॥ करितीज्ञातेस्तुतिस्तवन॥ मंगलाचरणकविमर्था॥ २॥ ठेवुनीतयाचरणींमाथा॥ मगबोलतीकविकथा॥ गिरिजाजयाचीमाता॥ शंकर पिताशोभला॥ ३॥ व्याघ्रचर्माचेंआसन॥ स्मशानामाजीजयाशयन॥ गजचर्मा चेंजयापरिधान॥ भस्मलेपनतिचेंतें॥ ४॥ नागपाशाचीलंगोटी॥ भुजंगाचें सूत्रकंठीं॥ पन्नगहाररूळतीकंठीं॥ पाहातां दृष्टीत्रिनयन॥ ५॥ अर्धांगींपार्वती शोभत॥ जटेमाजीगंगावाहात॥ गणपतीषडाननखेळत॥ कौतुकपाहाततया चें॥ ६॥ ऐसाजोकांपंचवदन॥ पुढेंठाकलेंनंदीवाहन॥ जयासीध्यातीयो- गीजन॥ तयाचेंवंदनकरिजेलें॥ ७॥ वेताळसेनासमस्त॥ जालिजयाचीआज्ञां कित॥ देवयेवोनीतांडवनृत्य॥ अखंडकरितप्रदोषवेळे॥ ८॥ ऐसियाशोभ्या शिवासीं॥ भजतीजेकांस्वस्थमानसीं॥ वरदेउनीतयासीं॥ संतोषासीपाव- वीतो॥ ९॥ क्षीरसागरींजयावास॥ पर्यंकजयाचाशेष॥ लक्ष्मीसवेंभोगी विलास॥ तयाचेचरणासआधिवंदूं॥ १०॥ आतांसद्गुरुसुखाचीखाणी॥ आज्ञानटाकीनिरसोनी॥ जैसासूर्यउगवतां गगनीं॥ नदिसेजनीअंधार॥ ११॥ ऐसाजोकांसच्चिदानंद॥ जोकांआनंदाचाकंद॥ लागलासेतयाचा छंद॥ जो निर्द्वंद्व परात्पर॥ १२॥ जोस्वप्रकाशस्वयंज्योती॥ नमनतयां चरणाप्रती॥ जे तयांसद्भावें शरणजाती॥ उत्तमगती होयत्तयां॥ १३॥ आतांअसोहा पाल्हाळ॥ ऐकायमद्वितीयेचें फळ॥ होऊनिसावधश्रोतेसकळ॥ जाइल तळमळ जिवाची॥ १४॥ घडतीपापें अनिवार॥ नरकभोगवीदुर्धर॥ गांजि तीयेवोनियमकिंकर॥ सांगेनविस्तार पूढती॥ १५॥ पापतापतें मुक्तकरी॥ ऐसीकथासाजिरी॥ यमनटाकीयमपुरीं॥ जातीवेरीपळोनी॥ १६॥ कार्तिकशु क्लद्वितीयादिन॥ तयासिह्मणतीभाउबीजजन॥ अपराण्हव्यापिनीअसावीजा ण॥ करावेंस्नानयमुनेचें॥ १७॥ कालिंदीचेंकरितीपान॥ तेयमलोकानजाती

कोण॥ कृष्णा शुद्ध केलें जीवन॥ करील पालन सकळांसी॥ १८॥ जो कां बिजेच्यां दिवशीं॥ जाईल भगिनीच्या गृहासीं॥ तिच्या हातें मांगलिकासीं॥ करील स्नानासी धन्य तो॥ १९॥ संध्यादिक कर्म सारून॥ मग करावें यमतर्पण॥ भगिनी हस्तें भोजन॥ संतोष मन असावें॥ २०॥ तीर्थामाजी जी कां यमुना॥ ती यम भगिनी जाण॥ कृतांत आला तयेस्सदना॥ करी भोजना आनंदें॥ २१॥ भगिनीचा करावा सत्कार॥ देऊनि वस्त्रालंकार॥ तोषवावें तयेचें अंतर॥ दुरितसंहार होतसे॥ २२॥ जयांसी भगिनी नाहीं॥ तयानें करावें काई॥ मातुळकन्येकडे जाई॥ तेथें राही भोजना॥ २३॥ तीही नसेल कवणा जरी॥ तरी मानिली भगिनी जी दुसरी॥ तिच्या गृहीं उदर भरीं॥ तृप्त करीं प्राणातें॥ २४॥ माता अथवा आपली जाया॥ तयां हस्तें भोजन सरवयां॥ घेतां पाप न जाय लया॥ म्हणोनि उपाया कथियेलें॥ २५॥ भगिनी हस्तें सेवितां अन्न॥ धनधान्य लक्ष्मी परिपूर्ण॥ होईल आयुष्य वर्धन॥ शास्त्रप्रमाण ऐसें असे॥ २६॥ धर्म अर्थ तिसरा काम॥ चौथा मोक्ष पावसी धाम॥ हरपेल अवघा मोहभ्रम॥ न लगे श्रम करावया॥ २७॥ चारी पुरुषार्थ सकळिक॥ राबतां गृहीं होय सुख॥ तयाचें पुढें कथानक॥ सांगती सकळिक वालखिल्य॥ २८॥ वालखिल्य म्हणती सकळिकां॥ श्रोतेजन हो तुम्ही ऐका॥ कालिंदी जाय यमलोका॥ येई प्राणसख्या मम गृहीं॥ २९॥ माझ्या हस्तें भोजन॥ करीं येक वार येवोन॥ ऐसी नित्य प्रार्थना करून॥ जाय परतोन माघारी॥ ३०॥ आजि उद्यां ईकयेईन वेळे॥ ना तरी परवां तुजसंगें॥ येईन निश्चयेंसीं तूं जागे॥ ऐसें सांगे यमधर्म॥ ३१॥ ये रीती वदोनी भगिनीसीं॥ न जाय तिचिया सदनासीं॥ अनृत बोले तियेसीं॥ सांगतो परियेसीं किंनिमित्यें॥ ३२॥ यमाचें दरबार मोठें कठिण॥ काम बहूत तयालागुन॥ अवकाश न मिळे एक क्षण॥ हें चि कारण न यावया॥ ३३॥ प्राणिमात्र पापपुण्य करित॥ चित्रगुप्त तयातें गणित॥ चंद्रसूर्य साक्षीभूत॥ यम पुसत तयांतें॥ ३४॥ कोणी काय पाप केलें॥ साधुसंतातें छळिलें॥ हरिहरातें नाहीं पूजिलें॥ व्रतधर्मातें सोडिलें ऐसें कोण॥ ३५॥ कोणी स्वधर्मा सोडिती॥ परधर्मातें आचरिती॥ ब्राह्मणाचा छळ करिती॥ दंडें ताडिती गोवत्सांस॥ ३६॥ कंन्याविक्रय करून॥ करिती उदराचें पोषण॥ हयगोवृषवि

क्रयजाण॥ तयांचेंसाधननरकांचें॥ ३७॥ देवाच्या मूर्ति विकिती। कोणी वेद विक्रयकरिती॥ कोणी होउनीभ्रष्टमती॥ चांडाली प्रती भोगिती॥३८॥ कोणी करिती गर्भपात॥ कोणी ब्राह्मणाचा घात॥ कोणी गोवधकरीत॥ तयां अधःपातजाणिजे॥ ३९ ॥कोणीछळिती मातापिता॥ कोणीइच्छिती तयांच्या घाता॥ कोणी स्त्री बाळक वधितां॥ नभीती सर्वथा तयां आणी॥ ४०॥ कोणी करिती मद्यपान॥ कोणी मांसाचें भक्षण॥ नानापरीजीवांचे घेती प्राण॥ करिती दारुण अकर्म॥ ४१॥ कोणी सुवर्ण करिती चोरी॥ रौप्यताम्रनिर्धारी॥ कोणी गुरूचे प्राणहरी॥ तेअविचारीजाणावे॥ ४२॥ कोणी अनृतबोलती सदा॥ कोणी विश्वास घाताचा धंदा॥ कोणीदेवब्राह्मणाची निंदा॥ वर्णभेदानेणतीजे॥ ४३॥ कोणी करिती मातृगमन॥ नेणती सासू आणि सून॥ ब्राह्मणपत्नीतें दारुण॥ भोगितीजाणनिश्चित॥ ४४॥ कोणी सर्व वर्णाचे ठायीं॥ सक्त असें मैथुन विषयीं॥ जयासिंयातिभेद सुळींच नाहीं॥ तयालवलाहीं आणिजे॥ ४५॥ आपुलीं षट्कर्मेंसोडून॥ देव पितृयज्ञजाणे कोण॥ करीशूद्र आचरण॥ तोचिजाणआणावा॥ ४६॥ मुखानेनये रामनाम॥कधीं नपावे विश्रामधाम॥ ईश्वरभजनीं नाहीं प्रेम॥ मानी निगममिथ्या हें॥ ४७॥ आपुलें मतकरी स्थापन॥ कोणजाणेशास्त्रप्रमाण॥ आपुल्याहिता लागीं ब्राह्मण॥दावितीप्रमाणकाढोनी॥ ४८॥ ऐसेजेकां असतीनर॥ नर नव्हेते पशुवर॥ शास्त्राचासोडिती आधार॥ तेपामर आणि आधी॥४९॥ सर्ववर्णी गुरुब्राह्मण॥ तेसोडोनि ह्मणती आपण॥ आपुल्यावर्णी गुरुपूजन॥ केलेंसाधननरकाचें॥५०॥ पतिव्रताधर्मालागुन॥ स्त्रियासोडिती आपण॥ परपुरुषीं ठेउनी मन॥ विषयचिंतनकरितातीं॥ ५१॥ मनीनेणतीयातिकुळ॥ भ्रष्टव्हावें इच्छिती केवळ॥ तयांमाजी ज्यापुण्यशीळ॥ वैकुंठपाळरक्षी तयां॥ ५२॥व्रतवैकल्येंनकरिती॥ नेमधर्मआचार सोडिती॥ गुरुआंज्ञाउल्लंघन करिती॥ तयांअधोगतीआणावें॥५३॥ हाटामाजीघालुनीदुकान॥होउनीबैसतीकलावंतिण॥ जोकोणीतयांशीं करीगमन॥अधःपतनतयालागीं॥५४॥ऐसापापाचाअविचार॥आणखीअसतीदुर्धर॥ प

री सांगीतला थोडा विचार। तुह्मां आधार दाविला ॥ ५५ ॥ यमधर्म ह्मणे दूता प्रती। आतां तुह्मी जावें क्षितीं ॥ जे प्राणी दुराचारी असती ॥ आणा तयां प्रती ऐशा रीती ॥ ५६ ॥ नरनारी आदि करून ॥ आणितां न ध्यावें आपण। परी हरीहर भक्तां जाण। आचारें संपन्ना नाणावें ॥ ५७ ॥ अन्य धर्मी भ्रष्ट न होतां ॥ स्वधर्मी असती अत्यंत रता। सत्य भाषण एकपत्नीव्रत ॥ अखंड प्रीत हरिपायीं ॥ ५८ ॥ जे प्राणी ऐसे असती ॥ न स्पर्शावें तयां प्रती ॥ ज्यांच्या अंतरी भक्ती विरक्ती ॥ न करा सक्ती तयांवरी ॥ ५९ ॥ दुष्ट प्राणियांवर टाकावा पाश ॥ दंड करावा विशेष ॥ ओढाताण करा तयांस ॥ अंतरीं दया न धरावी ॥ ६० ॥ ऐसी आज्ञा होतां दूत ॥ मृत्युलोकीं जाऊनि त्वरित ॥ प्राणियां प्रती दुःखें जाचित ॥ करिती घात जिवांचा ॥ ६१ ॥ तप्त भूमीवरी चालवीती ॥ कंटक पायां माजी रुतती ॥ निष्ठूरपणें मार्गी ताडिती ॥ दंडें झोडिती सर्वकाळ ॥ ६२ ॥ बांधोनि आणिती पाशें करून ॥ विंचू विखार अजगर जाण ॥ अंगीं डंखिती महादारुण ॥ वेदना क्षणक्षणा प्राणासीं ॥ ६३ ॥ करिती शस्त्रास्त्रांचे प्रहार ॥ बांधोनि देती मोठा मार ॥ दूतांचें रूप अघोर ॥ कांपती थरथर प्राणिमात्र ॥ ६४ ॥ महानद्या लागती दुर्धर ॥ शोणितें भरल्या अपार ॥ कांहीं पूय पंक वाहती पूर ॥ ओढिती किंकर तयामाजी ॥ ६५ ॥ आवर्त गरगरां फिरविती ॥ तयामाजी गटकळ्या खाती ॥ मगरी मिठ्या मारुनी ओढिती ॥ गिळूं पाहती मत्स्य कच्छ ॥ ६६ ॥ तंतु बांधिती शरीरासीं ॥ नेती ओढोनी तयासी ॥ तोडिती मांस अहर्निशीं ॥ वेदना जिवासीं काय सांगूं ॥ ६७ ॥ मोह पर्वत कल्पकाकार ॥ अरण्य लागलें अपार ॥ कांटे जातां सर्व शरीर ॥ किंकाटती अपार श्वापदें ॥ ६८ ॥ कोणी शृंगानें हाणिती ॥ कोणी लत्ता प्रहार करिती ॥ कोणी दंतानी फाडिती ॥ कोणी लोटिती कंटकीं ॥ ६९ ॥ व्याघ्र सिंह भयानक ॥ चवके मारुनी खोविती नख ॥ पाठीं येवोनी जंबुक ॥ मारितीं डंख सक्रोधें ॥ ७० ॥ मस्तकीं ससाणा चूंचू प्रहार ॥ करी जैसें शस्त्र खडतर ॥ गृध्र पक्षी मांस रुधिर ॥ भक्षूनि अनिवार जाचिती ॥ ७१ ॥ अनेक पक्षी प्रहार करीत ॥ मर्मी हाणितां वेदना अमित ॥ मग धर्मलोकासि नेत ॥ तेथील वृत्तांत काय सांगूं ॥ ७२ ॥ पाहतां तें यमस्वरूप ॥ महाविक्राळ देतें कंप ॥ प्रताप ज्याचा अमूप ॥ नसे माप उपमेला ॥ ७३ ॥ हस्तीं घेतला काळदंड ॥ महा अद्भुत प्रचंड ॥ करील

ब्रह्मांड दुःखंड ॥ उदंड ऐसा नसे ॥ ७४ ॥ विक्राळ जयाच्या दाढा ॥ ओष्ठ चावोनी धांवे कडकडां ॥ ह्मणे खडे करोनी तोडा ॥ कराखंडें देहाचीं ॥ ७५ ॥ तप्त स्तंभासी ठेवा बांधून ॥ अंगासि बहु ताडण ॥ तप्त तेल कढईत टाकून ॥ काढा तळून प्राण्यासी ॥ ७६ ॥ आपण काळदंडें करून ॥ शरीर करीतसे चूर्ण ॥ जैसें इंद्र वज्र टाकी पिष्ट करून ॥ पर्वत फोडून तयासी ॥ ७७ ॥ डोळे फोडोनी करा अंध ॥ पायीं शृंखळांचे घाला बंध ॥ माथां ओझें देउनी अगाध ॥ फिरवा मतिमंद चहूंकडे ॥ ७८ ॥ हातपाय तोडोनी थोटा करा ॥ खैरांचे इंगळ भूमि पसरा ॥ निजवा शयनीं पामरा ॥ नहोय थारा कोठें ही ॥ ७९ ॥ मांडसीं नोडा तयाचें मांस ॥ विंचू डसवा रे नाकास ॥ घालुनी गळां दृढ तप्त फांस ॥ जीवासि त्रास देत असा ॥ ८० ॥ आतां चढवा सुळांवरी ॥ पायीं धरोनी ओढा करीं ॥ तक्षक डसवा त यांच्या शिरीं ॥ टाका भीतरी अग्नींत ॥ ८१ ॥ नेवोनि बांधा रे मातंगपायीं ॥ चरकीं पिळा रे लवलाहीं ॥ खणा रे तुह्मी मोगीं खाई ॥ तया गयीं नेवोनि गाडा ॥ ८२ ॥ ऐसीं दुःखें अनेक रीती ॥ तयांचा जाच सांगूं किती ॥ जैसीं जें जे पापें करिती ॥ तैसीं भोगवा तयातें ॥ ८३ ॥ कुंभीपाका माझारी ॥ नेवूनि टाकिती भीतरी ॥ नाना परीची नरकपुरी ॥ भोगवी एकसरीं जन्मवरी ॥ ८४ ॥ अपार पापें भोगवींसि तीं ॥ जन्मा घालोनि पुनरावृत्ती ॥ नाना प्रकारें रोगपीडिती ॥ दंड करिती भूपाळ ॥ ८५ ॥ अनेक जळचरां माजी जाती ॥ वृक्ष पाषाण नसे गणती ॥ पतंग पक्षी नाना याती ॥ मानव किती देह धारी ॥ ८६ ॥ जारज स्वेदज अंडज ॥ चवथी अनिवार उद्भिज ॥ एवं जन्मोनि भोगिती सहज ॥ नसे लाज कवणासीं ॥ ८७ ॥ ऐसि-या पापांतून होती मुक्त ॥ जे कां ईश्वराचे भक्त ॥ जे कां योगी ज्ञाते विरक्त ॥ नाहीं सक्त पंचविषयीं ॥ ८८ ॥ परी थोडें साधन सांगीतलें वरी ॥ जो कां यमुनास्नान तर्पण करी ॥ यम द्वितीये लागीं निर्धारीं ॥ तया नरकपुरी असेना ॥ ८९ ॥ ऐसे गेले बहुत दिन ॥ आज उद्यां परवां ह्मणून ॥ मग एके दिनीं यमुना येवोन ॥ बैसली अडोन यमसदनीं ॥ ९० ॥ भगिनी ह्मणे ऐकतां तासीं ॥ आजि यावें मम सदनासीं ॥ भोजन करोनी स्वस्थ मानसीं ॥ पावें सुखासीं बंधुवर्या ॥ ९१ ॥ त्या दिनी होती जाण ॥ कार्तिक शुक्ल द्वितीया पूर्ण ॥ ऐसा योग सहज येऊन ॥ यम

धर्म आपण निघाला ॥ ९२ ॥ आपण नजावें नरीं ॥ भगिनी नजाय निर्धारीं ॥ ऐसा विचार जाणोनि अंतरीं ॥ सोडुनी यमपुरी चालिला ॥ ९३ ॥ दूतांसि देउनी आज्ञेतें ॥ तुह्मीं नजावें मृत्युलोकातें ॥ आजि शासन प्राणियातें ॥ नघालीं नरकातें जिवासी ॥ ९४ ॥ आजि यमपुरीचा व्यापार ॥ सर्व बंद ठेवा कारभार ॥ आह्मीं आलियावरी विचार ॥ चालेल अपार शिक्षेचा ॥ ९५ ॥ मग अनुजांसहित कृतांत ॥ पातला कालिंदीसदनांत ॥ हर्ष झाला जो चित्तांत ॥ अत्यद्भुत न वर्णवे ॥ ९६ ॥ मग ती यमुना श्यामवर्ण ॥ अंगीं मौक्तिकांचें लेणें लेउन ॥ शुद्ध स्त्वाचें वस्त्र परिधान ॥ अंगीं लेपन सुगंधाचें ॥ ९७ ॥ जीचीं नेत्रकमलें पाहून ॥ कमळें लपालीं उदकीं जाउन ॥ हरिणी करिती अरण्य सेवन ॥ सोडिलें पान उदकाचें ॥ ९८ ॥ मृगजलातें पाहुनी धांवती ॥ आपुल्या प्राणातें मूकती ॥ परी यमुनाजीवनी नयेती ॥ ऐसी गती तयां झाली ॥ ९९ ॥ जीच्या चालीचा वेग भारी ॥ हंस पळाले मानससरोवरीं ॥ ते नयेती अद्यापवरी ॥ यमुना तीरीं पाहावया ॥ १०० ॥ जिच्या हातींचें कंकण ॥ पृथ्वीच्या मोलाचें जाण ॥ मुद्रिकीं अमूल्य लाल जडवून ॥ हिरे मधून शोभती ॥ १०१ ॥ भाळीं कुंकुम सुरेख ॥ कर्णभूषणाचा नकरवे लेख ॥ चरणांबुज अतिकोमल देख ॥ पाहतां सुख जया स्वरूपीं ॥ १०२ ॥ जिच्या हातींचा पाक ॥ भक्षूं इच्छिती इंद्रादि लोक ॥ तिणें षड्रस अन्नें सुरेख ॥ करूनि देख आली पुढें ॥ ३ ॥ नानाप्रकारचीं सुगंधिक ॥ तैलें आणिलीं सकळिक ॥ अंगीं लाउनी सुरेख ॥ अष्टगंधादि परिमळ बहूत ॥ मांगलिक घालूनि स्नान ॥ उत्तम आसनीं बसवून ॥ केशरउटी अंगीं लेपन ॥ टिळक लावूनि कस्तुरीचा ॥ ५ ॥ वस्त्रालंकार देऊनियां ॥ आरती ओंवाळी बंधुरायां ॥ सुवर्णताटीं वाढूनियां ॥ जवळीं समया उजळती ॥ ६ ॥ आतां भोजन करीं सावचित्त ॥ कांहीं नाणावें मनांत ॥ आजिचा दिन येथें स्वस्थ ॥ काढीं निवांत सुखाचा ॥ ७ ॥ दंड करितां तुह्मां फार ॥ श्रम झाले जी अनिवार ॥ प्राणी शिक्षेसी पात्र अनिवार ॥ क्षणभरी स्थिर नराहती ॥ ८ ॥ यमधर्म सारुनी भोजन ॥ झालें जयाचें संतोषी मन ॥ तांबूल करुनी सेवन ॥ अलंकार भूषण देत असे ॥ ९ ॥ नाना प्रकारें वस्त्रालंकार ॥ देऊनि तोषवी अनुजांतरा ॥ ह्मणे आतां मागें वर ॥ जो कांइ इच्छित असेल पैं ॥ ११० ॥ ऐसी ऐकतां

वचनोक्ती॥ भगिनीसीं आनंद झाला चित्तीं॥ प्रतिवर्षीं येई मजप्रती॥ यत्चतिथीभोजना ॥ ११ ॥ जेकोणी यमद्वितीयेसीं॥ भगिनी हस्तें करितीभोजनासीं॥ तयां आणोनी कुंभपाकासीं ॥ न घालीं निश्चयेसीं सर्वथा॥ १२॥ आज मम गृहीं येतां भोजनासीं॥ जे प्राणीअसतीनरक वासी ॥ तयांमुक्त करावेंनिश्चयेसीं॥ मागणें तुजसीं हेंच असे ॥ १३ ॥ ऐसें ऐकोनी श्रवणीं ॥ मगयमबोले कायवाणी॥ जोकोणी आजच्या दिनीं॥ धरूनिध्यानीं ऐसेंकरी॥ १४ ॥ तुझेंकरोनि स्नानपान॥ माझें करील जो तर्पण॥ आणि अनुजां हस्तें भोजन॥ तोमद्द्वारीं जाणनयेची ॥ १५ ॥ आणि एकसांगतों साधन॥ वीरेशदेवाचे ईशान्येस जाण॥ यमतीर्थ आहे तेथें जाऊन॥ करीलस्नान जोकोणी ॥ १६ ॥ तेथेंही करावें तर्पण॥ माध्यान्हीं सूर्य येतांजाण ॥ सन्मुखउभे राहूनि आपण॥ करावें पठण मंत्राचें ॥ १७ ॥ ॥ मंत्र॥ ॥ यमोनिहंता पितृधर्मराजो वैवस्वतोदंडधरश्चकालः॥ भूताधिपोदत्तकृतानुसारी कृतांतमेतद्दशभिर्जपंति॥ १८ ॥ ॥ ऐसा मंत्र जपेल कोण॥ जपकरील तयावरीजाण॥ संतोष होउनी माझें मन॥ नरकीं पतन नहोय तया॥ १९ ॥ जे प्राणी ऐसें नकरिती ॥ मजलागीं जेधिक्कारिती॥ तयालागीं दंड हातीं ॥ धरिलानिश्चिती ऐकेंतूं॥ २० ॥ यमुनेसीं सांगुनी ऐशारीती॥ निरोपमागुनी तीते प्रीती॥ मगआपुल्या नगराप्रती॥ आनंदचित्ते पावला॥ २१ ॥ तया दिवसापासून॥ यमद्वितीया म्हणतीजाण॥ हीं मनी धरोनी आठवण॥ चालासप्रमाण ऐशारिती ॥ २२ ॥ जेचारीवर्णा माझारी॥ चालती जेशास्त्राधारीं॥ त्यांच्यापुण्या नाहीं सरी॥ चुकेलदरी नरकवास॥ २३ ॥ आणी होईल संतती प्राप्त॥ संपत्तीच्यायोगें होईल तृप्त॥ चारी पुरुषार्थ होउनीआप्त॥ शरीरतप्त नोहे कदां ॥ २४ ॥ ऐसें व्रतराज बोलत॥ निश्चयधरोनीकरितां व्रत॥ तयानहोयनयातना प्राप्त॥ पुण्यअद्भुत होईलतया॥ १२५ ॥ ॥ ७ ॥

॥ इति यमद्वितीया कथा समाप्त ॥




## अथ संकष्टचतुर्थीकथा प्रारंभः ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी पंचवदना ॥ दावीं तव सुताच्या आनना ॥ पाहतां पुरती मनकामना ॥ भवबंधना तोडीतसे ॥ १ ॥ अंगीं चर्चित सिंदुर ॥ जो कां कृपेचा सागर ॥ भक्तजनांचें माहेर ॥ जो कां साचार दीनबंधू ॥ २ ॥ मूषकवाहनीं बसून ॥ हस्तीं त्रिशुळादि धारण ॥ करीत विघ्नांचें छेदन ॥ चरणीं वंदन तयाच्या ॥ ३ ॥ जो कां सद्गुरू चैतन्यघन ॥ देउनी ज्ञानाचें दर्पण ॥ प्रकाशविलें आत्मज्ञान ॥ केलें समाधान जीवीचें ॥ ४ ॥ तयांचे कां न धरावे चरण ॥ कैसीन घ्यावी आठवण ॥ जगन्नाथ भरला परिपूर्ण ॥ हरिलें भान जगताचें ॥ ५ ॥ तया-चरणीं माझा मस्तक ॥ जो कां त्रैलोक्याचा नायक ॥ जेथें तो एक मी एक ॥ पूज्य पूजक भाव नसे ॥ ६ ॥ जो यादवकुळीं जन्मोनि स्पष्ट ॥ गोकुळवासीजनाचे कष्ट ॥ हरोनि केले संतुष्ट ॥ संहारिले दुष्ट कंसादी ॥ ७ ॥ जेणें केलें कालीयमर्दन ॥ शुद्ध केलें यमुनाजीवन ॥ तया कृष्णचरणीं माझें नमन ॥ लागलें ध्यान मनोभावें ॥ ८ ॥ तया कृष्णाचें करितां स्मरण ॥ काळ जाय मनीं दडपोन ॥ क्षमा दया शांती येऊंन ॥ पावती समाधान तेणायीं ॥ ९ ॥ जैसा उदकावरी तरंग ॥ पाहतां पाहतां पावे भंग ॥ तैसा विघ्नाचा प्रसंग ॥ निर्विघ्न सांग करीतसे ॥ १० ॥ जैसी सागराची लहरी ॥ येत जात एकसरी ॥ तैसी संकटें नानापरी ॥ येतां निवारी गजव

दन॥ ११ ॥ तयागणपतीचें व्रत देख॥ आधीं तिथि निर्णय ऐक। जोकां हो य सुखदायक॥ चालती सकळिक जया रिती॥ १२॥ श्रावण कृष्णा माझ्या- रीं॥ तृतीयायुक्त चतुर्थी अवधारी॥ चंद्रव्यापिनी असेल जरी॥ तरीच करीं व्रतातें॥ १३॥ दोन्ही दिवस चंद्रव्यापिनी तिथी॥ असोनी पूर्वदिनीं करिती ॥ मातृविद्धा तयास ह्मणती॥ आहे शास्त्रमतें ऐसेंची॥ १४॥ दुसरे दिनी पं चमी युक्त॥ चंद्रव्यापिनीच चतुर्थी होत॥ तरीते न करावी निश्चित॥ ऐसें शास्त्रां त सांगितलें॥ १५॥ तयादिनीं काय करावें॥ पुढें सांगती स्कंद भावें॥ तें श्रोत जनीं ऐकावें॥ व्रत आचरावें तयापरी॥ १६॥ ऋषी अवघे मिळोन॥ प्रश्न करि ती स्कंदालागुन॥ दरिद्र शोक कष्टनाशन॥ वैरीजन छळिताती॥ १७॥ वि- द्या कांहीं नसे जयासीं॥ पुत्र न होय स्त्रियांसीं॥ ऐशा दुःखें पीडा जनासीं॥ दूर कैसी होय सांग॥ १८॥ ऐसा ऋषीचा ऐकोनि प्रश्न॥ स्कंद पावला समाधान॥ जनकल्याण व्हावयालागून॥ तयासिं वचन बोलतसे॥ १९॥ सुखप्रासी व्हा वी सकळिकां॥ ऐसा उपाय सांगतों ऐका॥ संकष्टीव्रतें गणनायका॥ भजतां होय निर्विघ्न॥ २०॥ यथाविधी नया व्रतासीं॥ आचरितां भक्तभावें तयासी॥ सकळ मनोरथ निश्चयेंसीं॥ पूर्ण होतील तत्काळिक॥ २१॥ हें व्रत पूर्वी श्रीकृ- ष्ण सांगत॥ संकटापासोनि व्हावया मुक्त॥ गांजिला जोकां पंडुसुत॥ त या अद्भुत निवेदिलें॥ २२॥ पांडवासीं द्यूतीं जिंकुनी॥ कौरवीं घाडिलें कान नीं॥ ते दुःख नसाहे ह्मणोनी॥ सांगे कानीं धर्माच्या॥ २३॥ धर्मभीमअर्जु न नकुल॥ सहदेव द्रौपदी मिळोनि सकळ॥ व्रत चालविलें अचळ॥ जेणें त- ळमळ दूर होय॥ २४॥ द्वादशवर्षें अरण्यवास॥ पुढें एकवर्ष अज्ञातवास॥ ते थील हरावें संकटास॥ पुन्हा विपिनास नयावें॥ २५॥ हा हेतु धरोनी मनी॥ क रिते झाले व्रतालागुनी॥ श्रावणमास चतुर्थी दिनी॥ आरंभ करोनी चालवि लें॥ २६॥ तया व्रतें करोनियां जाण॥ त्रयोदश अब्द पूर्ण नसोन॥ पुनरपी अर- ण्यसेवन॥ गजाननें जाण दूर केलें॥ २७॥ ऐसा व्रताचा महिमा जाण॥ कृ- ष्णें सांगीतला कोठून॥ तें करावें निवेदन॥ करविणें श्रवण आह्मांआधीं॥ २८॥ मग ऋषींचा प्रश्न ऐकून॥ स्कंद सांगती तया लागुन॥ पार्वतीस हेरंब आपण

कायकारणसांगतसे॥ २९॥ कृतयुगीं हिमनगबाळा॥ टाकोनि निघाला-शिवभोळा॥ वियोगजन्यदुःखज्वाळा॥ जाळील कळिकाळा वाटतसे॥३०॥ पार्वती झाली उदास॥ सोडिला सर्व विलास॥ दृढ धरिले वैराग्यास॥ लिहिले भाळीं न कायहें॥ ३१॥ पतीनें कां केला कोप॥ काय अन्यजन्मीचें पाप॥ उभें राहिलें आपेंआप॥ मज मायबाप कोण तारी॥ ३२॥ कायमीं चुकल्येंपतिव्रताधर्म॥ किंवा कांहीं कादिलें वर्म॥ किंवा चुकल्यें स्वधर्म॥ अवधाअधर्म चालविला॥ ३३॥ वचनाचा केला अनादर॥ ब्राह्मणा छळिलें निर्धार॥ घडला होता अनाचार॥ ह्मणोन मजवर कोप केला॥ ३४॥ कायभक्तां लागीं छळिलें॥ काय नूजे तें विध्वंसिलें॥ कायगंगेतें निंदिलें॥ नंदीसी ताडिलें दंडानें॥ ३५॥ सुखानें येरामनाम॥ अंगीं धडाडला काम॥ ईश्वरीं नाहीं ठेविलें प्रेम॥ ह्मणोनि सुखधाम हरपलें॥ ३६॥ नाहीं केली देवपूजा॥ उच्छेदिलें देवद्विजां॥ तेणें मनोभंग झा-ला माझा॥ होउनी इजा पावल्यें॥ ३७॥ कायविधूची केली निंदा॥ पन्नगासी भोगविली आपदा॥ चिताभस्मलेपन अंगीं सदा॥ हंसल्यें कदां तयासीं॥ ३८॥ स्मशानीं असे सदा वास॥ वस्त्र न मिळे ढुंगणास॥ जाळूनि टाकिला मदनास॥ धरिलें वैराग्यास ह्मणउनी॥ ३९॥ श्वशुरगृहासीं वास केला॥ तेव्हां मायबाप बोलिला॥ ह्मणोनी चित्तीं क्रोध आला॥ जाउनी लपाला कपाटीं॥ ४०॥ ऐसें वदोनी वारंवार॥ नेत्रींचा हे दुःखनीर॥ अंतरामाजी नाहिं के धीर॥ नसुचे व्यवहार करावया॥ ४१॥ आतां सेवावें अरण्य॥ किंवा करावें देहपतन॥ किंवा तपालागीं जाउन॥ घालुनि आसन बैसावें॥ ४२॥ पवन आणि चंदन॥ झोंबे अंगीं अग्नीसमान॥ विधुतापची देहालागुन॥ चंडकीरण माध्यान्हींचा॥ ४३॥ वाटे मजला वैरी वसंत॥ सुमनसुवास उग्र भासत॥ कोकिळास्वर कर्णीं झोंबत॥ कर्कशा काकवत दुःखदेती॥ ४४॥ अग्नीमाजी होमावा काय॥ कोठें पाहूं पतीराय॥ काय घडला न कळे अन्याय॥ कोण उपाय करावा॥ ४५॥ धरणीवरी अंग टाकी॥ कोण युक्ती सांगेल सखी॥ कैसी धुंडूं चतुर्दशलोकीं॥ हंसतील कीं मजलागीं॥ ४६॥ ऐसी वियोगदुःखें करून॥ पोळली अंतःकरणीं जाण॥ वैराग्यसंपन्न तपालागुन॥ गेली कानन सेवावया॥ ४७॥ वल्कलें करूनि धारण॥ मांथां जटा गुंडाळुन॥

कुंकुममळवटभरून॥ घालुन आसन बैसली॥ ४८ ॥ कांहीं दिवस वायू भक्षण॥ कांहीं दिवस फळें सेवन॥ कांहीं दिवस पर्णें जाण॥ रस सेवन दुर्वांचा॥ ४९ ॥ कांहीं दिवस धूम्रपान॥ कांहीं दिवस कंदमूल भक्षण॥ कांहीं दिवस निराहार राहून॥ कांहीं चसेवन करीना॥ ५० ॥ कांहीं काळ उर्ध्वबाहू करून॥ कांहीं दिवस पंचाग्निसाधन॥ कांहीं दिवस उदकपान॥ नाहीं शयन बहुकाळ॥ ५१॥ ब्रह्मांडीं प्राण नेऊन॥ केलें हठयोगाचें साधन॥ आकर्षण करूनि मन॥ इंद्रियदमन बहुकाळ॥ ५२॥ राजयोगसाधनीं॥ निमग्न राहे निशिदिनीं॥ राममंत्रें करोनी॥ काळ वनीं काढिला॥ ५३॥ अष्टांगयोगाच्या साधनीं॥ देह झिजविला तपें करूनी॥ परी प्राणेश्वरालागूनी॥ दयामनीं नयेची॥ ५४॥ जो भक्तीचा भुकेला॥ भावें करोनी बांधला गेला॥ तो हि मनगजेलागीं दुरावला॥ म्हणोनि झाला खेदचित्तीं॥ ५५॥ आतां काय करावा उपाय॥ कैसा भेटेल पतीराय॥ चिंता करोनी झिजवी काय॥ झालीतन्मयवृत्तीती॥ ५६॥ तपें करोनी देह तापला॥ तीन्हीं लोकीं कंप सुटला॥ इंद्र मनामाजी दचकला॥ काय वर्तला अनर्थ॥ ५७॥ ऐसें तीव्रत पत्नीनें केलें॥ नाहीं कोठें आयकिलें॥ शंकरें दर्शन नाहीं दिलें॥ तरी खचिलें वाटे ब्रह्मांड॥ ५८॥ तों पाहिला नारद मुनी॥ पुसती झाली तयालागुनी॥ पूजन केलें स्वस्थमनीं॥ लागली चरणीं तयाच्या॥ ५९॥ इतुकीयामाजी देवऋषी॥ पुसता झाला पार्वतीसीं॥ तुझी दशा कां गे ऐसी॥ आली विपिनासीं कायकाजें॥ ६०॥ शरीर झालें जर्जर॥ सेविलें कानन कां कठोर॥ पंचवदनाचा पडिला विचार॥ सांगे उत्तर लवलाहीं॥ ६१॥ मग बोले शैलबाळा॥ मीं कांहीं अपराध न केला॥ परी पतीचा वियोग झाला॥ उपाय मजला सांगे आतां॥ ६२॥ दरिद्र्यासि लाभतां चिंतामणी॥ मग हर्ष न माय गगनीं॥ तैसें झालें माझे मनीं॥ तुज नयनीं देखतांची॥ ६३॥ बहुसाल सेविलें कानन॥ तप केलें अनुदीन॥ परी मजला स्वामी अजून॥ भेटूनि नयन निववीना॥ ६४॥ आतां यत्न काय करूं॥ मज सांगा जी निर्धारू॥ कोण्या कर्में परात्परू॥ होईल साचा रूमा तमजा॥ ६५॥ ऐसें बोलतां जगज्जननी॥ सुचला विचार एकमनीं॥

ह्मणेगणपतीच्याव्रतें करूनी ॥ पावेलसदनीं शंकर ॥ ६६ ॥ ऐसें बोलतां देवर्षी ॥ जगन्मातांह्मणेसांगमजसीं ॥ तो बोले मुनीतयेसी ॥ गजाननासीं पुजावें ॥ ६७ ॥ मगकरूनिगणपतिस्तवन॥ आणिलेंमनामाजीध्यान॥ चतुर्भुजगौरवर्ण॥ केलें चिंतन तश्चें ॥ ६८ ॥ विशाळदोंदाचीशोभा॥ स्मरतांसंकट्य सरसा उभा ॥ मांड्या कर्दळीचागाभा ॥ नयनशोभापद्मापरी ॥ ६९ ॥ माथां शेंदुर शोभत ॥ रत्नजडित मुगुट झळकत ॥ पायीं घागरियावाजत ॥ येतनाचत झडकरी ॥ ७० ॥ मगदेउनी आलिंगन ॥ संतोषविलें तयाचें मन ॥ कांमाते सेविलें कानन ॥ संकटकवण पडियेलें ॥ ७१ ॥ ह्मणेमातेकायकाजा ॥ कवणें गांजिला देह तुझा ॥ कां केलासी धांवा माझा ॥ सांगेहितगुजामजपासीं ॥ ७२ ॥ ऐसें ऐकोनीवचनातें ॥ सांगेसती तयातें ॥ पतीनें त्यागिलें मातें ॥ सेविलें विपिनातें तयालागीं ॥ ७३ ॥ बहुत केलें तपाचरण ॥ नसरे माझें पाप अजून॥ वियोगदुःखसरून ॥ सुखसंपादन न होय॥ ॥ ७४ ॥ भेटी नहोयमाझी ॥ ह्मणोनि आस केली तुझी ॥ आतां प्राणपती होयराजी ॥ ऐसें आजीव्रतसांगे॥ ७५ ॥ माझें व्रतसंपादन ॥ करितांसंकटजायनिरसुन॥ पूर्वीसांगीतलें तिथिप्रमाण॥ मासपक्षजाणसत्यतोंची ॥ ७६ ॥ तयादिनींव्रतारंभ॥ करितांभेटेल तुजसांब॥ पूजाविधान हेरंब ॥ करी अंबे संतोषें ॥ ७७॥ प्रातःकाळीं दंतधावन॥ मगकरूनि माझें स्मरण॥ संकल्पें मातें प्रार्थून ॥ व्रतस्थ जाण असावें ॥ ७८ ॥ आजिचंद्रोदयपर्यंत॥ मीराहोनी उपोषित॥ पूजन करीनएकचित्त॥ भोजनीं रत होई पुढें ॥ ७९ ॥ ऐसी प्रार्थनाकरून॥ आंगासीं नीळकाळेंलावून ॥ स्नाननित्यनेमसारुन॥ उपोषित जाणराहें मग ॥ ८० ॥ मोदक करावे एकविंशति ॥ पांच अर्पावे देवाप्रती॥ पांचाचें वायन ब्राह्मणा हातीं ॥ सेवीं निश्चितीं शेष आपण ॥ ८१ ॥ धातुपाषाणमृत्तिकाजाण॥ तयाची प्रतिमा करून ॥ गणपतीनामें तयाचें स्थापन॥ करील पावनसकळांतें ॥ ८२ ॥ मग करावें आवाहन ॥ मनीं आणोनी करावें ध्यान॥ षोडशोपचार पूजन॥ सांगसंपादन करावें ॥ ८३ ॥ अथर्वशीर्षाचे पाठ॥ एकविंशती करावे नीट ॥ अक्षरवटिका करोनी स्पष्ट॥ करावा संतुष्ट गजानन ॥ ८४ ॥ वस्त्र उपवस्त्रादिसकळ ॥ चंदनसिंदूर परिमळ ॥ रुई मांदार पुष्पें सकळ ॥ दुर्वा कोमळ अर्पाव्या ॥ ८५ ॥ मजदुर्वांचीअ-

तिप्रीती ॥ सहस्रनामअर्पावें एकचित्तीं ॥ जयाची असेल शुद्ध मती ॥ तो-चीभक्ती करील ऐशी ॥ ८६ ॥ धूपदीप नैवेद्यजाण ॥ मोदकादीकरूनीपक्का न्नां ॥ समर्पूनउत्तरापोशन ॥ करूनिअर्पणतांबूल ॥ ८७ ॥ मगठेवीदक्षिणांफळ ॥ प्रदक्षिणा मंत्रपुष्पसकळ ॥ चरणीं ठेवी शिरकमळ ॥ भावें केवळ मार्थावें ॥ ८८ ॥ चंद्रोदय झालियावरी ॥ मगवधूची पूजा करीं ॥ अर्घ्यदेउनी त्रिवारीं ॥ प्रार्थनाकरीं विधूची ॥ ८९ ॥ मगपंचमोदकवायन ॥ द्यावें ब्राह्मणा लागून ॥ दक्षिणातांबूल समर्पून ॥ करावें वंदन द्विजातें ॥ ९० ॥ करूनिब्राह्मणसंतर्पण ॥ पात्रीबैसावें आपण ॥ ऐसें सांगोनी विधान ॥ गेलागजाननस्वस्थाना ॥ ९१ ॥ विनायकें सांगीतलें मातेसीं ॥ कृष्णें विदित केलें पांडवांसीं ॥ स्कंदें सांगीतलें ऋषीश्वरासीं ॥ पावतीकल्याणासीं सकळिक ॥ ९२ ॥ पार्वतीनें केलें व्रतासीं ॥ मनीधरोनीनिश्चयासीं ॥ करितां पावली पतीसीं ॥ स्कंदऋषीसीं सांगतसे ॥ ९३ ॥ पाहतां नयनीं पंचवदन ॥ चरणीं लागली जाऊन ॥ शिवें गिरिजा उचलोन ॥ वामांकीं बसवूनतोषविली ॥ ९४ ॥ ऐसें व्रताचें महिमान ॥ जाणती पंडुनंदन ॥ स्वयें हिमनगजाआपण ॥ पावली समाधान पतिसंगें ॥ ९५ ॥ हें व्रत जे कोणी करिती ॥ दरिद्रशोक तयांचे जाती ॥ केले कष्ट फळ देती ॥ वैरीसोडिती वैरभाव ॥ ९६ ॥ विद्याभ्यास होईल जाणा ॥ पूर्ण होईल मनकामना ॥ निपुत्रिक पावेल संताना ॥ पीडितजनासुख होय ॥ ९७ ॥ धनधान्यवृद्धी अमूप ॥ हरपोन जाईल पाप ताप ॥ करितां नाममंत्राचा जप ॥ आपेंआप मोक्षलाधेल ॥ ९८ ॥ जयाचा शास्त्रावरी विश्वास ॥ तोचि होईल निर्दोष ॥ शांतीदयेनें भरेलें मानस ॥ क्षमाहृदयास उपजेल ॥ ९९ ॥ असो-आतां हापाल्हाळ ॥ अंगीं असावें भक्तिबळ ॥ कृपाकरील गिरिजाबाळ ॥ श्रोतीं सकळ ऐकावें ॥ १०० ॥ ॥ इतिप्राकृत संकष्टचतुर्थी कथासमाप्त ॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री सकल विघ्न हरणगजाननार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥



## अथ ज्येष्ठागौरी व्रतकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ भालचंद्रातुजलागुन ॥ असोचरणांबुजीं नमन ॥ शारदा
जीवींचें जीवन ॥ करींसमाधानआमुचें ॥ १ ॥ आदिमाया आदिशक्ती ॥ तुझें ध्यान
तुझीभक्ती ॥ तुझ्यायोगें चारीमुक्ती ॥ तूंच जगतीं व्यापक ॥ २ ॥ तुझ्यानियोगें
सृष्टीक्रम ॥ तुझ्यायोगें क्रोधकाम ॥ तुझ्यायोगें प्रपंचधाम ॥ जिवाविश्रामयो
गतुझा ॥ ३ ॥ तुझ्यायोगें वेदश्रुती ॥ तुझ्यायोगें नानाव्युत्पत्ति ॥ तुझ्यायोगें म
नासी भ्रांती ॥ पावती शांतीयोगें तुझ्या ॥ ४ ॥ ऐसी तुझी लीला अगाध ॥ शो
धूं जातां न लागे शोध ॥ तुझ्या संगती स्वरूपबोध ॥ होय प्रसिद्ध योग तुझा ॥ ५ ॥
त्वत्प्रसादें करून ॥ वाणी करील जें वर्णन ॥ तें आवडी ऐकोत जन ॥ येई नमन
तूं माझें ॥ ६ ॥ कथा ऐका अद्भुत एक ॥ संतोष पावती सकळिक ॥ जें कां व्रतसं-
तान दायक ॥ श्रोते सकळिक ऐकातें ॥ ७ ॥ ज्येष्ठागौरीचें व्रत ॥ सांगतों ऐकें
स्वचित ॥ अनुराधानक्षत्र च यांत ॥ करणें यांत सर्वही ॥ ८ ॥ आवाहन आणि पू
जन ॥ तिसरे नक्षत्रीं विसर्जन ॥ तयाचरणी लावुनी मन ॥ तें विधान सांगें पु
ढती ॥ ९ ॥ भाद्रपद मासीं अवधारीं ॥ शुक्लपक्षामाजी करीं ॥ त्रिदिनात्मक-
व्रत आचरीं ॥ ब्रह्मचर्य निर्धारीं व्रतस्थ ॥ १० ॥ विघ्नहर्ता गजानन ॥ त्याची माता-
गौरीजाण ॥ तिचामहिमा करीं श्रवण ॥ शास्त्रप्रमाण वदतसें ॥ ११ ॥ वापीकू

पतडागजलपूरित ॥ गंगानाले पाट वाहात॥ तेथें आवें वाद्य घोष सहित॥
घेऊनि पात्रांत आणावया ॥ १२ ॥ तया उदकापासुनी पांच खडे ॥ निवडूनि आ
णावे रोकडे ॥ पाठीन पाहतां सदनाकडे॥ येतां सांकडें दूर होय ॥ १३ ॥ सायं-
काळीं असतां अनुराधा ॥ तयादिनीं आणोनी आराधा ॥ हा आपुल्या स्वहिता
चा धंदा ॥ जाईल आपदा दुःखाची॥ १४ ॥ पांच देवी जला सहित॥ मंगल
वाद्यें वाजवीत ॥ आणितां आपुल्या स्वगृहांत ॥ राहे निवांत द्वारामाजी ॥१५॥
मग सुवासिनी घेऊनि आरती॥ ओंवाळावी तयांप्रती ॥ दुग्धपाणी पायां वरुती
॥ घालुनी मागुती पुसावें॥ १६ ॥ पाउलें हरिद्रेचीं काढुन ॥ तयासीं गृहीं फिरवुन॥
पुसावें तया लागुन ॥ सांगेजनरुढी ऐसी ॥ १७ ॥ देवी असती जिच्या हातीं ॥
तीतें दीप घेऊन पुसती ॥ येथें काय आहे सांग म्हणती॥ ती बोलत उदंड असे
॥ १८ ॥ मग आणोनी स्वस्थानीं ॥ गोमयें भूमी मार्जनें करूनी ॥ देवता स्थापन
तयें स्थानीं ॥ राहावें शयनीं व्रतस्थ ॥ १९ ॥ हा सायंकाळींचा विधी झाला ॥ दु
सरे दिनीं पूजनाला ॥ सांगेन पुढती या विधीला ॥ सादर श्रवणाला असावें ॥२०
॥ आतां दुसरीया प्रकारीं ॥ सांगीतलें जें ग्रंथांतरीं ॥ सुवर्ण ताम्र प्रतिमा करीं॥
अथवा साजिरी रौप्याची ॥ २१ ॥ असें न होय तरी ऐका ॥ भिंतीवरी चित्ररेखा ॥ का
गदीं काढोनी सुरेखा॥ न होय परखा देवीसीं ॥ २२ ॥ इतुकें ही जरी पडे कठिण
॥ तरी करावें पुस्तक पूजन ॥ परी गौरीतें आराधुन ॥ सुप्रसन्न तीतें करावें ॥२३॥
धर्मराज प्रश्न करित॥ श्रीकृष्ण कथा सांगत॥ ती ऐकावी सावचित्त॥ भावीक
भक्त सकळजन ॥ २४ ॥ जया स्त्रियांसीं बालकें होत ॥ परी एकही न राहे जित॥
जिचा गर्भस्राव होत ॥ संतती विरहित जी असे॥ २५ ॥ पिशाच्च योगें संतती॥
जया स्त्रियांची नष्ट होती॥ जे पुरुष दरिद्री असती ॥ कैसे पावती संपत्तीतें ॥
२६ ॥ ऐसें पुसत पंडुनंदन ॥ सांगे माधव तया लागुन ॥ करावें गौरीचें पूजन॥
ध्यान धारणा धरोनियां ॥ २७॥ बोलाउनी ब्राह्मणासी॥ आसनीं बैसवावें पू-
जनासीं ॥ ज्येष्ठा असती जया दिवशीं ॥ आणोनि मानसीं ध्यान ऐसें ॥ २८ ॥
कोमल कांती ही सुंदर॥ चतुर्भुज मनोहर॥ हस्तीं आयुधांचा भार॥ खड्ग तोम
र त्रिशुळादि ॥ २९॥ पाहतां मुखकमळ सुरेख॥ चंद्रासी लाविला कलंक॥ म

णतीचंद्रवदना त्रिलोक ॥ नासिक सुरेख राव्यांपरी ॥ ३० ॥ नयनजिचेवि शाळ ॥ तथापरीशोभेभाळ ॥ भ्रुकुटी धनुष्यचि केवळ ॥ कुंकुम सुढाळरे खिलें ॥ ३१ ॥ जिचीपाहतांकटी ॥ सिंहलपाले गिरिकपाटीं ॥ अतिसुरेख हनुवटी ॥ पोवळीं ओठीं ओतिलीं ॥ ३२ ॥ कर्णी कर्णफुलें झळकती ॥ कुंडलांची अगम्यदीप्ती ॥ मुकुटींजडित हिरेपंक्ती ॥ पाचूशोभतीमाणिकें ॥ ३३ ॥ शब्दयेतांमुखांतुन ॥ द्विजतेजें प्रकाशेगगन ॥ काजळेंविराजतीनयन ॥ पाहतांदेहभानहरपलें ॥ ३४ ॥ हस्तीं कंकणें जडित ॥ नूपुरेंपायीं गर्जत ॥ मुक्ताफळहारशोभत ॥ अळंकारअगणित सर्वांगीं ॥ ३५ ॥ सुरंगवस्त्रझळकत ॥ सौदामिनीआकाशींतळपत ॥ मौक्तिकें नासिकीशोभत ॥ तेजअद्भुतन वर्णवे ॥ ३६ ॥ जीच्यास्वरूपावरून ॥ आदित्यटाकावा ओंवाळुन ॥ जीच्यापुढें रती लाजून ॥ जायपळोन दिगंतरीं ॥ ३७ ॥ ऐसेंध्यान धरूनिमनी ॥ तद्भावें देवतास्थापुनी ॥ पूजनकरावें सकळजनीं ॥ निष्ठाधरोनीस्वधर्मी ॥ ३८ ॥ षोडशोपचारें करूनि पूजन ॥ वस्त्रालंकारअक्षताजाण ॥ कुंकुम हरिद्रादिसौभाग्यवायन ॥ गंधपुष्पार्पणकरावें ॥ ३९ ॥ धूपदीपनैवेद्यसकळ ॥ तांबूल दक्षिणा ठेवीं फळ ॥ प्रदक्षिणानमनसकळ ॥ प्रार्थना बिल्वदळअर्पावें ॥ ४० ॥ ॥प्रार्थनामंत्रः॥ ॥एह्येहित्वंमहाभागेसुरासुरनमस्कृते ॥ ज्येष्ठासिसर्वदेवानांमत्समीपंगताभव ॥ १ ॥ ॥इतिमंत्रः ॥ ऐशामंत्रेंप्रार्थना करून ॥ मगकरावेंगुरुपूजन ॥ वस्त्रालंकारदेउन ॥ तृप्तमनकरावें ॥ ४१ ॥ तैसाआपुलातत्कहान ॥ ऐशापुज्याकरूनिसमस्त ॥ वायनमहानैवेद्यसमवेत ॥ अर्पितांतृप्तदेवीहोय ॥ ॥ ४२ ॥ अपूपवायनब्राह्मणासीं ॥ अर्पावेंतांबूलदक्षिणेसीं ॥ पुढेंआरती देवीसीं ॥ करावी केशी ऐकाते ॥ ४३ ॥ दीपकरावेपुरणाचे ॥ अथवागोधूमपिष्टाचे ॥ ओंवाळुनी गुरूचे ॥ हस्तींआरतीचेदीपद्यावे ॥ ४४ ॥ मगगुरुपासोनीपरतोन ॥ घेऊनिभक्षावे आपण ॥ नैवेद्यासहितजाण ॥ स्वयेंआपणअभिलासीं ॥ ४५ ॥ परीआधीं सुवासि ब्राह्मणासीं ॥ भोजनघालुनीतयासीं ॥ घेऊनी पुरोहितआज्ञेसीं ॥ पंचप्राणासीं तृप्तकरीं ॥ ४६ ॥ रात्रौकरावेंजागरण ॥ गीतवाद्यकथाश्रवण ॥ ब्रह्मचर्यव्रतेंजाण ॥ निराहार आपणअसावें ॥ ४७ ॥ मग तिसऱ्यादिनी देवीस ॥ करूनिउ

त्तरपूजनास ॥ बोळवावीमाध्यान्हीस ॥ सायंकाळासपोंचवी ॥ ४८ ॥ गौरी-सीबोळवितांजाण ॥ दधिभातनैवेद्यालागुन ॥ अर्पितांदेवीतृप्तआपण ॥ होऊनी वरदानदेतअसे ॥ ४९ ॥ अथवागजाननासमवेत ॥ गौरीसघेऊनजात ॥ ऐसीरूढी जगांत ॥ परंपरागतचाललीसे ॥ ५० ॥ हेंव्रत आपुल्या कुळांत ॥ चालवावेंसदोदित ॥ नातरीबाराअब्दपर्यंत ॥ करितांदुरितनिरसेल ॥ ५१ ॥ ऐसेंव्रतज्याकोणीकरिती ॥ त्यांचीवाढेलसंतती ॥ दरिद्रीतेसधनहोती ॥ ऐकचित्तींकुंतीसुता ॥ ५२ ॥ मुलेंहोवोनीहोतमृत ॥ अथवागर्भस्रावहोत ॥ किंवाकाकवंध्याराहात ॥ तितुक्यापावतीसंततीतें ॥ ५३ ॥ पिशाच्चादिसर्वयोग ॥ तितुकेदूरहोतीभोग ॥ करितांपूजायथासांग ॥ दारिद्र्यभंगहोतसे ॥ ५४ ॥ ऐसेंचक्रपाणीसांगती ॥ दरिद्रीजनींनराहती ॥ स्त्रियावांझपाहातांक्षिती ॥ कोठेंदृष्टीदिसतीना ॥ ५५ ॥ धर्मह्मणेदेवराया ॥ येवोनितुजजगाचीदया ॥ सांगीतलेंव्रतउत्तमसखया ॥ करितीस्त्रियाअत्यादरें ॥ ५६ ॥ तुजऐसादयाभूत ॥ कोणआहेजगांत ॥ तुजलाह्मणतीत्रैलोक्यनाथ ॥ नामयथार्थतुजसाजे ॥ ५७ ॥ जैसेंउदकींटाकावें लवण ॥ येकायेकींजायविरोन ॥ तैसींसर्वविघ्नेंनासुन ॥ देवीआराधनकेल्यानें ॥ ५८ ॥ ऐसेंव्रताचेंमहिमान ॥ धर्मपावलासमाधान ॥ तैसेजेकांऐकतीजन ॥ त्यांचेंमन उल्हासे ॥ ५९ ॥ याव्रतींजयाचाभाव ॥ तयासीदूरनाहींदेव ॥ हासंततीचाउपाव ॥ मिळेठावमुक्तीचा ॥ ६० ॥ ॥ इतिज्येष्ठागौरीव्रतकथासमाप्त ॥ शुभंभवतु ॥



# अथमुक्तापाडवाकथाप्रारंभः

श्रींगणेशायनमः॥ ॥ ॐ नमोजीएकदंता॥ तूंचिविद्यासुखदाता॥ सकलवि घ्नेंनिवारिता॥ ग्रंथवदविता तूंचिएक॥ १॥ तूंसुखाचें सुखसागर॥ भक्तजनाचें माहेर॥ तूंचिअससीसद्विचार॥ तूंचि परात्परगजवदन॥ २॥ तुझ्या अंगींचौसष्टकळा॥ तूंचिदेसीगासकळां॥ तूंचि जिव्हींचा जिव्हाळा॥ अवघी लीळा तुझी असे॥ ३॥ तूंचिसगुणानिर्गुणहोसी॥ क्षमादयाशांतीदेसी॥ तुझ्यायोगेंहर्षमानसीं॥ तूंचिशक्तिशीं निर्मिता॥ ४॥ तूंचिइंद्रियांचा चाळक॥ तूंचिबुद्धिसीव्यापक॥ तूंचिजेकां परब्रह्मसुख॥ अविनाशएक तूंचिपैं॥ ५॥ तूंआद्यनाअनाद्य॥ तूंचिअससीस्वसंवेद्य॥ कांहींनसेस्तुत्यनिंद्य॥ सकलवंद्य तूंचिसदा॥ ६॥ तूंचिनिर्द्वंद्व अससी॥ भेदाभेदनसेतुजसीं॥ तुजनाहीं दिननिशी॥ परात्परअससी तूं एक॥ ७॥ सर्वसुखाचेंआगर॥ तूंचिअससी निर्विकार विश्वसाक्षीविश्वंभर॥ सकलाधारतूंचिएक॥ ८॥ तुझ्यायोगेंसृष्टीक्रम॥ तुझ्यायोगेंसाराश्रम॥ जननमरणाचाबारेश्रम॥ सकळविश्रामयोगतुझा॥ ९॥ तुझ्या आदिमायेनें बक॥ ब्रह्मांडें रचिलीं विशाळ॥ दिननिशीपाठीसींतकमळ॥ प्रपंचरवळलाविला॥ १०॥ आशातृष्णागांजिती॥ कामक्रोधपीडादेती॥ लोभमदमत्सरघातकरिती॥ दंभरीतीअगाधू॥ ११॥ प्रीतीमगरीनेंवेढिलें॥ ममतारांडेनें बुडविलें॥ मींमाझेंघातकपहिलें॥ नाहीउमजलें कवणासीं॥ १२॥ सांपडलोंजिवाच्या हातीं॥ नातुडेस्वस्वरूपींमती॥ पापपुण्याचीभीतीचित्तीं॥ मायादुर्गतीपावदी॥ १३॥ ऐसीमाया तुझी कठीण॥ परीतियेसीं जेकां शरण॥ तयांचीमायहोय आपण॥ करीसोडवणसंसारू॥ १४॥ जेथील तेथें नेऊनिघाली॥ आपणरूपाळूपणें वेगळी॥ जैसेंकमलपत्रअसोनिजळीं॥ करितांवेगळींनीरनसे॥ १५॥ तयाआदिमायेसिनमन॥ करितां हरपे जन्ममरण॥ सद्गुरूसांगतीतयाचीखुण॥ मुमुक्षु पूर्ण तयासीं॥ १६॥ जयासीं मोक्षाची इच्छाअसे॥ तोचीसद्गुरुचरणींवसे॥ तयामायेचेंनाहीं पिसें॥ स्वरूपभासेसर्वथाही॥ १७॥ ऐसी जीकां गुरुमूर्ती॥ उपमानसे त्रिजगतीं॥ जैसीआकाशाची

व्यासी॥ तेसीप्रतीती तयाची॥ १८ ॥ तया माझा नमस्कार॥ सर्व सुखाचा सागर॥ आनंदलहरी अनिवार॥ नसे पार तयाचा॥ १९ ॥ ऐसा जो कां अपार ॥ सर्व सुखाचें सुखसागर॥ उपमेसी न तुळे क्षीर सागर॥ अमृत सरी करी चिना ॥ २० ॥ आतां एक व्रत ऐक॥ जेणें सकळिकां होय सुख॥ अंतीं पावली शिवलोक॥ चित्तीं विवेक वसतसे॥ २१ ॥ अति दुःखावांचूनि जाण॥ विवेक न हो य चित्ता लागुन॥ सुखामाजी देहभान॥ नाहीं आठवण हराची॥ २२ ॥ त्याचा प्रत्यय पाहीं॥ राज्यादि असतां सर्वही॥ ईश्वराचें विस्मरण देहीं ॥ विवेक नाहीं तिळमात्र॥ २३ ॥ ऐसा कथा पुढती ॥ राज्यादि गेली सर्व संपत्ती॥ मग विवेक होऊनि चित्तीं ॥ भोगिली विपत्ती केंकाळ॥ २४ ॥ नंदिकेश्वर पूसत॥ स्कंद त यासीं सांगत॥ जें कां शंकरासीं प्रियव्रत॥ ऐसें कथित परियेसा॥ २५॥ जेणें शंकर होय प्रसन्न॥ जया योगें उल्हासे मन॥ भव गोष्पदवत होउन॥ सहज पावेल पैलथडी॥ २६॥ ऐसें नंदिकेश्वरें दीनवदन॥ स्कंदाप्रती पुसे वचन॥ च रणीं मस्तक ठेउन ॥ शरण होऊन प्रार्थीतसे॥ २७॥ स्कंदें पाउनी भावार्थ॥ नं- दिकेश्वर यथार्थ॥ अंतरीं अति झाला आर्त॥ सांगतां व्यर्थ न जाय हें ॥ २८ ॥ जे आजपर्यंत कवणा लागीं॥ म्या सांगीतलें नाहीं जगीं ॥ तें कथन करितों तुज वे गीं॥ जेणें भोगीं सर्व सुख॥ २९॥ जें महा दुर्लभ व्रत॥ केलें असतां त्रिताप जा त॥ पापापासुन होय मुक्त ॥ शिवभक्त थोर तो॥ ३० ॥ शाकल्य नामक नगर॥ त्याच्या ठायीं विप्र सुंदर॥ षट्कर्माच्या ठायीं सादर ॥ दरिद्रें अपार गांजिला॥ ३१ ॥ दरिद्यांमाजी शिरोमणी॥ सुदाम्या ऐशी नाहीं कोणी॥ परी सोमश र्मा तयाहुनी॥ भासे जनीं अति दुःखी॥ ३२ ॥ ऐसा दरिद्रें करून पीडित॥ होत्साता काळक्रमित॥ तयासी दोन कन्या होत ॥ लावण्य अद्भुत तयां चें॥ ३३ ॥ जेसी रूपवती अप्सरती ॥ तीही लाजे तयांप्रती॥ गुणें करूनि द्रौ पदी सती ॥ तैशा भासती कन्यका॥ ३४ ॥ नामें ठेविलीं सुंदर॥ अप्सरूपव ती मनोहर॥ तया पाहतां नृपवर ॥ इच्छिती धुरंधर वरावया ॥ ३५ ॥ दुज्या क न्येचें नाम ऐका॥ जियेसी ह्मणती सुपर्णिका॥ तिच्यावरोनी ओवाळी मेनिका ॥ आश्चर्य सकळिकां होतसे ॥ ३६ ॥ त्या उभय कन्यानीं जाण॥ गृहांतील क

ध सर्व करून ॥ गाईचींपाडसें घेऊन ॥ अरण्यीं जाऊन चारावीं ॥ ३७ ॥ तेथें एक सरोवर ॥ होतें वनामाजी सुंदर ॥ तृषाहारक उत्तम नीर ॥ संतोष अति पावतसे ॥ ३८ ॥ मत्स्य कच्छ आदि करुनी ॥ जलचरें वनचरें तयेस्थानीं ॥ हंसकारंडवपक्षी येउनी ॥ कोकिळा आदिकरुनी बोलती ॥ ३९ ॥ कर्दळी पारिजातक पुष्पयुक्त ॥ चंपक मोगरा शोभत ॥ जाई जुई मालती सुटतां वात ॥ सुगंध अद्भुत येतसे ॥ ४० ॥ नानाप्रकारच्या वृक्षजाती ॥ मांदारबिल्वादि शोभती ॥ ऐसें रम्यस्थळ दुजें निगुती ॥ नसे क्षितीं पाहावया ॥ ४१ ॥ ऐसे वृक्षादिकें करुनि युक्त ॥ सरोवर वनीं शोभा देत ॥ तया मध्य भागीं लिंग प्रख्यात ॥ स्फटिकवत भासतसे ॥ ॥ ४२ ॥ तया सरोवराच्या ठायीं ॥ स्वर्गींच्या अप्सरा आल्या पाहीं ॥ शिवपूजा करोनि लवलाहीं ॥ परत पायीं निघाल्या ॥ ४३ ॥ इतुकीया माझारी ॥ द्विजकन्या आल्या झडकरी ॥ कुमारिका पाहतां सुंदरी ॥ आनंदती अंतरीं अप्सरा ॥ ४४ ॥ त्या विप्रकन्यकांच्या हातुन ॥ करविती शिवलिंगपूजन ॥ अप्सरा यथाविधी करून ॥ साहित्य आपण देउनी ॥ ४५ ॥ षोडशोपचारें करूनी ॥ चंदनें शिवातें चर्चुनी ॥ अक्षता आदिकरुनी ॥ द्रव्य समर्पुनी तोषविला ॥ ४६ ॥ षोडश दुर्वा शिवावरुती ॥ वाहुनी धूपदीप समर्पिती ॥ लाडू अनरसे पक्वान्नें वाटिती ॥ दधिभात प्रीतिनें नैवेद्या ॥ ४७ ॥ ऐसा नैवेद्य दाखवुनी ॥ तांबूल दक्षिणा ठेउनी ॥ प्रार्थना पुष्पांजळी वाहुनी ॥ साष्टांग नमनीं वंदिला ॥ ४८ ॥ षोडश ग्रंथियुक्त दोरक ॥ दोन करुनी सुरेख ॥ दोघां हस्तीं बांधुनी देख ॥ व्हावया सुव्रत दीधलें ॥ ४९ ॥ हें व्रत मौनत्वें करावें ॥ ऐसें सांगोनी तया भावें ॥ पुढें काय वर्तलें ऐकावें ॥ शुद्धभावें करोनियां ॥ ५० ॥ अप्सरा गेल्या स्वर्गासी ॥ विप्रकन्या हर्षित मानसीं ॥ शुभ शकुन झाले आम्हांसीं ॥ येतां सरोवरासीं चांगले ॥ ५१ ॥ आजि आमुचें भाग्य उदेलें ॥ म्हणोन अप्सरा दर्शन झालें ॥ व्रत सुखप्रद निवेदिलें ॥ दरिद्र गेलें आमुचें ॥ ५२ ॥ ऐसें सुहास्यवदनें करुन ॥ करिती परस्पर भाषण ॥ सायंकाळ झाला पाहून ॥ वासुरें वनांतुन हांकिती ॥ ५३ ॥ त्या विप्रकन्या तेथुनी ॥ दधिभात सरोवरीं टाकुनी ॥ पक्वान्नें बरोबर घेउनी ॥ आपुल्या सदनीं पातल्या ॥ ५४ ॥ पक्वान्नें ठेविलीं गृहात ॥ आपण जाल्या निद्रिस्त ॥ निशी लोटोन अरुणोदय होत ॥ जाउनी पाहाततया तें ॥ ५५ ॥ पक्वान्नें जाहलीं सुवर्ण ॥ आश्चर्य करिती पाहुन ॥ शिवपार्व

लाकृपाघन॥ भक्तसंरक्षणकरावया॥ ५६॥ ईश्वराचीअगम्यलीळा॥ त्याणें येवढाखेळकेला॥ धन्यव्रताचासोहळा॥ पाहिजेसंपादिला अखंड॥ ५७॥ सुवर्णगृहीं ब्राह्मण पहात॥ अत्यंतझालाभयभीत॥ चौरकर्मेंकेलेंधनमात्र॥ आतांअनर्थवर्तेल॥ ५८॥ पंचमहापातकांपरी॥ हीअसेसुवर्णचोरी॥ येथें राजदंड होईलभारी॥ यमधर्मकरीदूसरा॥ ५९॥ ऐसाविप्रपापभीत॥ उद्विग्न जयाचें चित्त॥ कन्यकांप्रतीबाहुनी पुसत॥ केलाघातकवणाचा॥ ६०॥ सुवर्ण चोरी ऐसें पाप॥ नेणो तुह्मींआपोआप॥ आतांजेथीलतेथें माप॥ घालुनीरवेप घाआधीं॥ ६१॥ मगसांगती पित्यालागुनी॥ नाहींआणिलेंआह्मींचोरुनी॥ असत्यभाषणनसेवदनीं॥ करितोंसमाधानकोपातें॥ ६२॥ सरसावूनबोलेरूपवती॥ आह्मींगेलोंवनाप्रती॥ व्रतयोगें धन प्राप्ती॥ झालीनिश्चितिआह्मासीं॥ ६३॥ अरण्यांतीलसर्ववर्तमान॥ सांगत्याजाल्यातयालागुन॥ अप्सरासरोवरींयेऊन॥ करवितीं पूजनशिवाचें॥ ६४॥ हेंआह्मांकरवूनिमौनव्रत॥ पूजासामग्रीपक्वान्नें देत॥ तीं आणूनिठेविलीगृहांत॥ सुवर्णनिश्चिततेंजाहलें॥ ६५॥ अनायासेंदरिद्र्यासीं॥ चिंतामणीआलाहातासीं॥ मगपारनसेसुखासीं॥ तैसें ब्राह्मणासीं जाहलें॥ ६६॥ काजसारुनीसर्वही॥ वासुरें घेऊनिलवलाहीं॥ आलात्यासरोवराचे पथीं॥ तेथेंनवलाई वर्तली॥ ६७॥ राजाशिकारी करावया॥ प्रतापसूकरनामजया॥ श्रमबहूत पाहोनियां॥ पातलात्याठायावनासी॥ ६८॥ तृषातुरजाह्लला अत्यंत॥ विप्रकन्यापहातीवनांत॥ नृपवरतयासीं पूसत॥ उदकवनांत असेंकीं॥ ६९॥ ऐसेंनृपवरें विचारितां॥ रूपवतीच्याआनंदचित्ता॥ दधिभातजलनृपनाथा॥ नेउनीदेतां विलंबनसे॥ ७०॥ राजानेंकरुनीसेवन॥ संतोषातेंपावलेंमन॥ तयासीं बोलेवचन॥ कन्यकाआपणकवणाच्या॥ ७१॥ रूपवतीतयासींबोलत॥ सोमशर्मानामेंप्रख्यात॥ तोआह्मुचापितानिश्चित॥ जन्मलोकुळांतउभयतां॥ ७२॥ ऐसेंतिचेंभाषणऐकोनी॥ राजागेलानगरालागोनी॥ रूपवती वरावीऐसेंमनीं॥ धरोनिसदनीं प्रवर्तला॥ ७३॥ मगबोलावुनी विप्रासीं॥ प्रेषिलाविप्रगृहासीं॥ बोलावुनी आणावेंतयासीं॥ ऐसेंतयासींसांगीतलें॥ ७४॥ दूतद्विजोत्तमाविनवीत॥ राजातुह्मासी बाहत॥ ऐसी ऐकतांमात॥ विप्र-

त्वरितंपातला ॥ ७५ ॥ राजद्वारीं येतां ब्राह्मण ॥ राजानें करूनि सन्मान ॥ आसनावरी बसवून ॥ केलें पूजन सत्कारें ॥ ७६ ॥ राव म्हणे द्विजोत्तमानें ॥ रूपवती कन्या देई मातें ॥ उत्तम म्हणोनी विवाहातें ॥ प्रवर्तक चित्तें जाहला ॥ ७७ ॥ आणि दुसरी कन्यका ॥ नामजयेचें सुपर्णिका ॥ ब्राह्मणाचा पुत्र पाहोनि निका ॥ विवाह देखा आरंभिला ॥ ७८ ॥ एक समयावच्छेदें करून ॥ लग्नास प्रवर्तला ब्राह्मण ॥ उत्तम समारंभें करुन ॥ मांडिलें लग्न नृपवरें ॥ ७९ ॥ मंडप घातला विस्तीर्ण ॥ ब्राह्मण समुदाय बोलाउन ॥ मंगलवाद्यांचा घोष दारुण ॥ विवाह परिपूर्ण जाहला ॥ ८० ॥ ब्राह्मण भोजन करून ॥ धन अपार तयां देउन ॥ आनंदविले ऋषिजन ॥ वधुवरें समाधान पावलीं ॥ ८१ ॥ अप्सरेनें सांगीतलें व्रत ॥ तयामाजी सुपर्णा रत ॥ म्हणोन तियेसीं राज्य प्राप्त ॥ होउनी भोगित सुखातें ॥ ८२ ॥ इकडे वर्तलें अद्भुत ॥ रूपवती सोडी शिवव्रत ॥ राजविलास प्रीतियुक्त ॥ विषयीं सक्त अखंड ॥ ८३ ॥ तया व्रताचा विसर पडतां ॥ राज्य शत्रूनें हरिलें सर्वथा ॥ चित्तीं रायासीं लागली चिंता ॥ दरिद्र भोगीत अतिदुःखें ॥ ८४ ॥ मग रूपवती एके दिनी ॥ अकस्मात आली भगिनीचे सदनीं ॥ पाहुनि आनंदली सुपर्णा मनीं ॥ सन्मानोनि आसनीं बैसवी ॥ ८५ ॥ सुपर्णिका पाहूनि भगिनीसीं ॥ अतिदरिद्री दुःखी मानसीं ॥ पाहोनि विचारी तियेसीं ॥ राज्यलक्ष्मीसीं त्यजिलें ॥ ८६ ॥ ऐसें ऐकतां रूपवती ॥ वदती झाली तियेप्रती ॥ शत्रु येउनी घाला घालिती ॥ राज्यलक्ष्मी हरिली सर्वही ॥ ८७ ॥ तेणें करूनि दरिद्रदशा ॥ आतां कैंची राज्याची आशा ॥ जावें तरी कवण्या देशा ॥ नाहीं मनसा पूर्ण झाली ॥ ८८ ॥ ऐसें व्हावया कारणें ॥ शंकराचें व्रत भंगिलें जाण ॥ तेणें दशा प्राप्त झाली पूर्ण ॥ रूपवती भाषण ऐकिलें ॥ ८९ ॥ मग सुपर्णेनें तियेसीं ॥ सुवर्णघट भरोनी संतोषी ॥ देती जाहली भगिनीसीं ॥ भोगी विलासासीं जाउनी ॥ ९० ॥ तों द्रव्याचा घट घेउन ॥ जातां आपुल्या गृहा लागुन ॥ तस्करें नेला लुटून ॥ मार्गी अडचण वोढवली ॥ ९१ ॥ तेणें करोनी अतिदुःखित ॥ रूपवतीचें जाहलें चित्त ॥ आतां पुढें कैसें गत ॥ लागली खंत जिवांसी ॥ ९२ ॥ पुनरपी आली भगिनी गृहीं ॥ द्रव्यघट नेला तान

स्करें पाहीं ॥ ऐसें ऐकतां सुपर्णाहृदयीं ॥ दयालवलाहीं उपजली ॥ ९३ ॥ मग एकाकाठीमाझारी ॥ गुप्तधन भरूनते अवसरीं ॥ दिधली रूपवतीच्याकरीं ॥ निघाली स्वनगरीं जावया ॥ ९४ ॥ तीही काठी अकस्मात ॥ चोरें नेली तिच्या देखत ॥ प्राक्तनीं लिहिलें कायलिखित ॥ आह्मीं नेणत विधीनें ॥ ९५ ॥ ॥ हस्त लाउनी निढळासीं ॥ पुनः पातली सुपर्णेपासीं ॥ व्यर्थ नेऊनितबधनासीं ॥ अर्पिलें तस्करांसीं सर्वही ॥ ९६ ॥ ह्मणे शंकरमाझ्यावरी ॥ कोपाविष्टझालासर्वो परी ॥ ऐसें बोलतां दुःखलहरी ॥ ओढवली अंतरीं भगिनीच्या ॥ ९७ ॥ रूपवतीचें ऐकतां भाषण ॥ दंडवत नमस्कार घालुन ॥ सुपर्णा शिवाचें करी स्तवन ॥ ऐकतां प्रसन्न शिव झाला ॥ ९८ ॥ तूं भोळा शंकर अविनाश ॥ तूं सकळ जगाचा ईश ॥ तूं असमी स्वयंप्रकाश ॥ सकळ विलास तुझा असे ॥ ९९ ॥ तूं घेतलेंसीं सगुणपणा ॥ ऐकभक्ताच्या रक्षणा ॥ ब्रीद बांधोनी दिनजना ॥ तारिसी दयाघना तूं एक ॥ १०० ॥ चौदा चौकड्या राज्यसंपदा ॥ रावणासि दिधली एकदां ॥ ध्रुवबाळासीं अढळपदा ॥ स्थापिलाकदां नढळेची ॥ १०१ ॥ श्रियाळचांगुणाचिल्हाळा ॥ तयादीधली मुक्ती अढळ ॥ भक्तजनाचीं संकटें विशाळ ॥ येतां सकळ वारिसी तूं ॥ २ ॥ ऐसे अनंतभक्तजन ॥ तारिले तुवां लीलें करून ॥ चांडाळीचा उद्धार करून ॥ केली स्थापन कैलासीं ॥ ३ ॥ ऐसा तूं जो उदार धीर ॥ कांकोपसी आह्मांवर ॥ तुझा महिमा वर्णितां फणिवर ॥ जिव्हा समूळ चीरल्या ॥ ४ ॥ मी पामर तुझी स्तुती ॥ काय करणार मंदमती ॥ परीन होतां तुझी प्राप्ती ॥ जीवनिश्चितीं नठेवीं ॥ ५ ॥ ऐसा पाहुनि निर्धार ॥ प्रकट जाहला शंकर ॥ पंचवदन गौरीवर ॥ कांतीसुंदर स्फटिक ऐसी ॥ ६ ॥ भस्मलेपन सर्वांगासीं ॥ पन्नगरूळनी अंगासीं ॥ गळां रुंडमाळा आयुधासीं ॥ गजचर्मासीं पांघुरला ॥ ७ ॥ स्फटिकरुद्राक्षधारण ॥ व्याघ्रचर्माचें आसन ॥ स्मशानवासी ह्मणती जन ॥ प्रसन्नवदना बैसला ॥ ८ ॥ भाळीं अर्धचंद्र शोभत ॥ माथां गंगा वाहत ॥ नीळकंठ शोभा अत्यद्भुत ॥ पाहातां चित्त हारपे ॥ ९ ॥ तेज पाहतां झांकती नयन ॥ कोटिसूर्यसमप्रभा जाण ॥ सुपर्णा दिव्यचक्षू करून ॥ पाहे आपण शिवातें ॥ ११० ॥ प्रसन्न होवोनी शंकर ॥ ह्मणे

सुपर्णे इच्छित वर॥ मागतां देईन सत्वर॥ क्षणही उशीर न करावा॥ ११॥ तुज ऐसा भक्तयोग॥ दुजा नसे पृथ्वीवर॥ तुवां घालुनी मजवरी भार॥ व्रत सुंदर चालविलें॥ १२॥ नृभीती न धरावी मानसीं॥ मी प्रसन्न असतां तुजसीं॥ संकटें जानी देशोदेशीं॥ पाववीन सुखासीं तुजलागीं॥ १३॥ ऐकतां शिवाचें वचन॥ सुपर्णा ह्मणे तयालागुन॥ रूपवती माझी वडील बहीण॥ चुकली जाण तव व्रता॥ १४॥ ही मोठी अपराधी॥ तूं क्षमा करीं कृपानिधी॥ ईचें रक्षण करीं आधीं॥ दुःख व्याधी निरसावी॥ १५॥ शत्रूनीं हरिली राज्यसंपदा॥ सर्वस्वें भोगिती आपदा॥ अन्न वस्त्र न मिळे कदां॥ फिरती सदां चहुंकडे॥ १६॥ सुपर्णेचें ऐकोनि भाषण॥ शिव ह्मणती तयेलागुन॥ तुझ्या भगिनीनें व्रत मोडुन॥ सोडिलें आराधन आमुचें॥ १७॥ महाकोप आला माझ्या चित्तीं॥ ह्मणोनि गेली राज्यसंपत्ती॥ परी तुझी पाहूनि भक्ती॥ संतुष्टचित्ती जाहलों॥ १८॥ आतां पुन्हा रूपवतीनें जाण॥ व्रत सांग करावें आपण॥ राज्यलक्ष्मी प्राप्त होउन॥ सुखसमाधान पावेल॥ १९॥ ऐसें शंकरें तियेसीं॥ सांगोनि गेले कैलासासीं॥ मग सुपर्णा रूपवतीसी॥ करवी व्रतासी तियेहस्तें॥ २०॥ व्रत करितां साद्यंत॥ सर्व शत्रू नाश पावत॥ तिचें राज्य तिजला प्राप्त॥ झालें अकस्मात सर्वही॥ २१॥ ऐसा व्रतमहिमा खरा॥ गेली लक्ष्मी येईल घरा॥ ह्मणोनि भजावें शंकरा॥ उदार धीरा सकळिकीं॥ २२॥ रूपवतीसी झालें ऐसें॥ कामधेनू लाधली अनायासें॥ कल्पवृक्ष इच्छिलें देत असे॥ झालें तैसें सुखकारी॥ २३॥ आनंदसिंधूचें आलें भरतें॥ शिवप्रसादें न होय रितें॥ धर्म्यभगिनीनें केलें मातें॥ उपकारातें काय वानूं॥ २४॥ कोण पक्ष कोण मास॥ कोण तिथी असे व्रतास॥ तें पुढें सांगती नंदीस॥ भावें परिस स्कंद बोले॥ २५॥ कथा ऐकोनी स्कंदाप्रती॥ नंदिकेश्वर प्रश्न करिती॥ व्रतोद्यापन कवण्या रिती॥ सांगा मजप्रती ऋषिराया॥ २६॥ स्कंद ह्मणे ऐक सावधान॥ एकाग्र करुनी मन॥ मुक्तापाडवा करितों कथन॥ श्रेष्ठ जाण व्रत असे॥ २७॥ भाद्रपद शुक्ल पक्षीं व्रतास॥ प्रतिपदा नेमिला दिवस॥ शुद्ध करोनी मानस॥ पूजीं शिवास कवणे परी॥ २८॥ षोडश संवत्सर जाण॥ व्रत करावें आपण॥ मग करावें उद्यापन॥ उत्तम ह्मणोन पक्ष संपहा॥ २९॥ तयाहुनी मध्यम रि

ती॥ मध्यंतरीं उद्यापन करिती ॥ एक संवत्सरीं दोन होती ॥ कनिष्ठ रिती ऐसी असे॥ ३०॥ तीन प्रकारें सांगीतली रीती ॥ कोण्याही प्रकारें ईश्वरा भजती॥ ते जन सुखातें पावती ॥ अंतीं जाती शिवलोका॥ ३१ ॥ ऐका व्रत आणि उद्यापन॥ शिवलिंग आणि प्रतिमापूजन॥ दोनी करिजे एक दीन॥ ऐकें विधान तें ऐसें॥ ३२॥ मंडप उत्तम घालुनी॥ कर्दळीस्तंभातें लाउनी॥ नानापुष्पादिकें करूनीं॥ मखर बनवोनि सुशोभित॥ ३३॥ तया मखराच्या मध्यभागीं ॥ लिंगतोकादीं पंचरंगीं॥ नानापुष्पादि आणोनि वेगीं॥ धन्य जगीं हें चिव्रत॥ ३४ ॥ सुवर्णपात्रयुक्त जाण ॥ तयावरी कलश ठेउन ॥ पूर्णपात्र अक्षता घालुन ॥ प्रतिमापूजन करावें॥ ३५॥ पार्वतीयुक्त शिवाची जाण॥ सुवर्णप्रतिमा करून ॥ स्नानादि कर्म सारून॥ घालुनी आसन बैसावें॥ ३६ ॥ मौन करोनी धारण॥ प्रतिमा करावी स्थापन ॥ यथाविधी करावें पूजन॥ सांगती ब्राह्मण तयापरी॥ ३७ ॥ षोडशोपचारें जाण॥ करावें प्रतिमापूजन ॥ अर्घ्यपाद्यादि संपूर्ण ॥ वस्त्राभरणीं अर्पावीं ॥ ३८ ॥ गंधाक्षता परिमळ॥ सौभाग्यादि बाहूनि सकळ॥ नानापुष्पें तुळशीदळ॥ त्रिदळबिल्वपत्र अर्पावें॥ ३९॥ धूपदीपनैवेद्य सकळिक ॥ पक्वान्नें करावीं अनेक॥ दधिभात आणोनि देख॥ अर्पितां तोख शिवातें॥ ४०॥ षोडशग्रंथी दोरा बाहुन॥ तो हस्तीं बांधावा आपण ॥ षोडशदूर्वा शिवार्पण॥ दक्षिणातांबूल अर्पावें॥ ४१ ॥ मंत्रपुष्पादि वाहोनि जाण ॥ मग करोनी प्रदक्षिणा ॥ ब्राह्मणासी अर्पावें वायना ॥ षोडशप्रमाण तयाचें॥ ४२॥ लाडू घालुनी पात्रांत॥ फळें देवावीं नयांत ॥ सांगीतली संख्यायुक्त॥ सांग व्रत होय तेव्हां ॥ ४३॥ मग करावी प्रार्थना॥ लिहिल्या मंत्रें करूनि जाण॥ संतोष होउनी गिरिजारमणा ॥ सुखसदना देत असे॥ ४४॥
॥ ॥ मंत्र॥ ॥ प्रसीद देवदेवेश चराचरजगद्गुरो॥ ईशानाय नमस्तुभ्यं व्योमव्यापिन नमोस्तु ते॥ ॥ इति मंत्रः॥ ॥ ऐशा मंत्रें करून ॥ रात्रीं करावें जागरण ॥ कथापुराणादिक श्रवण॥ आनंदें दिन निशी वतवि ॥ ४५ ॥ प्रातःकाळ झालिया वरी ॥ स्नानादि सर्वकर्म सारीं॥ स्वधर्मानुष्ठानें तोषवीं हरी॥ होम करीं ब्राह्मण द्वारा॥ ४६ ॥ मूळमंत्रें करून ॥ तीळ आणी तूप जाण॥ तयाचें करावें हवन ॥ जाणतां प्रमाण द्विजराज ॥ ४७ ॥ आचार्यासी गोप्रदान॥ घालुनी वस्त्रालंकार भू

षण ॥ तांबूलदक्षिणादेउन ॥ ब्राह्मणपूजनकरावें ॥ ४८ ॥ षोडशशैवब्राह्मण ॥ गृहीं आणावे बोलाउन ॥ कमंडलुकौपीनदेउन ॥ घालूनभोजनतोषवावे ॥ ४९ ॥ तांबूलदक्षिणासहीत ॥ विप्रांसीकरावेंतृप्त ॥ भोजनकरावें समस्त ॥ ऐसीरीत सांगती ॥ १५० ॥ ऐसेंसांगीतलें उद्यापन ॥ स्कंदेंनंदिकेश्वरालागुन ॥ यांत आलेंव्रतसंपूर्ण ॥ आनंदपूर्णओढवला ॥ १५१ ॥ याव्रतेंकरोनि सकळ संपत्ति ॥ राज्यादिप्रामतयाहोनी ॥ वाढेल कुळामाजीसंतती ॥ सुखपावनीइहलोकीं ॥ ५२ ॥ इहलोकींचें सर्व सुख ॥ भोगून अंतीं शिवलोक ॥ ब्राह्मणमुखें कथानक ॥ ऐकतांसकळिकसुखावती ॥ ५३ ॥ व्रतराजअगाधसागर ॥ तयामाजीरत्न सुंदर ॥ हें शिवव्रतनिर्धार ॥ केलाप्रसारप्राकृत ॥ ५४ ॥ हें करावें सर्वजनी ॥ लागावेंशंकराचेभजनीं ॥ सार्थकहेंचीजन्मायेउनी ॥ लागावेंस्तवनींश्री हरिच्या ॥ ५५ ॥ ॥ इतिश्रीमुकापाडवाकथासमाप्त ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥



# अथनारळीपौर्णिमा कथा प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ ॐ नमोजीविद्याधरा ॥ गौरीहराच्याप्रियकरा ॥ तारिसीदुर्गमभवसागरा ॥ सरस्वतीवराधन्यतूंची ॥ १ ॥ चवदाविद्याचौसष्टकळा ॥ वसतीतुझ्याआंगींसकळा ॥ भासेतुझी अगम्यलीळा ॥ तुझासोहळान वर्णवे ॥ २ ॥ तुझ्यानामस्मरणेंपावन ॥ होतआहेसकळजन ॥ म्हणवोनध्यातसेमन ॥ करीसमाधान दासाचें ॥ ३ ॥ परापश्यंतिमध्यमावेखरी ॥ यावा

णीचा तूंचि सूत्रधारी॥ प्रेमपान्हापाजीं झडकरी॥ निर्मळकरीं बुद्धिमाझी॥
४॥ तुझियाप्रसादें ग्रंथरचना॥ करितां गोडी लागेल जना॥ वाचितां पार्वतीस
माधाना॥ ऐशा कवना मती देई॥ ५॥ आतां कथितों व्रत एक॥ श्रवणाक
रितां आनंदती लोक॥ ज्याचा महिमा अलोलिक॥ सुखदायक सर्वांसी॥ ६
॥जयाचें भाक्तन असें सुरेख॥ तोंचि हें व्रतकरीं देख॥ नारळीपोर्णिमा माहा
त्म्य ऐक॥ सांगतों ऐक सावचित्तें॥ ७॥ ऐसीया तिथीस आधीं॥ रक्षाचि
न्ह हस्तीं बांधीं॥ जेणे जाईल आधिव्याधी॥ जयसिद्धी पावाल॥ ८॥ ऐ
साविधी ऐकतां श्रवणीं॥ धर्म पुसे श्रीकृष्णालागुनी॥ सर्वयोग आणी अशुभज
नीं॥ नाश होवोनी जाय कैसें॥ ९॥ ऐसें आह्मां सांगे व्रत॥ ज्याच्यायोगें वर्ष पर्य
न्त॥ संरक्षण होई ऐसी मात॥ कल्याण जयांत होत सर्वांचें॥ १०॥ मग श्रीकृ
ष्ण धर्मराजाप्रती॥ शचीचा इतिहास सांगती॥ इंद्रासी नोहे जयप्राप्ती॥ जा
हला चित्तीं उद्विग्न॥ ११॥ तेव्हां शक्रस्त्रीनें जाण॥ पतीस जय व्हावा ह्मणो
न॥ जें कां केलें आपण॥ कायकारण तें ऐका॥ १२॥ देव आणि दैत्यांत॥ द्वा
दश अब्द युद्ध होत॥ परी दैत्य आनंदें जयांत॥ पराभव होत देवांचा॥ १३॥ यु
द्धें करोनी झाला त्रास॥ नाहीं ठाका वया उच्छ्वास॥ सहस्त्रनयन कासाविस॥ न
सेल पायांस ठाव कोठें॥ १४॥ ऐसें जर्जर केले देवासी॥ पळविलें दैत्यें सकळांसी
॥दुखित होऊनी मानसीं॥ आचार्यासीं पुसतसे॥ १५॥ बृहस्पती पुढें जाऊन
॥साष्टांग केलें नमन॥ करूनि यथाविधी पूजन॥ पाणी जोडून प्रार्थीतसे॥
१६॥ आह्मां दैत्यानीं गांजिलें॥ पळावयास्थळ नसे उरलें॥ बारा वर्षे दैत्यें गां-
जिलें॥ आंगिरे ऐकिलें वचन हें॥ १७॥ युद्ध करावें आहे मानसीं॥ परी जय प्रा
प्ती होय कैसी॥ एवढी चिंता आमुच्या मानसीं॥ दूर कैसी होय सांगा॥ १८॥ इ
तकें बोलणें ऐकून॥ शची बोलोनी आपण॥ करी पतीचें समाधान॥ नभ्यावें आपण
दैत्यातें॥ १९॥ ह्मणे स्वामी आजिचा दिन॥ युद्ध न करावें दैत्यांलागुन॥ उदयी
क होती मनोरथ पूर्ण॥ सांगतें खूण ऐका ही॥ २०॥ प्रातःकाळीं रक्षा बंधन॥
करीन दक्षीण हस्तीं जाण॥ अपजय येईल दैत्यां लागुन॥ जयी समाधान पावा
ल॥ २१॥ पत्नीचें वचन ऐकोन॥ शक्र पावला समाधान॥ निशी लोटेल केव्हां

ह्मणोन ॥ चिंतीतमनीं रवीतें ॥ २२ ॥ जाहला तमाचानाश ॥ भासे अरुणो
दयप्रकाश ॥ श्रावण शुक्लपौर्णिमेस ॥ शचीवरासह उठली ॥ २३ ॥ मांगलि
कस्नानकरून ॥ तयारकेलें रक्षाचिन्ह ॥ केलें दक्षिण हस्तीं बंधन ॥ स्वामीआ
पण जयपावा ॥ २४ ॥ ऐसें ऐकतां शचिवरें ॥ ब्राह्मणा बोलाविले आदरें ॥ पु-
ण्याह वाचन जय जयकारें वाजवीत रणतुरे निघाले ॥ २५ ॥ रणवाद्यें दुमदुमि
लें निराळ ॥ श्रवणेंभीती दैत्य सकळ ॥ वाटे रक्षेल वैरी दळ ॥ नचाले बळ दैत्यां
चें ॥ २६ ॥ संमागमे दैत्यांचे भार ॥ इंद्रवरुणयमकुबेर ॥ रथीं बैसतां शचीवर
॥ शकुन अपार होताती ॥ २७ ॥ आजी सुचिन्हें भासती ॥ जय आहे आपुल्या
हातीं ॥ इंद्र ह्मणे देवांप्रती ॥ दावूं युद्धरीती दैत्यांतें ॥ २८ ॥ प्रलयकाळींचा-
अग्नीकठोर ॥ तैसा दिसे शचीवर ॥ वाटे आटील चराचर ॥ शक्रवीर दिस-
तसे ॥ २९ ॥ मूर्तिमंत काळ जैसा ॥ इंद्र भासे दैत्यां तैसा ॥ युद्धामाजी भी
ष्म जैसा ॥ टीकेल कैसा राम ॥ ३२ ॥ दैत्यां माजी झाली हांक ॥ पर्वत-
टाकिती सकळिक ॥ शचिवरें निवटिले एकुन एक ॥ चूर्ण देखवज्रें केले ॥
३१ ॥ कोणी धांवती वृक्ष उपटोन ॥ कोणी लपती गगनीं जाण ॥ तेथुन टा-
किती पाषाण ॥ युद्ध दारुण मांडलें ॥ ३२ ॥ इंद्रवज्र फिरे चक्राकार ॥ चू
र्ण करी वृक्ष गिरिवर ॥ संधान करोनी हाणी शर ॥ तोडी कर दैत्यांचे ॥ ३३ ॥
प्रळयकाळींच्या मेघधारा ॥ वर्षती जैशा अपारा ॥ तैशा इंद्रें शर घारा ॥ दै
त्यसंहारा सोडिल्या ॥ ३४ ॥ चंद्रसूर्य आच्छादित ॥ तम पसरलें जगांत ॥
दैत्य झाले भय कंपित ॥ पराजय होत आमुचा ॥ ३५ ॥ एकमेक ऐसे बोल
ती ॥ अट्टाहास्यें आरोळ्या देती ॥ भीती उपजावी देवचित्तीं ॥ बाण सोडिती
अनुपम्य ॥ ३६ ॥ परी न सोडी शक्र ठाण ॥ सोडी बाणापाठी बाण ॥ देवें मां
डिलें निर्वाण ॥ युद्ध दारुण होत असे ॥ ३७ ॥ जे शत मखावरी येती सायक ॥
तेते छेदी सकळिक ॥ आणि आपुल्या बाणें नासिक ॥ कादुनी कौतुक दावी
तसे ॥ ३८ ॥ दैत्य केले छिन्नभिन्न ॥ कोणी पळती होऊनि दीन ॥ शस्त्रें हस्ती
चीं जाती गळोन ॥ कोणी ठाण न सोडिती ॥ ३९ ॥ घायाळ होउनी दीन झाले ॥ दे
वांपुढें उपाय न चले ॥ कोणी मेले कोणी गेले ॥ युद्ध संपलें सर्वथा ॥ ४० ॥

जैसीमेघडंबरेंयेती॥ वायुसुटतांची वितुळती॥ तैसीझालीदैत्यांगती॥न चलेमती कवणाची॥ ४१॥ ऐसासमरचमत्कार॥ दैत्यांदाविती सुरवर॥ तोंपातलेनिशाचरदुर्धर॥सैन्यअपारघेवोनी॥४२॥दैवे पाहतां बहुसमाज॥ह्मणतीनमिळेजयआज॥ आतांराखीलईश्वरलाज॥ तरीचकाज होयरें॥ ४३॥ मेघनादें करोनी गर्जती॥ क्रोधेंअनिवारधांवती॥ ह्मणतीमारूं शचीपती॥ दे ऊंगती देवांसही॥४४॥ऐसेंगर्जोनिधांवती॥ भीती तुपजेइंद्राप्रती॥ यमकुबेरथरथरांकांपती॥ होईलगतीकायनेणों॥ ४५॥ शतमखें सकळांसीं॥ अभयदीधलें देवांसीं॥ युद्धजरीकरतील अहर्निशी॥ तरीजयासी पावनमीं॥ ४६॥ ऐसें ऐकतां अभयवचन॥ सकळदेवभीती सोडुन॥ युद्ध करिती दारुण॥ दैत्यकंदनमाडिलें॥ ४७॥ कोणीखड्गकोणीतोमर॥ अरगळाघेतीनिशाचर॥ कोणीमुसळकोणीडोंगर॥ पाषाणखडुतरटाकिती॥ ४८ ॥ कोणीसोडिती निर्वाण शक्ती॥ कोणीशरें भानुमंडळ झांकिती॥ एकाबाणाचे सहस्त्रबाण होती॥ कोणी धांवतीमल्लयुद्धीं॥ ४९ ॥ शक्तीनें शक्ती तोडितीइंद्र॥ बाण सोडी अर्धचंद्र॥ तेणे दैत्यांचेभंगेभद्र॥ वाहे समुद्ररुधिराचा ॥ ५०॥ तयारणामाझारी॥ मोडहोय निशाचरीं॥ देवींवाजविल्या आनंदभेरी॥ गेलेगजरीं इंद्रभुवना॥ ५१॥ जयवाद्यांचेगजरीं॥ देवयेतां स्वर्गद्वारीं॥ घेऊनयेती-आरत्याकरीं॥ मंगलशुभकारी देवांगना॥ ५२॥ इंद्र आसनीं बैसला॥ देवीं कुसुमवर्षावकेला॥ रंभाउर्वशीगातीलीला॥ नृत्यकुशलाकरिताती॥ ५३॥ रक्षा बंधनमहिमा अपार॥ कृष्णसांगेनिर्धार॥ श्रवण करीकुंतीकुमर॥ घालाशशिवरदेवांसह॥ ५४॥ दैत्यपराभवहोतांजाण॥ त्रैलोक्यविजयीइंद्रआपण॥ तैसाकरीजोरक्षाबंधन॥ जयपरिपूर्णतयाहोय॥ ५५॥ ऐसाव्रतोद्भवाचा-ओघ॥ सुतसंततीहोय अमोघ॥ दरिद्रअपजयहरपेरोग॥ होईलचांगअभीष्टतें॥ ५६॥ धर्मराजह्मणेदेवांसीं॥ रक्षाबंधनाच्या सांगें विधीसीं॥ तो करावाकोणे दिवशीं॥ सांगेंआह्मासीं यथार्थ॥ ५७॥ जगनियंतावासुदेव॥सांगेधर्माचादेखुनीभाव॥ अघाचामोडील ठाव॥ स्मरतांनावरामाचें॥ ५८॥ तैसें याव्रतें करून॥जातीरोगसमूळजाण॥ सुखसंपत्तीसमाधान॥विजयपूर्णहो

तसे ॥ ५९ ॥ कृष्णह्मणेधर्मासी ॥ सावध होईं मानसीं ॥ कैसें करणें तें परिये
सीं ॥ चहूंवर्णासीं सुखदातें ॥ ६० ॥ पूर्वील सांगीतला मास ॥ शुक्लपक्ष पूर्ण दिवस ॥
प्रातःकाळ समयास ॥ करीं स्नानासीं मांगलिक ॥ ६१ ॥ श्रुतिस्मृतिविधानें क
रून ॥ स्नान संध्यादेवतार्चन ॥ करूनि देवपितृतर्पण ॥ उपाकर्म जाण करावें ॥
६२ ॥ श्रावणी झालियावरी जाण ॥ भोजन करूनि साधी अपराण्ह ॥ तये वेळीं र
क्षाबंधन ॥ करावी आपण दक्षिण करीं ॥ ६३ ॥ कार्पासवस्त्र घ्यावें ॥ अथवा रे
शमी असावें ॥ हरिद्रें करूनि भिजवावें ॥ पिंवळें करावें सोज्वळ ॥ ६४ ॥ अक्ष-
ता करूनि पीत ॥ राई घालुनी तयांत ॥ गाईचें शेण जयांत ॥ दुर्वांसहित असावें ॥
६५ ॥ ऐसे पदार्थ घेउन ॥ वस्त्राच्यामध्यभागीं ठेवून ॥ मग ग्रंथिका मारून ॥ पु
ढें विधान ऐसें करीं ॥ ६६ ॥ संमार्जन करुनी क्षिती ॥ सारव घालोनी तयावरुती
॥ धान्यें कुंभ भरूनि निश्चिती ॥ डोंगर माथीं ठेवावी ॥ ६७ ॥ तयावरी ग्रंथी ठेवुन
॥ आपण आसनीं बैसून ॥ ब्राह्मणसमाज बोलावुन ॥ पुण्याहवाचन करावें ॥
६८ ॥ करवीं सुवासिनीच्या हातीं ॥ मंगलदायक आरती ॥ आपुल्या पुरोहिता
करवीं प्रीतीं ॥ ग्रंथिका हस्तीं बांधाव्या ॥ ६९ ॥ ग्रंथिका बांधावयाचा मंत्र ॥
जो कां विजय देणारा पवित्र ॥ तेज वाढेल जैसा मित्र ॥ मन पवित्र होतसे ॥ ७०
॥ ॥ मंत्र ॥ ॥ येनबद्धो बलीराजा दानवेंद्रो महाबलः ॥ तेनत्वा मभिब
ध्नामि रक्षोमाचल माचल ॥ इति मंत्रः ॥ ॥ या मंत्रें करावें जाण ॥ चारी
वर्णें रक्षाबंधन ॥ करूनि ब्राह्मणाचें पूजन ॥ विपुल धन अर्पावें ॥ ७१ ॥
कृष्ण ह्मणती ऐसा विधी ॥ करितां होय जयसिद्धी ॥ ऐसा जो कां अनादी ॥ तो
तुज निवेदिला सत्यत्वें ॥ ७२ ॥ जेणें करोनीं दोषरहित ॥ निर्दोषत्वें राहातें चि
त्त ॥ सुख होईल अद्भुत ॥ संवत्सरपर्यंत निर्धारें ॥ ७३ ॥ हें रक्षाबंधन पौ
र्णिमेसीं ॥ भद्रा असतां त्यावेळेसीं ॥ व्यर्थ जाईल ह्मणोनी तुजसी ॥ सुचक
बंधनासीं करूं नये ॥ ७४ ॥ भद्रा नसतां करावें ॥ रक्षाबंधन निर्धारें ॥ तेणें फ
ळातें पावावें ॥ व्रत संपादावें ऐशापरी ॥ ७५ ॥ तया दिनीं सायंकाळीं ॥ ऐसें
करावें सकळीं ॥ वरुणाची पूजा नानामळी ॥ सांगे वनमाळी करावया ॥ ७६ ॥
पर्जन्यकाळामाजी जाण ॥ सागर खवळेले अतिदारुण ॥ ह्मणोनि पूजा बाव

करुण॥ येईलशांतपण सिंधुलागीं ॥ ७७॥ जोकांस्वामी सागराचा॥ तोचीस खाइंद्राचा॥ आदरकरावातयाचा॥ सद्भावाचा भुकेला॥ ७८॥ पंचोपचारपू करूनिपूजन॥ नैवेद्यतांबूलअर्पून॥ दक्षिणाश्रीफळ ठेवुन॥ साष्टांगनमनक रावें॥ ७९॥ प्रार्थनाकरूनिसागरांत॥ नारळअर्पावातयांत॥ मगअब्धीहो यशांत॥ रुढीजगांत ऐशापरी॥ ८०॥ मंगळवाद्यांचेघोष॥ वाजतगाजतस्वगृ हास॥ हर्षयुक्तकरोनिमानस॥ सुखेंविलासभोगावा॥ ८१॥ कृष्णसांगेव्रत सार॥ धर्माचेंसुखावे अंतर॥ करूं आपणनिर्धार॥ आलाविचारमानसीं॥ ८२॥ ऐसेकोणीजेवर्तती॥ तयांनुपजेदुर्मती॥ घडेलसज्जनसंगती॥ वाढेल कीर्तीजगांत॥ ८३॥ धर्मवासनातयांहोत॥ अधर्मबुद्धीलयांसिजाय॥ का र्यासिंजातांअपाय॥ तोहीउपाय होतसे॥ ८४॥ ऐसेंव्रतराजामाजींअनेक ॥ सांगितलेंव्रताचें कौतुक॥ परितयांतुनजोकरीलएक॥ तोचिभाविक जा णावा॥ ८५॥ निश्चयनाहींवचनावरी॥ सकळव्रतांचेंशास्त्रकरी॥ सांगतोहे ऐशापरी॥ चित्तींधरीं विश्वास॥ ८६॥ व्रत एकचीकरावें॥ निश्चयधरूनिस द्भावें॥ तेणेंफिफळपावावें॥ ऐसेंदेवेंसांगीतलें॥ ८७॥ तेंकथितोंमंदमती ॥ परिसुज्ञेंधरावेंचित्तीं॥ हरपोनिमनाचीभ्रांतीं॥ धरावीशांती चित्तातें॥ ८८ ॥ असोआतापुढीलकथानक॥ दुज्याव्रताचें ऐक॥ तयामाजी सकळिक॥ आनंद देखपावती॥ ८९॥ एकापरीस एकअधिक॥ व्रताचीअसेशोभादेख॥ जेणेंकरोनीसर्वसुख॥ पावती देखवर्णचारी॥ ९०॥ केलादेहधारणजाण॥ इ च्छितसुखालागुन॥ असुखअसोंवेंतसेंमन॥ कोणाचें जाण कल्पीना॥ ९१ ॥ म्हणउनकोणत्याही मिषेंसदय॥ ईश्वरीलागावेंलय॥ दाविती अनेकउ पाय॥ ऐसीसोययोजिती॥ ९२॥ व्रतवैकल्येंकरून॥ व्हावेंदेवब्राह्मणपूजन॥ दानधर्मसत्कर्मसाधन॥ होतांजनमुक्त होत॥ ९३॥ ऐशाहेतूनेंसाधू॥ करि तीजनालाबोधू॥ जयाकर्मेंपरमानंदू॥ होतां भवसिंधूतरेल॥ ९४॥ ॥ इ तिश्रीनारळीपौर्णिमाकथासमाप्त॥ ९५॥ ॥ ७ ॥ ७ ॥



## अथसोमवती कथा प्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥ॐ नमोजीवेल्हाळा॥ अतिस्कुमारागौरीबाळा॥धा वपावगाळ्पाळा॥ करींकुरवाळादीनातें॥१॥ तूंजरीदयाकरिसी॥ तरीग्रंथपा वेविस्तारेसी॥ मंदमतीक्षुधितासीं॥घालींभोजनासीमजलागीं॥२॥ तूंसद्गु रुदयासागर॥दीनजनांकरीभवपार॥ शरणागतासीआधार॥ तुजलानम- स्कार असोमाझा॥ ३ ॥ब्रह्मवृंदजेकांसकळ॥तयांचरणीशिरकमळ॥देई अंगीभक्तिबळ॥होउनीकृपाळसकळिक॥ ४ ॥ सूतनैमिषारण्यामाझारी ॥ कथासांगती विस्तारीं॥ शौनकादिऋषिअंतरीं॥संतोषसागरींपोहती॥ ५॥ भीष्मअसतांशरपंजरीं॥तयालागींधर्मविचारी॥ तेऐकतांनरनारी॥ ह्मणेकरींव्रतऐसें॥६॥ भीमसेनानेंकौरवांसीं॥ मारूनकेलेंकुळक्षयासीं ॥अर्जुनेंसकळ भूपासीं॥मृत्युगृहासीं धाडिलें॥ ७॥ इतुकेंदुर्योधनाचेयो गें॥ घडलेंवाईटबुद्धीच्यासंगें॥कुळक्षयसर्वांचावेगें॥ केलाबंधुवर्गेजा- णपां॥८॥ पृथ्वीवरीनाहींनृपाळ॥ उरलेतेवृद्धकींबाळ॥ भारतवंशीपांच काळ॥ आह्मीसकळराहिलों॥ ९॥ आह्मापांचांरवेरीजकोण॥ भारतवंशीं नाहींजाण॥पुढेंवंशनसेमुळींहुन॥ केलेंनिर्दळनद्रोणपुत्रें॥१०॥ झालापुत्रां चासंहार॥ आतांसंततीचाविचार॥ सार्वभौमिकालाराज्यभार॥ तरीअंत

रज्ञांत नोहे ॥ ११ ॥ राज्यमला नाहीं रुचत ॥ मी जरी आहें जिवत ॥ लोक माझी निंदा करित ॥ असती जगांत सर्वदा ॥ १२ ॥ मृत्यु जरी येईल लवलाहीं ॥ तरी उत्तमगती होणार नाहीं ॥ संतती क्षय जाल्या पाहीं ॥ संताप देहीं निशि दिनीं ॥ १३ ॥ एक असुची उत्तरा जाण ॥ तये उदरीं गर्भ असून ॥ तोहीं ब्रह्मास्त्रें केला दहन ॥ अश्वत्थामें आपण स्वहस्तें ॥ १४ ॥ तेणें करूनि माझें अतिशय ॥ दुःखें जळलें गा हृदय ॥ आतां कांहीं सांगा उपाय ॥ पुसत राय भीष्मातें ॥ १५ ॥ कोठें जावें काय करावें ॥ कोठें संकट माझें दुरावें ॥ चिरंजीवी संतती भावें ॥ केसी पावे सांगे मज ॥ १६ ॥ उपाय कांहीं सांगावा ॥ माझे जीवीं चा विसावा ॥ दुःखसागर आटवा ॥ पावसी स्वभावा अगस्तीतूं ॥ १७ ॥ ऐसें भीष्में ऐकोनि कानीं ॥ सांगे कुंती सुता लागुनीं ॥ जेणें होय समाधानी ॥ कीर्ती जनीं राहेल ॥ १८ ॥ पूर्वींचें कथानक सांगती ॥ जेणें चिरकाळ वाढे संतती ॥ ऐसी हृदयीं धरोनि प्रीती ॥ ऐकतां चित्तीं ठसावें ॥ १९ ॥ सर्व व्रतां माजी जें कां श्रेष्ठ ॥ करितां न पावती कोणी कष्ट ॥ जयां माजी सकळांचें अभीष्ट ॥ ऐसें स्पष्ट सांगीतलें ॥ २० ॥ सोमवतीच्या दिवशीं ॥ जावें अश्वत्थमूलासी ॥ करावें विष्णुपूजनासी ॥ पावे संततीसी योग हा ॥ २१ ॥ अष्टशत कराव्या प्रदक्षिणा ॥ अष्टशत वस्त्रें आदि करून ॥ करितां होती मनोरथ पूर्ण ॥ सर्वांचें जाण व्रतयोगें ॥ २२ ॥ रमावल्लभासी पूजेची प्रीती ॥ हें व्रत करावें उत्तरे हातीं ॥ न होय गर्भा लागीं भीती ॥ जाण निश्चितीं मृत्यूची ॥ २३ ॥ गर्भ राहील जीवंत ॥ त्रिलोकीं होईल प्रख्यात ॥ ऐसें पितामह सांगत ॥ प्रश्न करीते मारुती ॥ २४ ॥ धर्म ह्मणे हें उत्तम व्रत ॥ कवणें आणिलें मृत्युलोकांत ॥ कोणी केलें हें मज प्रत ॥ विस्तारयुक्त सांगावें ॥ २५ ॥ गांगेय ह्मणे सावध ऐक ॥ पूर्वींचें सांगतों कथानक ॥ कांतीपुर नामें नगर एक ॥ उत्तम देखकों तेया ॥ २६ ॥ त्या नगराची शोभा ऐका ॥ जेसी कुबेराची अलका ॥ तेसा प्रकाश सकळिकां ॥ देवादिकां भासतसे ॥ २७ ॥ गल्लोगल्लीं रत्नाच्या ज्योती ॥ अंधार तिळमात्र न पडे क्षिती ॥ भासे जेसी अमरावती ॥ चकित होती चंद्रसूर्य ॥ २८ ॥ वाड्याशीं वाडे भिडले ॥ कितीएक कांचनें शोभले ॥ कोणी पांचधातूंनें बनविले ॥ विटे बंदी बांधिले अनूप ॥ २९ ॥ ॥

राजमहाल गगनचुंबित॥ कामजयाचें रत्नजडीत॥ चित्रें खणोखणीं शोभ-
त॥ मंजूळ गात हरिगुण॥ ३०॥ रत्नांचा प्रकाश परिपूर्ण॥ नसे दीपाचें का
रण॥ उदयन पावे चंडकीरण॥ व्यवहार संपूर्ण चालविती॥ ३१॥ तेथें नसे
दिननिशीं॥ सर्व लोक संतोषमानसीं॥ वेदघोष अहर्निशी॥ व्यवहारदृ
जोसीं एवढाची॥ ३२॥ कोणी करिती शास्त्रपठण॥ कोणी याज्ञीक होम
हवन॥ कोणी पुराण कोणी कीर्तन॥ सर्वकाळ लीन हरिपाईं॥ ३३॥ पंच
महायज्ञ अखंड॥ यज्ञयाग करिती प्रचंड॥ गोब्राह्मणा नसे दंड॥ अधर्म-
बंड नसे तेथें॥ ३४॥ ब्राह्मणसंतर्पण सतत॥ धर्मनीतीनें राज्य करीत॥ गी-
तनृत्य रंभा करीत॥ इंद्रभुवनांत तयासीं॥ ३५॥ नानापरीचे वृक्ष सुरेख॥ बा
गबगीचे अमोलिक॥ रावे मैना कोकिळा देख॥ बोलती सुरेख सुस्वरें॥ ३६॥
फणस आंबा जांबुळ॥ कर्दळी नारळी सीताफळ॥ आंब अंजीर पोफळ॥ अना
रराम फळें नारिंगें॥ ३७॥ बदाम जायफळ लवंग झाड॥ सुरूसुरंगी केवडा ताड
॥ जागोजाग उंसाचे फड॥ खारीक माडु लागले॥ ३८॥ जाई जुई आणी सेवंती
॥ बटमोगरा चमेली शोभती॥ गुलाब केतकी बकुळ किती॥ नानाजाती पुष्पांच्या॥
३९॥ द्राक्षांचे मंडप सुशोभित॥ मध्यभागीं कारंजी उडत॥ तडाग कुवे अपर
मित॥ पाट वाहत उदकाचे॥ ४०॥ फळें पुष्पें करूनि युक्त॥ वृक्ष रहाती सदोदि
त॥ पशुपक्षी पाळिले बहुत॥ नाहीं गणित तयांसीं॥ ४१॥ दरिद्र दुःख कवणा प्र
ती॥ नसे णबी यमभीती॥ जैसी अग्नीची तेजोवृत्ती॥ तैसी शोभत नगरी हे॥ ४२
॥ तया नगरीमाजी जाण॥ राजा राहे रत्नसेन॥ महापराक्रमी दारुण॥ न्यायनि
पुण राज्य करी॥ ४३॥ आपण चाले धर्मनीती॥ तैसा चालवी लोकांप्रती॥ अ
खंड हरिहरांची भक्ती॥ पावती मुक्तीस कळिक॥ ४४॥ तेथें एक असे ब्राह्मण
॥ तया देवस्वामी ह्मणती जाण॥ वकवृत्ती करूनि आपण॥ धर्मपरायण राहा
तसे॥ ४५॥ तया ब्राह्मणाची स्त्री महासती॥ नाम तियेचें धनवती॥ जिची त्रि
भुवनीं असे कीर्ती॥ नाहीं जगतीं दुजी ऐसी॥ ४६॥ भासे प्रति लक्ष्मी देखा॥ ति
येसी सात पुत्र एका॥ एक झाली कन्यका॥ तेजें देखा चंद्रबिंबा॥ ४७॥ नाम
तियेचें गुणवती॥ मातेची असे बहु प्रीती॥ कन्यका गृहीं एकुलती॥ ममता

चित्तीं सर्वांच्या ॥ ४८ ॥ सकळपुत्रांलागुन ॥ कन्या कूळशीळ पाहुन ॥ विवाहकरुनि ब्राह्मण ॥ कुमारिकाजाणकन्यका ॥ ४९ ॥ ब्राह्मणजातांभिक्षेसीं ॥ अतीतआलाद्वारापासीं ॥ अग्निसारिखातेजोराशी ॥ पाहुनीतयासीसकळिकें ॥ ५० ॥ भासेजैसाचंडकीर्ण ॥ ऐसाकधींनआलाब्राह्मण ॥ पाहतांउल्हास लेंमन ॥ महातपोधनतोचीएक ॥ ५१ ॥ ह्मणती कायआलारमापती ॥ किंवा धाडिती झालीपार्वती ॥ आमुचेंसत्वपाहावें चित्तीं ॥ ह्मणोनीयेती शंकर ॥ ५२ ॥ स्नुषाएकापाठीएक ॥ भिक्षाघालिनी सकळिक ॥ आशिर्वादें संतोष मुख ॥ आल्यादेख गृहामाजी ॥ ५३ ॥ चिरकाळसौभाग्यप्राप्ती ॥ तुमची वाढेल संतती ॥ होईलसकळांउत्तमगती ॥ ऐसेंह्मणती द्विजराज ॥ ५४ ॥ ऐकतां अतीतभाषण ॥ माता ह्मणे गुणवतीलागुन ॥ तूंही भिक्षाघालीनेऊन ॥ ऐकतां मनसंतोषे ॥ ५५ ॥ कुमारिकाभिक्षाघालित ॥ अतीतानमनकरीत ॥ तों आशिर्वादकायबोलत ॥ धर्मवती ह्मणततूंचि होसी ॥ ५६ ॥ ऐसेंऐकतांकानीं कन्येनें ॥ सांगेमातेसींजाउनी ॥ तुझियापुत्रस्त्रियांलागुनी ॥ सौभाग्यवती ह्मणोनी बोलिला ॥ ५७ ॥ मजलागीं ह्मणे धर्मवती ॥ ह्मणोनि दुःखउपजे चित्तीं ॥ मातेनें ऐकतांनेत्रपातीं ॥ लावुनीचित्तीं स्थिरावली ॥ ५८ ॥ थोडावेळस्वस्थ राहुन ॥ मगकन्येसीं हातीं धरून ॥ पुन्हाभिक्षा ब्राह्मणालागुन ॥ घालवी आपणसमस्त ॥ ५९ ॥ नमनकेलें ब्राह्मणासीं ॥ धर्मवती होह्मणे तियेसीं ॥ ऐसें ऐकतां मातेसीं ॥ खेदमानसी वाटला ॥ ६० ॥ धनवतीने ऐसें ऐकून ॥ विचारित्ये अतीतालागुन ॥ सांगामजलीहे भगवान ॥ कायह्मणोनि ऐसेंबोलिला ॥ ६१ ॥ माझ्या सुनानीं नमस्कार केला ॥ त्यांला अविधव्य असें बोलिलां ॥ सुखकारक संपत्तीसकळां ॥ कन्येलादीधला विपरित ॥ ६२ ॥ यांतील कायकारण ॥ तेंमजकराजी निरूपण ॥ ऐसें ऐकतां ब्राह्मण ॥ बोलेवचनपरियेसा ॥ ६३ ॥ मज अंतरीं मतरणानसे ॥ अवधेंमजलासमभासे ॥ परीजिलाजैसायोग्यअसे ॥ तैसादेतसें आशिर्वाद ॥ ६४ ॥ हीधर्मवतीकैसीहोय ॥ इच्याप्राक्तनीं आहे काय ॥ सांगामजला द्विजराय ॥ ह्मणोनिपाय धरियेले ॥ ६५ ॥ तूंअससीविकाळज्ञानी ॥ सकळठावें तुजलागुनी ॥ ह्मणोनि विचारी मशास्त्रमनीं ॥ नकोचोरू

नीठेउभीतां ॥ ६६ ॥ इचें लग्नजेव्हां होईल ॥ तेव्हां विघ्न संचरेल ॥ काळपा-
शयेउनीटाकिल ॥ घेऊनिजाईलपतीतें ॥ ६७ ॥ सप्तपदीच्याआंतजाण ॥ होई
लघ्नतारप्राणहरण ॥ ह्मणोनिआशिर्वादभाषण ॥ धर्मवती ह्मणोनकेलेंअसे ॥
६८ ॥ मगंब्राह्मणस्त्री अश्रुटाकित ॥ अतीतालागींउपाय पुसत ॥ कांहीमंलासां
गाजीत्वरित ॥ दृढधरीतचरणातें ॥ ६९ ॥ मगबोलेतपोधन ॥ यलअसेतयालागुन
॥ कवण्याप्रकारें तोकरींश्रवण ॥ वैधव्यजाणनयेची ॥ ७० ॥ कोणीएकस्त्रीसद
य ॥ अतिकोमलजिचेंहृदय ॥ सोमानामें देईलअभय ॥ मगनसेभयकाळाचें ॥
७१ ॥ तियेआणोनिसदनांत ॥ पूजनकरावें प्रेमयुक्त ॥ तरीसौभाग्यराहीलसत
ता ॥ पावेलचित्तसमाधान ॥ ७२ ॥ धनवती विचारीतया ॥ सोमाराहेकोणत्याठा
यां ॥ कोणजातीअसेतया ॥ सांगेविप्रसयामजआधीं ॥ ७३ ॥ आतांनलावी
उशीर ॥ सांगामजलाझडकर ॥ तयाचाउपायसत्वर ॥ कोणानिर्धारआह्मांसीं ॥
७४ ॥ ऐकोनि बोलेद्विजोत्तम ॥ सोमाजातीरजकीण उत्तम ॥ सिंहलद्वीपामाजी
जिचेंधाम ॥ परमउत्तमसतीती ॥ ७५ ॥ तयेसीआणावीत्वराकरून ॥ मग करा
वाविवाहसंपादन ॥ ऐसेंअतीतेंसांगून ॥ गेला आपण निघोनी ॥ ७६ ॥ त
याउपरीधनवतीजाण ॥ पाचारीसप्तपुत्रांलागुन ॥ तयांसांगेसर्ववर्तमान ॥
अतिथींसंपूर्णवदलातें ॥ ७७ ॥ पुसोंलागलीतयांप्रती ॥ भगिनीसवैधव्य-
तुमच्याचित्तीं ॥ नसावीतरीमाझी वचनोक्ती ॥ ऐकोनि त्वरितगतीतुह्मींजावें
॥ ७८ ॥ सिंहलद्वीपामाजीजाऊन ॥ आणावेंसोमेलागुन ॥ तयेचेंकरितांपूजन
॥ वैधव्यनाशनहोतसे ॥ ७९ ॥ मायबापावरीनिष्ठा असे ॥ तया वचनपाळावें
हें मनीं असे ॥ तोची आणील ऐसें मजभासे ॥ पुत्रपरिसें तोचिमाझा ॥ ८० ॥
ऐसें मातेचें ऐकूनिवचन ॥ पुत्रह्मणती तिये लागुन ॥ मीती आमुचीभगिनीव
रीजाण ॥ कल्याणपरिपूर्णइच्छितसों ॥ ८१ ॥ परंतु आह्मींकायगेकरावें ॥
शतयोजनसागरकैसेंजावें ॥ तयापैलतिरीं द्वीपसमजावें ॥ कैसेंउल्लंघावें सिं
धूतें ॥ ८२ ॥ आमुचेंतयेस्थानींजाणें ॥ कवणाच्या हातून नाहीं होणें ॥ हें मा
तेमनींसमजणें ॥ नलगेविनवणेंअगाधु ॥ ८३ ॥ मायपुत्रांचींभाषणेंहोत ॥ इतु
कीयामाजीगृहीं येत ॥ देवस्वामीअकस्मात ॥ जाहलेंश्रुत सर्वही ॥ ८४ ॥

ऐकतांकुमाराचेंभाषण ॥ देहसंततप्तजाहलाजाण ॥ मजलासप्तपुत्रअसून ॥ शोकदारुणकरिसीतूं ॥ ८५ ॥ आजीमीअसेंनिपुत्रिक ॥ तूंतिळमात्रनकरींशोक ॥ सिंहलद्वीपींचामींपाहतोंलोक ॥ आणितोंदेखसोमेतें ॥ ८६ ॥ ऐसें सक्रोधबोलतांवचन ॥ तेंपित्याचेसुतानीऐकोन ॥ कनिष्ठपुत्रस्वयेंआपण ॥ शिवस्वामीजाणउठिला ॥ ८७ ॥ मगबोलेबापालागुन ॥ मीजीतअसतांजाण ॥ ऐसेंबोलतांकांकोपोन ॥ संतोषमनराखावें ॥ ८८ ॥ ऐसेंवदोनिमायबापातें ॥ नमनकरूनीतयातें ॥ भगिनीशीं घेऊनिसांगातें ॥ सिंहलद्वीपातेंनिघाला ॥ ८९ ॥ कांहींदिवसपंथकरीत ॥ उभयतांसिंधुतिरप्रतियेत ॥ तीर्थराजपाहुनी भयभीत ॥ झालेंचित्ततयांचें ॥ ९० ॥ चारलक्षयोजनेंजलपूरित ॥ भरलें असे अपरंमित ॥ पैलतीरकैसेंहोयप्राप्त ॥ ईश्वरसंकेतकवणजाणें ॥ ९१ ॥ ईश्वराचीलीला अगाध ॥ कवणालागेनयाचाशोध ॥ कैसें आहे आपुलेंप्रारब्ध ॥ कोणसुबद्धसांगेआह्मां ॥ ९२ ॥ परमचिंतेनेंव्यापिलेंमन ॥ अश्रुढाळिती दीनवदन ॥ नाहींउतरावयासींसदन ॥ जवळींभक्षणाकांहींनसे ॥ ९३ ॥ ऐसासमयजाहलाप्राप्त ॥ कोणीनसेसोयराआप्त ॥ क्षुधेनेंशरीरजाहलेंतप्त ॥ विश्वंभरगुप्तपासमया ॥ ९४ ॥ महाभयानकसागर ॥ कोणकरीलपैलपार ॥ ऐसावारंवारविचार ॥ चिंतामगरसोडीना ॥ ९५ ॥ तेथेंवटवृक्षदेखिला ॥ तयाच्छायेसींउतरला ॥ भगिनीसींह्मणेउपायमजला ॥ नसुचेजायालापैलतिरा ॥ ९६ ॥ आजघडलाआह्मांउपवास ॥ नमिळेयेथेंभक्षावयास ॥ परमेष्ठीनेंलिहिलेंभाक्तनास ॥ करितांसायास मिळेचिना ॥ ९७ ॥ ऐसेंजेकांबोलतीसकळ ॥ गृध्रपक्षांचेऐकतीबाळ ॥ अंतरींलागलीबहुतळमळ ॥ पडलीं विकळपक्षीपिलें ॥ ९८ ॥ वटवृक्षावरी कंटकाचें ॥ गृहहोतेंगृध्रपक्षांचें ॥ मायबापेंगेलींबाळकांचें ॥ उदरभरणाचें आणावया ॥ ९९ ॥ अस्तमानहोतां जाण ॥ गृध्रआलाचाराघेउन ॥ शिशुमुखींघालीआपण ॥ नकरितीभक्षण बालकें ॥ १०० ॥ तेव्हांतोपक्षीचिंतातुर ॥ मनींजाहलाअनिवार ॥ पुत्रांसीं ह्मणेयेवढानिर्धार ॥ केलाअनिवारकासया ॥ १०१ ॥ चोंच्याशींजाहलाउशीर ॥ ह्मणोनिरागआलाफार ॥ किंवाकायसंकटतुह्मांवर ॥ नेणेंपारमींकांहीं ॥

२॥ प्रातःकाळापासून उपवास॥ ह्मणोनि आणिलें कोंमळमास ॥ मुखी घालिगांनघ्याघास॥ सांगेकारणास कायतें॥ ३ ॥ तेंऐकोनीबाळें बोलती ॥ वृक्षालागींमानवअसती॥ अन्ननमिळेनयांपती॥ उपोषितअसतीचार प्रहर॥ ४ ॥ तयांयकूनिआपण॥ कैसेंकरावेंमांसभक्षण ॥ ऐसें ऐकतांव-चन॥ कळवळेमनगृध्राचें॥ ५ ॥ करुणाझालीउत्पन्न॥ गृध्रतयांपासींयेवो न॥ ब्राह्मणाशीह्मणेकायकारण॥ झालेंआगमनयेथवरी ॥ ६ ॥ तुमचेंकार्यकायआहे॥ तेंमीकरीनलवलाहें॥ भोजनकरूनिस्वस्थराहें॥ माझेंवचन नोहेअसत्य॥ ७॥ ऐसेंतयांचेंभाषण॥ ऐकतां बोलेब्राह्मण॥ सिंधूच्या पैल तीरालागुन॥ जाणेह्मणोनपातलों ॥ ८ ॥ भगिनीच्यावैधव्याचानाश॥ कर णे आहे आह्मांस॥ ह्मणोनिजाणेंसिंहलद्वीपास॥ रजकीसोमासआणाव-या॥ ९ ॥ ऐसें परस्परें भाषण॥ होतांगृध्रह्मणे तयांलागुन॥ तुह्मींआतां क रावेंभोजन॥ प्रातःकाळीनेईनमी तुह्मां॥ १०॥ नेईनसोमेच्यागृहाप्रती ॥कां हींखेद नकरावा चित्ती॥ कंदमुळें आणोनितयांदेती ॥ पक्षीजातीस्वस्था-ना॥ ११ ॥ मगआपल्याशिशूंस ॥ मांसदेतीखावयास ॥ भक्षूनिस्वस्थमान स॥ राहातीसुखांत शावक॥ १२ ॥ प्रातःकाळसमयहोतांजाण॥ भगिनी सहविप्रपाठीघेउन॥ गृध्रगगनपंथलक्षून॥ गेलाघेउनपैलतिरा ॥१३ ॥ सोमेच्यागृहासींनिर्धारीं॥ द्विजपोंचविलातेअवसरीं॥ आपणपरतोनिआला वयवरी॥ पावलाश्रीहरीतयांतें ॥१४ ॥ तयेस्थानींजाउनी ब्राह्मण ॥रजकीगृहानजीकजाउन॥ गुणवतीसह आपण॥ सेवा करून स्वस्थ असें ॥ १५ ॥ प्रतिदिनी प्रातःकाळीं उठोन॥ सोमेच्याअंगणाप्रतिजाउन॥ करूनिसडासं मार्जन॥ येती परतोनिस्वस्थाना ॥ १६ ॥ ऐशाप्रकारें सेवाकरीत॥ होतीएक संवत्सरपर्यंत ॥ पुढेंपाहिलेंअकस्मात॥ कोणकरीत ऐसें हें॥१७॥ मग पुत्रांसहस्नाषाशी ॥ सोमाबोलावी सर्वांसी ॥ सडासंमार्जनअंगणासीं ॥ घालीरांगोळीशीकोण हें॥ १८ ॥ तेव्हांसकळ बोलती जाण ॥आह्मींकरीत नाहींसडासंमार्जन॥ नदेखों करितेकोण॥ आश्चर्येमन भरलें तिचें ॥१९ ॥ सोमा लागलीजपणीशी ॥जागरण करीत बैसलीनिशीं॥ पाहिलेंगुणवती

सीं॥ करितांसंमार्जनासीं तयेठायीं ॥२०॥ मगपुसेतयांलागुन॥ तुह्मींआ ह्मांकोठीलकोण॥ तव्हांसांगती तियेलागुन ॥ आह्मीं ब्राह्मणसुलं असों॥ २१॥ ऐसेंऐकतांकानीं ॥ दुःखजाहलें तियेलागुनी ॥ मीमहापापाची खाणी ॥ कोणानिर्वाणीं मजतारीं॥ २२ ॥ मीं महाहीनजातीची ॥ योनि पावल्येंर जकाची॥ आतांसेवाघेतलीब्राह्मणाची ॥ पुढीलजन्माचीगती कोण॥२३॥ ऐसीदुःखेंकरूनी विव्हळ ॥ लागली जिवाशीं तळमळ॥ ह्मणेब्राह्मणाशी वे ळोवेळ॥ ढकलिलें केवळपापदरीं॥ २४॥ अंतःकरणझालें विरक्त॥ कैसी हो इलअघमुक्त॥ कवणतारीलईश्वरभक्त॥ करावीसंगतकवणाची॥ २५॥ तूं उत्तमजातीब्राह्मण॥ मीं अत्यंतपापिष्ठ रजकीण ॥ तूंयेथें करिसी सडासंमा र्जन॥ याचें कारण सांगेमज॥ २६॥ मगशिवस्वामी बोलत॥ गुणवती भगि नीच्या भक्तनांत॥ सप्तपदीमाजी वैधव्यप्राप्त॥ ऐसेंबोलतद्विजोत्तम॥ २७॥ तूंअसतां तयाजवळीं॥ वैधव्यनयेकोणेकाळीं॥ ह्मणोनिगुणवतीवेल्हाळी॥आ णिलीझडकरी तुजपाशीं॥ २८ ॥दुःस्वप्नपडतांजाण॥ करावेंजैसें विष्णुस्मरण ॥ तैसेंआह्मीं तुजलागुन॥ विघ्ननाशनआठवूं तुज॥२९॥ अनुजेसी वैधव्य न- यावे ह्मणून॥दास्यतुझ्यागृहीं करितोंजाण॥ ऐसें विप्रवाक्य ऐकून ॥ बोलेरज- किणतयांप्रती॥ ३०॥तुह्मींयेवोनीनीचगृहासीं॥ हें काजयोग्यनसेतुह्मासीं॥ आतानकरी ऐसीयासीं॥ येतेगृहासीं तूमच्या॥ ३१॥मगवाड्यामाजी जाउन॥ करिती स्नुषालागीं भाषण॥ मी विप्रांकडे जाऊन॥ परतयेईनतोंवरी॥ ३२॥ माझ्याराज्यामाझारीं ॥ कोणी मृतेपावलाजरी॥ तरीतयादहनकरीं॥ अथवा नपुरीं भूमीतें॥ ३३ ॥तयाचेंअनेकउपायेंकरून॥ तुह्मीं करावेंरक्षण॥मीब्रा ह्मणाचें कार्यकरून॥ येतेंपरतोनलवकरी॥ ३४ ॥ ऐसेंसांगोनतयांसीं ॥ आप णनिघाली वेगेंसीं॥ विप्रपुत्र कुमारीसीं॥ घेऊनिसागरासीं उल्लंघिलें॥ ३५॥ एकक्षणमात्रेंकरून॥ आलीकांचनपुरीलागुन॥ तयाधनवतीनें पाहुन॥ के लें पूजनसोमेचें॥ ३६॥ तियेउतरावयायोग्यजागा ॥ देती झालीती सुभगा॥ क न्येचें वैधव्य जाईलभंगा॥ स्नानदगंगावाहातसे॥ ३७ ॥उबगलीही कुमारपणा सीं॥ वरपाहुनी आणाइसीं ॥ ह्मणोनिमायबापें शिवासीं॥ धाडिती वेगेंसीं धुं

डाक्या॥ ३८॥देशोदेशफिरत फिरत॥ अकस्मात आला उज्जनींत॥ तेथें दे-
वशर्मा ब्राह्मण वसत॥ तयाचा सुत पाहिला॥ ३९॥ तया रुद्रशर्म नाम असे॥ म
हागुणवान श्रेष्ठ भासे॥ स्वरूपें मति सूर्य जैसा दिसे॥ ऐसा नसे दुजा कोणी॥
१४०॥ भगिनीस योग्य वर मिळाला॥ मुहूर्ताचा निश्चय केला॥ वरा घेउनी स्वन
गरा आला॥ विवाह नेमिला उत्तम दिनी॥ १४१॥ देवस्वामीनें कन्येसीं॥ पा-
हुनीयां मुहूर्तासीं॥ देता झाला रुद्रशर्म्यासी॥ लाविलें लग्नासी ब्राह्मणें॥१४२
॥ विप्रें विवाह होम केला॥ सप्तपदी सप्रारंभ जाहला॥ तों रुद्रशर्मा मरण पाव-
ला॥ आक्रांत मांडिला सर्वांहीं॥ १४३॥ बांधवासह वर्तमान॥ माता पिता करि
रूदन॥ सर्व दुःखें झाले दीन॥ ऐसें पाहुन सोमेनें॥ १४४॥ त्या गुणवती कन्ये
जवळ॥ संकल्पपूर्वक सकळ॥ व्रताचें अर्पिलें फळ॥ आयुष्य सबळ दीधलें॥
४५॥ त्या पुण्य उदकें करून॥ उठिला निद्रिस्ता समान॥ भीष्म सांगे धर्मालागु
न॥ ऐकतां समाधान वाटलें॥ ४६॥ दरिद्र्यासीं लाधला चिंतामणी॥ साधूसि
आनंद इश्वरभजनीं॥ तैसें मायबापालागुनी॥ सुख सेजे लागूनि पहुडली॥
४७॥ सोमेनें विवाह लावला तडीस॥ व्रत सांगीतलें ब्रह्मपुत्रीस॥ आपण-
विचारुनी सर्वांस॥ आपुल्या नगरास निघाली॥ ४८॥ मार्ग करूनी सोमा जा
त॥ इतुक्यामाजी जालें विपरीत॥ पुत्र तीचे होते सात॥ जाहले मृत सर्वही॥
॥ ४९॥ तदनंतरें तिचा भ्रतार॥ मरण पावला निर्धार॥ जामात होता धुरंधर
॥ येवोनि किंकर असुनेती॥ ५०॥ ऐसें सोमेच्या गृहांत॥ पुण्य जातां वर्तलें
अद्भुत॥ तों मार्गांत आलें सोमवतीव्रत॥ तेथें करीत सोमा ती॥ ५१॥ मग
नदी तीरालागुन॥ सोमा निघाली करावया स्नान॥ तों इतुकिया माजी मार्गी-
जाण॥ बोले येऊन वृद्ध स्त्री॥ ५२॥ माथां ओझें जड होत॥ उतरावया नाहीं को
णी दिसत॥ ह्मणोनि आली रडत॥ सोमा जात तथे ठायीं॥ ५३॥ ह्मणे मुली
माझ्या मस्तकावर॥ कापसाचा फार झाला भार॥ येउनी जरा रखाली उतर॥
ऐकतां उत्तर सोमा दे॥ ५४॥ ऐकें स्त्रियें आदिवा दिन॥ अमावास्या सोमवार
जाण॥ ह्मणोनि मीं तुजलागुन॥ न शिवें आपण सर्वथा॥ ५५॥ ऐसें तियेसीं
बोलत॥ तों दुजी स्त्री आली अकस्मात॥ बोजा माथां जड होत॥ ह्मणउन सांग

त सोमेसी ॥ ५६ ॥ मुळांचाभाराउतरसी जरी ॥ तरीउपकार होईल मंजवरी ॥ मींतयातेंस्पर्शनकरीं ॥ सांगोनीनदीतिरींपातली ॥ ५७ ॥ मगकरूनिस्नाना- सीं ॥ आलीअश्वत्थमूळापाशीं ॥ षोडशोपचारेंशिवाशीं ॥ पूजूनिप्रदक्षि णेसीलागली ॥ ५८ ॥ वाळवेंचेंअष्टशत ॥ खडे घेतले हस्तांत ॥ प्रदक्षिणेस ए कवाहात ॥ केल्याअष्टशतऐशारिती ॥ ५९ ॥ फळपुष्पउदकेंकरून ॥ व्रतस मासकेलेंजाण ॥ मगनिघालीतेथून ॥ पातलीजाणस्वगृहा ॥ ६० ॥ तोंअन र्थमांडलागृहीं ॥ पुत्रएकहीजीतनाहीं ॥ पतिमुकलाप्राणासही ॥ गेलाजांव ई परलोका ॥ ६१ ॥ उदयपावतांचंडकीरण ॥ तमजायनिरसोन ॥ तैसेंसोमेचें होतांदर्शन ॥ येतीप्राणकलेवरीं ॥ ६२ ॥ दरिद्रेंप्राणीपीडितां ॥ यक्षरायकि- ल्लीयेतहाता ॥ मगजोकांआनंदचित्ता ॥ नयेवर्णितां अगाधू ॥ ॥ ६३ ॥ तैसेंझा लेंसर्वांसीं ॥ दुःखनराहेमानसीं ॥ पारनसेचीसुखासीं ॥ सौभाग्यवृद्धीसीपाव लें ॥ ६४ ॥ गृहामाजीजेजाहलेमृत ॥ तेउठलेअकस्मात ॥ स्नुषांलागींविस्मय- होत ॥ वाटेअद्भुतसकळिकां ॥ ६५ ॥ नगरामाजीजेजेजन ॥ कोठेंनेलेप्राणह रून ॥ तेहीनिद्रिस्तासमान ॥ उठलेजाणसकळिक ॥ ६६ ॥ ऐसेंआनंदाचेंपर्व काळीं ॥ सकळपाहेतीसुखसागरीं ॥ उठलीदुःखाचीलहरी ॥ गेलीएकसरींवि रोनियां ॥ ६७ ॥ सप्तपुत्रस्त्रियाउठोन ॥ जींसासूमातेसमान ॥ जिणेंअसुदिध लेंदान ॥ पतींलागुनआपुलिया ॥ ६८ ॥ तिच्याचरणीं ठेवूनिशिर ॥ ह्मणतीकै साझालाविचार ॥ नेणोआह्मींपामर ॥ सांगासाचारवर्तलेंतें ॥ ६९ ॥ हेसर्वत्रअ सतां मृत ॥ आतांकैसेझालेजित ॥ ऐसेंसतीसींपुसत ॥ सोमाबोलतऐकातें ॥ ७० ॥ हें मृत होण्याचें कारण ॥ मजपाशीं होतेंव्रतपुण्य ॥ तेंब्रह्मकन्यकेकेलेंअ र्पण ॥ तेव्हांऐसेंजाणाविघ्नआलें ॥ ७१ ॥ तेथूनिनिघतांत्वरित ॥ मार्गीआलेंसो मवतीव्रत ॥ तेंसांगकरितांउठत ॥ अकस्मातसर्व ही ॥ ७२ ॥ स्वप्नामाजीभयान क ॥ व्याघ्रसिंहादिदेतीदुःख ॥ जागृतीपाहतांनष्टसकळिक ॥ आपणएकउरेची ॥ ७३ ॥ तैसायाव्रतेंकरूनी ॥ स्वप्नवतमृत्युभासलामनीं ॥ आणितयाव्रताच्या दिनीं ॥ नेमनिष्ठेनेंचालिल्यें ॥ ७४ ॥ स्पर्शल्येंनाहींतूळासीं ॥ तयापरीजाणमुळाशीं ॥ गेलेंअश्वत्थापाशीं ॥ आराधिलाविष्णुसींमनोभावें ॥ ७५ ॥ जोकांलक्ष्मीचापती

॥ मूर्तीतयांनीआणोनिचित्तीं ॥ शंखचक्रगदापद्महातीं ॥ पूजिलाभक्तीमानसीं ॥ ७६ ॥ श्यामसुंदर अतिकोमळ ॥ आपादमस्तकावैजयंतीमाळ ॥ भृगुलांछनेंशोभेवक्षस्थळ ॥ कौस्तुभविशाळगळ्यामाजी ॥ ७७ ॥ ऐसेंआपादमस्तककरूनि-ध्यान ॥ मगंकेलेंलौकीकपूजन ॥ अश्वत्थमुळीं विष्णुस्मरोन ॥ षोडशोपचारें पूजनकेलें ॥ ७८ ॥ अष्टशतवाकूचेंखडेहातीं ॥ घेउनीघातलीसोमवती ॥ एकशतअष्टप्रदाक्षणाचित्तीं ॥ नसोडीश्रीपतीकदांही ॥ ७९ ॥ विष्णुपूजनजे करिती ॥ तेपावनत्रिजगती ॥ ऐसेंसाधुसंतजनबोलती ॥ तयाचीप्रतीती मज आली ॥ ८० ॥ तयाचेंकुळींहोयवास ॥ यमदूत नशिवे तयास ॥ पन्नगें पाहतांगरुडास ॥ भीतमानस काळ तैसा ॥ ८१ ॥ ऐसें पुण्यकारकव्रत ॥ ह्मणोनिसमस्तझालेजीत ॥ हें तुह्मींकरितां पुनीत ॥ कालनिश्चितसर्वही ॥ ८२ ॥ ऐसें ऐकतां भाषण ॥ गुणवतीसमाधान ॥ मगब्राह्मणालें बोलावुन ॥ व्रतसंपादनत्यांहिकेलें ॥ ८३ ॥ तयारजकगृहींजाण ॥ व्रतावांचून नाहीं कोण ॥ पुत्रपौत्रादिसंपत्तीविपुलधन ॥ आयुष्यवर्धनसर्वांसीं ॥ ८४ ॥ तयानगरामाझारी ॥ विधवानसेकोणीनारी ॥ संततीसंपत्तीसर्वांघरीं ॥ पापवैरीवसेचिना ॥ ८५ ॥ ऐसेंव्रतकेलें धरोनीप्रीती ॥ सर्वगेल्याविष्णुलोकाप्रती ॥ भीष्मधर्मातेंसांगती ॥ ऐकतांपुरुषतीमाघुती ॥ ८६ ॥ कौंतेयह्मणेगंगात्मजा ॥ यव्रताचिविधिसांगेमहाराजा ॥ पुरुषांकिंवा स्त्रियांनीं पूजा ॥ करितांप्रजासुखपावे ॥ ८७ ॥ मगपितामहसांगती ॥ सोमवारशुक्लअमाअसती ॥ तयालागीं पुण्यकाळ ह्मणती ॥ देवादिकांप्रतिदुर्मिळ ॥ ८८ ॥ तयादिनीप्रातःकाळीं ॥ उठोनिस्नानाजावेंसकळीं ॥ तीर्थराजअसतांजवळी ॥ दुसऱ्यास्थळींनजावें ॥ ८९ ॥ दूरअसेजरीसागर ॥ तरींन्हावेंगंगानीर ॥ कृष्णावेण्याभीमातीर ॥ तीर्थेसुंदरशरयू ऐसीं ॥ ९० ॥ अथवा-भागीरथीचेंस्नान ॥ किंवायमुनातिरींजाऊन ॥ सरस्वतीक्षिप्राउज्जन ॥ गोदा-स्नानकरावें ॥ ९१ ॥ तापीनर्मदाचंद्रभागा ॥ करवीरीं असे पंचगंगा ॥ गौतमी-गंगोत्रीपापभंगा ॥ पावनजगाकरितीत्या ॥ ९२ ॥ ऐसींअनेक तीर्थें असती ॥ जाणेनघडे जयाप्रती ॥ तेणेंनदीनालेउदकेंवाहती ॥ सरोवरें असतीन्हावया ॥ ९३ ॥ परीसीतोदकस्नानास ॥ करितांशुद्धिहोयदेहास ॥ मगधरोनीमौनव्रतास ॥

काजळकुंकुमाससेवावें॥ १४ ॥ उत्तम वस्त्रपरिधान ॥ ल्यालूपितांबरआदिक रुन॥ संपूर्णपूजासामग्रीघेऊन॥ करावेंगमनअश्वत्थीं॥ १५ ॥ मगतयामु ळाचेठाईं॥ विष्णुतेंस्मरोनीहृदयीं॥ ब्राह्मणमुखें पूजासर्वही॥ तयेंठायीं करावी॥ १६ ॥षोडशोपचारें पूजन॥ लक्ष्मीसहीतनारायण॥ वस्त्रालंकार भूषण॥ सौभाग्य संपूर्ण अर्पावें॥ १७ ॥ केशरकस्तुरीचंदन॥ नानापरिमळ अर्पून॥ पुष्पेंसंपूर्णवाहुन॥ करावेंपूजनशुद्धभावें॥ १८ ॥ जाईजुईमालती बकुळ॥ चमेलीमोगराकेवडा सोज्वळ॥ केतकीगुलाब कोमलबिल्वदळ॥ अ र्पीसकळनानाजाती ॥ १९ ॥ सुरंगआणीचंपक॥ पुन्नागनिरवाळीदेख ॥ क र्दळी कमळसुरेख॥ पुष्पेंअनेकजातीचीं॥ २०० ॥ तांबूलआणीदक्षिणा ॥श्री फळदेउनीप्रदक्षिणा॥ मंत्रपुष्पनमस्कारजाणा॥ करूनिप्रार्थना विष्णूची॥ ॥१॥ ॥ मंत्रः ॥ ॥व्यक्ताव्यक्तस्वरूपायसृष्टिस्थित्यंतकारिणे॥ आदि मध्यांतहीनाय।विश्वरःअवसेनमः ॥ १ ॥मूलतोब्रह्मरूपायमध्यतोविष्णुरू पिणे॥ अग्रतःशिवरूपायअश्वत्थायनमोनमः॥ २ ॥ ॥ इतिमंत्रः॥ प्रदक्षिणाअष्टशत॥ द्रव्यानेंतितुकेंचिपरिमित॥ सोमवतीसघालावें संम त॥ व्रतराजबोलतनिश्चयें॥ ३ ॥ हिरेमाणिकेंमोतीजाणा॥ पाचूपन्हामणी सुवर्ण॥ पोवळीरवरेवें विरोध्यासंपूर्ण ॥ अर्पावेकरून दागिने॥ ४ ॥ भां डींघालावीअष्टशत॥ वस्त्रेंद्यावीसौभाग्ययुक्त ॥ फळफळावरअपरिमि त॥ पक्कान्नेंअद्भुतअर्पावीं॥ ४॥ जेंजेंसोमवतीसींअर्पावीं॥ तेतेंअष्टशत समजावें॥ प्रदक्षिणाहोतांवायनद्यावें॥ पूजनकरावें विप्राचें॥ ५ ॥प्रद क्षिणाद्रव्यजेंकांअसे ॥ पुरोहितावीणअन्याचेंनसे॥ तयाअर्पुनीसंतोष मानसें॥ पुढेंकेसेंवर्तावें॥ ६ ॥सौभाग्यद्रव्येंकरून॥ करावेंसुवासिनीपूज न॥ ब्राह्मणसुवासिनीभोजन॥ घालुनीसमाधानकरावें॥ ७ ॥ तांबूलदक्षि णादेऊनितयासीं॥ मगआपण बैसावें भोजनासीं॥ पतिआज्ञेमाजीअह र्निशी॥ असतांतयांसींसुखहोय॥ ८ ॥ हेंस्त्रियानींव्रतकरावें॥ संतती संपत्तीतेंपावावें॥ विष्णुपूजनकरितांजीवेंभावें॥ मुक्तिस्वभावेंप्राप्तहोय॥ ९ ॥ तरीहें व्रत तूं आपण॥ द्रौपदीसुभद्राजाण॥ सांगेउत्तरेलागुन॥

संततीवर्धन होय तुझी ॥ १० ॥ ऐकूनि भीष्माचें वचन ॥ व्रतसांगी तलें-स्त्रियांलागुन ॥ प्रश्नकरी कुंतीनंदन ॥ करितीसमाधान पितामह ॥ ११ ॥ जेकां असतीदरिद्रीजन ॥ नसेजयापासींकांहीं धन ॥ त्यांहीकैसेंकरावेंपूजन ॥ करीनि वेदनमजंलागीं ॥ १२ ॥ पत्रेंपुष्पेंकरूनिपूजितां ॥ संतोषहोयभगवंता ॥ तोकेवळ अनाथाचादाता ॥ तारकजगतातोचिअसे ॥ १३ ॥ गजेंद्रासीपुष्पेंकरून ॥ सोडविलानक्रापासुन ॥ मुक्तिदेउनीपावन ॥ केलाजाणजयनियंतें ॥ १४ ॥ द्रौपदीचेंभक्षितांपूर्ण ॥ मुक्तकेलीदुर्वासापासुन ॥ कण्याविदुरग्रहींसेउन ॥ केलापावनतयासी ॥ १५ ॥ ऐसाजोकांदीनदयाळा ॥ तयापुरेतोयफळ ॥ यथाशक्तीपूजितांनिरमळ ॥ नकोहळहळकरावया ॥ १६ ॥ जयापाशींधनधान्य असे ॥ तोपूजनकरितांतैसें ॥ देवासिसमजेपरियेसें ॥ कपटमिषेंपूजिलें ॥ १७ ॥ जयापासीनंसेकांहीं ॥ तोजेंद्रव्यप्रदक्षिणेसींवाही ॥ तेउत्तममानीसर्वही ॥ ऐसापाहींश्रीहरी ॥ १८ ॥ सूतनैमिषारण्यींसांगती ॥ शौनकादिकसंतोषती ॥ तैसीब्राह्मणसुखेंकथाऐकती ॥ तयांसुखप्रामीहोतअसे ॥ १९ ॥ हेंव्रत भीष्मेंसांगितल्यावरून ॥ कुंतीसुतेंस्त्रियांसीसांगून ॥ करविलेंद्रौपदीआदिकरून ॥ झालेंसंतानवंशामाजी ॥ २२० ॥ जैसाउगवतांदिनमणी ॥ प्रकाशेसकळमेदिनी ॥ तैसापुत्रउत्तरेलागुनी ॥ त्रैलोक्यभुवनींविजयीजो ॥ २१ ॥ नामतयाचेंपरिक्षिती ॥ भारतवंशींउजळलीज्योती ॥ शोभाआलीसदनाप्रती ॥ आनंदचित्तींसर्वांच्या ॥ २२ ॥ भांडारखोलुनीधन ॥ धर्मकेलाब्राह्मणालागुन ॥ वस्त्रालंकारभूषण ॥ संतोषविलेंमनसर्वांचें ॥ २३ ॥ ऐसेंव्रताचेंमहिमान ॥ ऐकतांहोतीपावन ॥ करितांसंततीसंपत्तिहोउन ॥ पावतीजनसुखातें ॥ हेंव्रतज्यास्त्रियाकरिती ॥ त्यापावतीविष्णुलोकाप्रती ॥ म्हणोनिकरावेंभावभक्ती ॥ लाधेलमुक्तीतयासी ॥ २५ ॥ ऐसीहीकथासुरस ॥ भीष्मसांगेधर्मासा ॥ तीप्राकृतभाषेंसर्वांस ॥ कळतांव्रतासआचरती ॥ २६ ॥ ऐसेंमनींआणोन ॥ कथाप्रकटकेलीजाण ॥ सकळजगाचेंकल्याण ॥ होतीपावनसर्वही ॥ २७ ॥ हेंव्रतराजग्रंथसार ॥ अबलांसीअसेआधार ॥ संततीसंपतीसर्वसुखकर ॥ पावतीलपारभवनदी ॥ २२८ ॥ इतिश्रीसोमवतीकथासमाप्त ॥



# अथ सोळासोमवारकथा प्रा०

श्रीगणेशायनमः ॥ ॥ वैदर्भदेशीपरमपवित्र ॥ अमरावतीनामेंएकनगर॥ तेथेंशिवालयमहाथोर॥ जेंकांअपूर्वत्रिभुवनीं ॥ १॥ तेथेंकोणेएकेकाळीं॥ शिवपार्वतीएकेस्थळीं॥ उभयतांयेऊनीदेउळीं॥ सहजस्थितीक्षणएक॥ २॥ स्थलरमणीयदेखोनी॥ पार्वतीह्मणेशूलपाणी॥ सारिंगपाटमांडोनी॥ खेळूंअसेंवाटतें॥ ३॥ मगशिवह्मणेआवश्यक॥ डावमांडिलासम्यक॥ तेथें गुरवपुजारीहोताएक॥ त्यासींगिरिजाकायबोले॥ ४॥ हाडावकोणीजिंकिला॥ सत्यसांगेंयेवेळां॥ तंवतोगुरवबोलिला॥ शिवेंजिंकिलाह्मणोनी॥ ५॥ मगदुसराडावमांडिला॥ खेळतांपार्वतीनेंजिंकिला॥ अंबाह्मणेअसत्यगुरव बोलिला॥ तरीतोकोडीहोईल॥ ६॥ असत्यबोलसीपापराशी॥ वेगेंघेईंमम शापासीं॥ तुजकुष्टहोईलसर्वांगासीं॥ विलंबयासींनलागे॥ ७॥ यापरीगुरवा शापुनी॥ उभयतांगेलींकैलासभुवनीं॥ गुरवपाहेअवलोकुनी॥ अंगकांतीपालटली॥ ८॥ गुरवमनींचिंताकरी॥ हाजाईलकैशापरी॥ कोडअंगींदुःखकरी॥ कवणउपायययासीं॥ ९॥ तंवतेथेंअप्सरासुंदरी॥ घेवोनीपूजासामग्री॥ पूजावयाशिवगौरी॥ देउळाभीतरीपातली॥ १०॥ तिनेंपुसलें गुरवातें॥ तुजकोडझालेंकोण्याअर्थे॥ गुरवबोलेभयभीतचित्तें॥ गिरिजेनेंमजशापिलें॥ ११॥ हें ऐकोनिअप्सरासुंदरी॥ ह्मणेगुरवातूंचिंतांनकरीं॥

सोळासोमवारव्रतनिर्धारीं॥ करितांव्यथाजाईल॥ १२॥ मगनोवळोनीपूजाक री॥ करजोडोनी विनंतीकरी॥ मातेहें व्रतझडकरी॥ मजउकलोनी सांगिजे॥ १३॥ अप्सराह्मणेअवधारीं॥ तूंसोमवाराचेंव्रतकरीं॥ दिवसाअसावेंनिराहारी॥ सायंकाळपावेतों॥ १४॥ मगत्यादिवशींसायंकाळी॥ सांगपूजावाचंद्रमौळी॥ धूपदीपइत्यादिसकळीं॥ षोडशोपचारींपूजावा॥ १५॥ मगअर्धशेरक णिकघेइजे॥ त्याचेभागअंगारतीनकीजे॥ घृतगुळें सहित भक्षिजे॥ लव णारहितजाणपां॥ १६॥ ऐसेंसोळासोमवारव्रत॥ चालविलेयथास्थित॥ हें ज्ञालियासमास॥ सत्रावेसोमवारींकरावीं॥ १७॥ कणिक घेईपांचशेर॥ त्याचेभागअंगारेसमस्त॥ घृतगुळेंसीपरिकर॥ चूर्मातयाचाकरावा॥ १८॥ तोचूर्मादेउळींन्यावा॥ भावेंचंद्रमौळीपूजावा॥ तिसराभागअर्पावा॥ सदाशि- वाशीतेधवां॥ १९॥ दुसराभागदेउळींवांटिजे॥ उरला एकघराआणिजे॥ तोआ पणस्वतः भक्षिजे॥ कुटुंबासमवेतआदरेंसीं॥ २०॥ अप्सराह्मणे अवधारीं॥ गु रवातूं हें व्रतभावें करीं॥ कुष्टजाईलनिर्धारीं॥ सत्यसत्यत्रिवाचा॥ २१॥ ऐकतांगु रवधरिताजाला॥ अंतःकरणापासूनिआचरला॥ पूर्वदशाअंगपावला॥ स- मासीझोनांच कुष्टजाय॥ २२॥ याउपरी एकेदिनीं॥ ईश्वरपार्वती मिळोनी॥ फि रत फिरतमागुत्यानीं॥ त्याचीदेउळींपातली॥ २३॥ पूर्वीगुरवासीशाप दीध- ला॥ तेंस्मरणझालेंपार्वतीला॥ साक्षेपेंपाहेगुरवाला॥ नवकुष्ट अंगीं दिसेना॥ २४॥ पार्वतीपुसेगुरवाप्रती॥ तुझाकुष्टगेलाकवणेरीती॥ येरू बोलेयथार्थ निगुती॥ श्रेष्ठव्रतासींआचरलों॥ २५॥ सोळासोमवारव्रतकरूनी॥ तोषवीलीं शिवभवानी॥ त्यांचियेकृपावलोकनीं॥ अंगीचाकुष्टलोपला॥ २६॥ उमाऐकोनी आश्चर्यकरी॥ एवढीयाव्रताचीथोरी॥ मी हेंव्रतआचरेननिर्धारी॥ षण्मुख रुसलाह्मणोनियां॥ २७॥ मगहिमनगजाव्रतआचरी॥ पूर्णव्रताचे अव सरी॥ स्वामीकार्तिकमनींविचारीं॥ मातेसींरुसणें अयोग्य॥ २८॥ स्वा- मीउठोनीतात्काळीं॥ धांवोनिआला मातेजवळी॥ पाहोनिउमासंतोषली॥ आनंदचित्तींनसमाये॥ २९॥ स्वामीबोले जननीसीं॥ माझेमनींन राहा वेंतुझेपाशीं॥ ह्मणोनि असतांअरण्यवाशीं॥ दिवसकांहीं लोटले॥ ३०॥

विहरतो विहरोपरीतो ॥ कां आमुची कुलसती असतीपरीतो ॥ राखीन का निजयशोमय हंसराया ॥ आलों महीवरि फिरादअशी कराया ॥ १२ ॥ मीं गुंतलों नळमहीं द्रगुणौघपाशीं ॥ सर्वेसिहीं मगकरोनि नयाचपाशीं ॥ आलोंकुनीकवणया चतुराननाचे ॥ लोकेशना विभवही चतुराननाचे ॥ १३ ॥ गंगोदकीं घडिघडी सबुडीस देतों ॥ पंखासिंसीतळकरूनितसाचि येतों ॥ तेणें नळासिं करितों मगवींजनातें ॥ वाळेतसानधरितो सुरतश्रमातें ॥ १४ ॥ एकांतलेखनहिवाचनहीकरीतो ॥ मार्झीतनू द्युतिसमीपनदा घरीतों ॥ याकारणें नळमलाबहु आसमानी ॥ तो सांगतां निजमनोरथहोय कानीं ॥ १५ ॥ आधींचनैषधकथानवनीतभेला ॥ होतां भलंकरणरूपइन्च्या जिभेला ॥ हंसोदयें विघरतां अधरींधरीते ॥ स्वीकारितां वचनतें मगआदरीनें ॥ १६ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ नळें तुजसीं एकांतकाय केला ॥ तोचिऐकाया जीव हाम्रुकेला ॥ तयाबोलोनीं निवर्वियाम्रुकेला ॥ ऐकवावें मजाम्रगुनिनायकेला ॥ १७ ॥ नळासीं जोएकांततुझा तोकां ॥ प्रगटकीजेम्यां सांगइतरलोकां ॥ धन्यडोलेनकरोनितदालोकां ॥ नळकथनेंहें कर्णधन्यहोकां ॥ १८ ॥ निषधराजीं हें फारदिसेराजी ॥ असें हंसें जाणोनिमनामाजी ॥ बोलिजेलीनळराजकथाहेजी ॥ भला हे जीवत्यासिह्मणे हेजी ॥ १९ ॥ नळह्मणालामजसरळधरुनिबाहीं ॥ तुला कोठें ही बंक अटक नाहीं ॥ सकळभुवनें तरिफिरुनिराजगेहीं ॥ एकनवरीमजयोग्यबरीपाहीं ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ ॥ एकांतहाचवदलातुजजाणबाळे ॥ तूं सांगतोवरतुला रुचला रंसाळे ॥ येणेंपरीपरिसतांचतयाअनन्या ॥ तेबालतेचतुरसुंदरराजकन्या ॥ २१ ॥ मींजाणदेव नळहीस्वकरीं धराया ॥ सांगेनकायचतुरामजलाजजाया ॥ काळें करूनि सुरक्जोंवरिहोय लेखीं ॥ हेंबोलणेंरवंगमनीं उभयार्थलेखीं ॥ २२ ॥ श्लेषशब्देंदुणेंभावसांगीतला ॥ नैषधाधीश तो नाथमागीतला ॥ होयजाणीयलीघेवपा कंबुला ॥ हंसबोलावयाहालवींचंचुला ॥ २३ ॥ गांठ्याळजें हृदयसांध्रनहोयजाचें ॥ नामें निदेवनळकार्यनसे तयांचें ॥ धत्तूरहीकनकनामसदाधरीतो ॥ होईलकायरसिको कनकापरीतो ॥ २४ ॥ तेबोलतेयुवतिलाजमनींदडाली ॥ होतीतुचांबिधरितांसमु

कींउडाली ॥ आतांवरूनकवरासि तुलानवाजूं ॥ गाजूंतुझीस्तुति करू-
निकशासलाजूं ॥ २५ ॥ परिसुनिवचनातेंजेंह्मणेबोलिजेलें ॥ पतगकुलवतंसें
अंतरींध्याइजेलें ॥ परवशहृदयाहे नैषधेंराजहंसें ॥ ह्मणउनिसमजताहे बोलि
जेराजहंसें ॥ २६ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ जशीरंजलीसतूं निषधभूपीं ॥ तसातोहीरं
जलातुझ्यारूपीं ॥ दैवघटनेअन्योन्यव्हालसोपी ॥ तुह्मी नांदालसत्यहें निरो
पीं ॥ २७ ॥ कोणयोजावीनोवरीनळाला ॥ ब्रह्मदेवेंजैंह्याविचारकेला ॥ तुझ्या-
नामाक्षरसंघघेइजेला ॥ असेंभासतसेमाझियामनाला ॥ २८ ॥ ॥
श्लोक ॥ ॥ नळरहितवरासींतूंजयोजूंनिपाहे ॥ तरिमगविधिऐसा कोणतो
मूढआहे ॥ अचतुरनरतोहीजाहल्याजेविताकीं ॥ सळमिसळकरीनासर्व-
थाहीरताकीं ॥ २९ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ कशालाहे बोलणेंकाययेणें ॥ तुवांवरि
लानळराजतूंहितेणें ॥ सफळमाझेहेंयेथवरीयेणें ॥ राजकन्येनीरोपमलादेणें ॥
३० ॥ चतुरसुंदरतोतरुणनिषधराजा ॥ तूंवांराजीकेल चतुंधराजा ॥ धन्यवैदर्भी
दैवयोगतूझा ॥ बोलमानीमनींयथार्थमाझा ॥ ३१ ॥ जाउनिऐसेंतूं बोलराजहंसा ॥
तुझीदासीजाहलेंराजहंसा ॥ नकोचिंतातूं करूं अरिध्वंसा ॥ ऐकशुभ्रांशु
वंशाजावतंसा ॥ ३२ ॥ नकोपाहूं तूंनोवरीनळासीं ॥ मींचभावेंहोईनसत्यदासी
॥ जरीयावेंआतांचितयापाशीं ॥ गोष्टि भासे विपरीत लौकिकांसी ॥
३३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ करुनिमजरवानाराजसे तूजसाठीं ॥ नृपनि
निरखिमाझीवाटआरामवाटीं ॥ बसवुंनिनिजपाठीं तूजनेईन तेथें ॥ परिचु
कुरतुझेहे लोकहोतील येथें ॥ ३४ ॥ येरिकडे नृपति धाडुनि राजहंसा ॥ तो
बैसलाकरित आपण तत्प्रशंसा ॥ येईलशीघ्र घटना करुनि ति येची ॥ होईल
भेटिमजआजतयेप्रियेची ॥ ३५ ॥ आरामींविरहोत्करें तरुतळींयाराकरो
नीत्वरें ॥ वाराघेतबसे तपें तपनसा तारापतीनिश्चयें ॥ माराचाशरमार नाव
रिह्मणेवारा घडेती कशी ॥ हाराजीवदलाक्षमाधवजनो-ह्याराक्ष्पाहोअशी
॥ ३६ ॥ तोंचिन्हें शुभपाहुनी नृपह्मणे लाभेललाभावळी ॥ आलासन्मुखरा
जहंस निरखी बाहू स्फुरे डावळी ॥ बोलेमंजुळवाक्य येथबसलोंलावूनत्वत्प्या
नेरे ॥ झालेंवृत्तसमग्रसांगुनिकरीं हंसासमाधानरें ॥ ३७ ॥ ॥ दिंडी ॥

कायवदलीतुजसबें हंसराया॥ मान्य झालीकीं तीमला वराया॥ कधींभेटे ल निजकरींधराया॥ विरहबाधामजनयेआवराया॥ ३८॥ हंसबोलेनृपराज सगुणसारा॥ माळघालीतेतीतुलाउदारा॥ तुझ्याध्यानींजाहलीजेविंबारा ॥सत्यमानीती होय तुझीदारा॥ ३९॥ जाईनगरादूं नृपा रूपाराशी॥ध्ययेतां चीजास्वयंवरासी॥ स्वयेंदेत्येंचालूनि मंदीराशी॥ फार वदणे नळगेसुरवो त्करांसीं॥ ४०॥ वरेंयेतों म्हणोनिपायहातें॥ नसुनिचालेसप्रेम तो गृहातें॥नृप निघालासहचमूनिजपुरातें॥ हंसध्यानींलावूनिअंतरातें॥ ४१॥जनकतनये सींपवन तनयसा तो॥ वदुनिवेगींउड्डाणनभीं घेतो॥ नळापाशींवृत्तांतनिवेदी तो॥ स्वधामातेंपावेनिसुरवी होतो॥ ४२॥ असोऐसीहेकथासोरसाची॥श्रव णकरितांबहुगोडगमेसाची॥ धन्यलीलात्याएकनैषधाची॥ प्रकटवाणीरघु नाथपंडितांची॥ ४३॥भसोआल्याइजजवळिसख्याऐशा॥बोलतातीम गतीससकळक्लेशा॥ हंसधरुनिपरिपूर्णतुझीआशा॥ कायगेलातोउडुनि गगनदेशा॥ ४४॥ ॥ श्लोक ॥ ॥धरुनिकरसखीनींसौधशालेंतने- ली॥ खगवचनमधूनें जेमनीं मोहिजेली॥ नळविरह भरानें पोळली गुप्तरूपें॥ नवलकनकशीतेगौरहीतसरूपें॥ ४५॥ होणारजोवरतदीयवियोगदाही॥ सांगावयासहिनयेलपवावयाही॥यासांगवीमदन लाजनसांगवीतें॥कींयादु हींत शिरणेंमजरंगवीतें॥ ४६॥ नरंजेंकारंजेंनिरखुन फणीते फणाफणी॥ सुदिनेमोदेना नळगुणगणीजेंगुणागणी॥ नबैसेजेशेजे बरिनपरिसेजेझळकगि रा॥ ननाहेमानाहेनधरिललना हेवुदुसरा॥ ४७॥ लज्जावती युवतिहे वडि लांसिधाकें॥ झांकीनसेविरहपावकतोनझांके॥ जोपंजरींलपविलाबसनां तराळीं॥ तोझांकिलागगनदीपतरीझळाळी॥ ४८॥तिचमनींनळमनोभव वीरहोतो॥ होतांतयासिंकथिलेंजथिलें अहोतें॥ त्याहींच तेदुखविलीसुत नूनिजेली॥मूर्छावती निजजनीं अवलोकिजेली॥ ४९॥ गजबज बहुझाली मायधांवोनिआली॥ धरुनहृदयदेशीं तीजलासेजकेली॥ करितिविंझणवा रे त्यासरव्यावेगळाल्या॥ वडिलवडिलदायाजाणत्याही मिळाल्या॥ ५०॥ ॥ ॥आर्या॥ ॥ तेशीतलोपचारीं, जागीझाली हळूच मग बोले॥

थीचब्दलगेमनला, परिसुनिजननीबरेह्मणुनिबोले॥ ५१॥ ॥ दिंडी॥ ॥
हलकंपवर हे जाहलीइयेला॥ पाहिजेकींवरयोग्य पाहिजेला॥ असेंऐकोनीवधू
चियाबोला॥ सैंवराचामगयत्ननृपेंकेला॥ ५२॥ नमरसारें शृंगारविलेतैसें॥
भूमिलोकीं वैकुंठदिसे जैसें॥ लिखितपाठविलेंसकळनृपांकेसें॥ तुह्मीयावेंजी
सैंवरासिऐसें॥ ५३॥ निषिधराजासीं लिखितपाठवीलें॥ प्रतिद्विपींभूपतीस
हीलिहिते॥ व्यशायलीलागलानृपअहोतो॥ पुढेंपरिसावृत्तांत कसाहोतो॥
५४॥ ऋषीनारदअसतांनभोविहारी॥ दिसेवैजयंतीजयामनोहारी॥ मणी
रमणीय कनक कलशभारी॥ सुरपतीचाजोसौधमहाभारी॥ ५५॥ तयाप्रा
सादींजायऋषीपाहे॥ सभाकेली देवेंद्र बैसलाहे॥ फारआदरिलेंतयादेवरायें
॥ अर्घ्यपाद्यादिककरुननिविनतकायें॥ ५६॥ ॥ श्लोक॥ ॥स
मुद्रोद्भवा अप्सरासाठिकोटी॥ जयांची द्युती तेरतीलाहि लोटि॥ विधीनेंतशा
तुळूं पाहिजेल्या॥ जियेसीहळू जाहल्या उंचगेल्या॥ ५७॥ उपवर दमयंतीजा
हली नोवरीते॥ कवणवरकळेना हें जयातें वरीतें॥ हृढ तर निजलज्जा गव्हरीं
सिंह केला॥ जिवलग हिसखीला जो नसे सांगिजेला॥ ५८॥ ॥दिंडी॥ ॥
नवेतरणें नृपवर तीजसाठीं॥ मोहिलेते करितात यत्नकोटी॥ कलहवार्ता
ही मानितातिपोटीं॥ तयायुवतीची आज्ञतया मोठी॥ ५९॥ असें नारद
बोलोनितोनिघाला॥ जाय हृदयासीं मानत्या स्थळाला॥ घोरचिंतामग
होयसुरेंद्राला॥ ह्मणेकेसीतेवरिलआपणाला॥ ६०॥ वरुणपावक यम-
इंद्र हे मिळाले॥ असेंचौघेही रथारूढझाले॥ महीलोकासीं यावयानि
घाले॥ तया कुंडिन नगरासिमिप आले॥ ६१॥ ॥ श्लोक॥ ॥तंवत्या
चौघासतयापंथीं॥ निषधनायक येत दिसे रथीं॥ तरुणसुंदरजोचतुराग्रणी
॥ अतुलवैभवराज्य शिरोमणी॥ ६२॥ निरखुननिषधेंद्रा इंद्रतो बोलताहे॥
युवति उभयतां हि लभ्यआह्मांस नोहे॥ वरिलजरिनळाला ते तयालाभ
लीजे॥ नवरितरि अह्मांसिमूढ ते कायकीजे॥ ६३॥ नळातेंपाचारीसु
रपति विचारी कुशलतो॥ ह्मणे आह्मांपाशीं नवगुरु विलासी निवसतो॥
खुणात्याच्या ज्याच्या तुजजवळिराजानिरखितों॥ खरातूं तद्देशीं ह्मणउ

नितदंशीसमजतो॥ ६४ ॥ तो वन्हि तो वरुणतो यमइंद्र गामी॥ झालों तुलाविदित हे सकळस्वस्वामीं॥ बोले महीरमणहा नळचंद्रवंशी॥ वंदीं पदांसतुमच्या तुमचाच अंशीं॥ ६५॥ ॥ दिंडी ॥ ॥ नळाकोठें जातोसि असें बोले॥ नळें इंद्रासी असें बोलिजे लें॥ भीमभूपें हें लिखित पाठविलें। सैंवरालातूं येइजे बहीलें॥ ६६॥ बोलतां हें देवेंद्र नृपवराला॥ नैषधातूं आलासि सैंवराला॥ समज आम्हीं तुजजवळियाचि नेला॥ करूं आलों मन धरुनि कामनेला॥ ६७॥ ॥ श्लोक॥ ॥ जे हे दिशांपति विशालयशांतशाला॥ आशावशा कुवलयांत दशा कशाला॥ हाबोल तूं नवदतूं जसमीप येतों॥ आम्ही मरवीं निजमुखीं अवदान घेतों॥ ६८ ॥ केला विचार हृदयीं नकराजयानें॥ हाजीव ही धन हि देइन निश्चयानें॥ देवेंद्र देजरि ह्मणेल कदापि भैमी॥ ते देववेलमज काय करी नगे मी॥ ६९॥ ॥ दिंडी॥॥ ह्मणे राजेंद्र तया देवदेवा॥ काय आज्ञा जी काय करूं सेवा॥ वीरसेनाचा थोर पुण्य ठेवा॥ मज मिळाला तो दर्शनाख्य मेला॥ ७०॥ ॥ श्लोक॥ ॥ बोले सुराधिप नराधिपती सराया॥ भैमी जशी मज वरील तसें कराया॥ बोलाबयास तिजशीं तिचिया घराजा॥ तूं बोल का चतुर केवळ कायराजा॥ ७१॥ मग हळुच सुरेंद्रा बोलिजे भूपतीनें॥ मज निज स्वमनाची घातली माळ तीनें॥ हृदय तरि तियेचें सांद्र झालें सुवासें॥ चळिजन करवे तें कोणत्याही प्रयासें ॥ ७२ ॥ ॥ दिंडी ॥ ॥ पुनः बोले देवेंद्र नृपवराया॥ तुला झालें वश हृदय तिचें राया॥ तरिच आलो हे याच्ना कराया॥ तुझ्या वाक्यें आम्हां सिते वराया॥ ७३॥ ॥ श्लोक ॥ ॥ दातव्य ही स्ववश आपण जाणताही॥ पर्याहि उत्तर वदे न वदे च कांहीं॥ दाता असा शठ कसा ठकसा कदावी॥ जो याचकाव रिदयान करीच पापी॥ ७४ ॥ गहिंवरत गळाला हीचा वळे जीभवाळे॥ विकळपण शरीरीं कंपही या निराळे॥ धनिक विमुख होतां अंतरीं शोक राहे॥ हरहर मज भासे यातना यान्यना हे ॥ ७५॥ भांबावला धनमदें भलतेंच बोले॥ तो बोल ही सरस मानुनि लोक डोले॥ मांसें करूनि फुगला गळसाच भावें॥ ज्या दीनमीन धरितां वळसाच पावे॥ ७६॥ ॥

॥ दिंडी ॥ ॥ असेपरिसोनी बोलवासवाचे ॥ तयानळराजा कायवदे वाचें ॥ तुह्मींजाणतेयोरथोरसाचे ॥ असासाक्षीही माझिया मनाचे ॥ ७७ ॥ ज्यासिंजेथेंसामर्थ्यनसेत्यातें ॥ कसेंतेंकार्यतुह्मीं सांगिजेलें ॥ बाळ ताऱ्हें उचलील कायजांतें ॥ बोलणाराचेंमोलकायजातें ॥ ७८ ॥ साताबंकाहीं पलीकडे होतें ॥ राजकन्येची भेटकशी होत्ये ॥ त्यजुनिराज्यत्वदूतताकरशी तें ॥ धरावीम्यात्ह्रदयास ज्याकशीते ॥ ७९ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ बोले सुरेंद्र नृपसौध सुखें फिराया ॥ आकार गुप्तवरदेइन देवराया ॥ जाईं विदर्भव सुधेससुतेसशोधीं ॥ आह्मासिंते तरिवरील तुझ्याचिबोधीं ॥ ८० ॥ ॥

॥ घनाक्षरी ॥ ॥ इंद्र त्रैलोक्यनायक ॥ तोही झालासे याचक ॥ दाक्षिण्यानें भूपाळक ॥ यांच्यावाक्येंगुंतला ॥ ८१ ॥ बरें ह्मणोनी उत्तरें ॥ रथावरोनीउतरे ॥ नयाराजपुरींफिरे ॥ शोभातेथील पाहे ॥ ८२ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तोजाहलास्थिरवरदूतभावीं ॥ मानीचना युवतिच्या विरहासभावीं ॥ कुंभोद्भवें तरिमहोदधिपान केलें ॥ दुर्वारवाडवसिरवेसनमानिजेलें ॥ ॥ ८३ ॥ आपापरीच ह्रदयीं नगरांसरी तो ॥ गुप्तस्वरूप नल रूप तदा धरीतो ॥ बंकीं रिघे तवतया दिसताति बंके ॥ पंकेंरुहास्य नदिसेच तयान शंके ॥ ८४ ॥ ॥ घनाक्षरी ॥ ॥ नयाराजसौधांतरीं ॥ शोभापाहे परोपरी ॥ कोठें आहे ते सुंदरी ॥ धुंडावयालागला ॥ ८५ ॥ कोणीएक दोघी दूती ॥ तेथें अन्योन्य बोलती ॥ येथें आहे दमयंती ॥ जाईं बोलोनी येई ॥ ८६ ॥ तिजसवेंसौधांतरीं ॥ राजा जाय अंतःपुरीं ॥ तेथें देखिली सुंदरी ॥ जैसा पूर्णचंद्रमा ॥ ८७ ॥ स्मरमनसेजेच्या पलंगीं ॥ बैसलीसे तन्वंगी ॥ सख्यारखेळताती संगीं ॥ बहुअप्सराजैशा ॥ ८८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ प्रगटतिजपुढारांजाहलाराजमौळी ॥ पदरवरनघेतां हारतैसा झळाळी ॥ निजह्रदयानिवासी काय बाहेरि आला ॥ निरखुनिदमयंतीते विंमानीतयाला ॥ ८९ ॥ गजवजोनितिच्यासमस्तसख्या ॥ गजगती उठल्यातिजसारख्या ॥ पदरसांवरितांनृपबाळिका ॥ झळकती ह्रदयीं मणिमाळिका ॥ १९० ॥ ॥ कोप्पीएकसखी विलोकुनिनळस्तोपीश्वरामोहिली ॥ कोणीतत्तनुकांतिसिं

घुपतीत द्रोणि परीपों हिली ॥ कोणीहामजला न नाथ ह्मणुनीलोणी नशी पाझरे। कोणीएक तयास लाजुनि विरे कोणी वियोगें झुरे॥ ११ ॥ शमातेंजन कक्षमापतिसुतारामाजशीरे वती॥ कामारीसनगाधिराजतनया कामंसिजे शीरती॥ यामानूनितशी विदर्भ दुहितारामामनीभाविते ॥ ह्मामाझ्या हृदया- असूर्य ह्मणुनी त्या मानिनी बोलत्ये ॥ १२॥ ॥ साकी ॥ ॥ कोणतुह्मीक वणाचे. कोठुनियथें आलांहो ॥ कायनिमित्तें दिधलामजला ॥ निजदर्शन लाहो॥ अटकनकेली तुह्मांसियेतां, साताही बंकीं ॥ हीमाझ्यानयनाचीं सुकृतें॥ विशेषमींशंकीं ॥संभवलीकवणाचे वंशीं ॥ सांगाअकलंकी ॥ उ भेअसाकांभागतसा, बैसापर्यंकीं॥ १३॥ ॥ श्लोक ॥ ॥राजेअसा लतरिधन्यवसुंधरा हे॥ शोभालदेव तरिनाकयथार्थ आहे॥ भोगीतुह्मीउप जलाजरिनागलोकीं ॥ खालींअसोनिसकळां वरिहायतो कीं ॥ १४ ॥ ॥ साकी॥ ॥दुग्धपूरनसतां निजरूपीं॥ क्षिर सिंधुतो जैसा॥ वसंतआला नाहींतरितो उद्यानभागजैसा॥ अमृतकराचा उदयन होतां, रजनिसमयजे सा॥ तुमच्या विरहें आणिजाहला॥ कवणदेशऐसा॥ १५ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ भूपाळजोमजमनो मुकुरींउभासे॥ तोनैषधेंद्र तुमचा अनुबिंबभासे॥ रूपेंतरीचदिसतात दिगंतराळीं ॥ तीहींकसीं ह्मणाविती ल तुह्मां निराळीं॥ १६॥ ॥ साकी॥ ॥सरसद्युतिपदफुल्लसिरसाचे. मृदुफुललेस्वभा वें॥ चालवाल कितिदूरतयातें॥ अदयत्हदयभावें ॥कर्णयुगुल हें धन्य- करावें॥ सांगुनि निजनावें स्तवनकरीरघुनाथतयांचें ॥ कवनआंदरावें॥ १७॥ ॥ श्लोक॥ ॥तुजवरिमीनईचेयापरी कांइयेला॥ त्यजसिसुमशरा नें हाअसाबोधकेला॥ तृणगणगणिजैसें त्यासिधैर्यगणीतो ॥ युवतिसमग बोलेराजचूडामणीतो॥ १८ ॥ आहेसकींसुखवती कमनीयनीले ॥ निश्चिं तकीं त्हदय होयतुझें सुशीलें॥ आतांनकोचअवलंब विलंबनाचा॥ हे जीव मीं समज सुरव्यसुराधिपाचा ॥ १९ ॥ जोधरी निजकरी शतकोटी ॥ ज्यासि नमसुमनः शतकोटी॥ तोसुरेंद्रहि तुलानतयाची ॥ हाअसो वरतुलान तयाची ॥ २०० ॥ ॥ घनाक्षरी॥ ॥तयाइंद्राकरींधरीं ॥ अथवा

तयाचें वोजारीं॥नादें तपोनिधीभारी॥ तयावरी राजसे ॥ १ ॥ तोहीयेईनाजरीमना ॥ तरीवरवेंशमना॥ अथवा करूनि करुणा॥ त्यावरुणा करीकीं॥ २ ॥ ऐसें बोलतां भूपाळा॥ कायबोलेतेवेल्हाळ॥ कांहीबोलतां पाल्हाळ॥ नामकुळसां गावें॥ ३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ बोलेनृपाळ पुससीमजवंशनामें॥ याबीणसांग नटलीं तुझिं कायकामें॥ आलोंसुधांशुसुखिजे घटनाकराया॥ तीतें विचा रुनिवरींस्फुरलोकराया॥ ४ ॥ ॥ घनाक्षरी॥ ॥ बोलेसुंदरीतयासीं॥ स्ववंशनामनसांगसी॥ तरी आह्मीपरपुरुषासीं॥ वदणेमर्यादानोहे ॥ ५॥ तिचा पाहूनियांकोप ॥ कायबोलेनळ भूप॥ चंद्रवंशाचें हें रोप॥ माझेंजाण राजसे॥ ६॥ महाजनाचाआचार॥ निजनामाचाउच्चार॥ करूंनयेहेंसा चार॥ शास्त्राधार आहेकीं ॥ ७ ॥ पुन्हाबोलेतेसुंदरी॥ चंद्रवंशीमहीवरी॥ बहू आहेततेपरी॥ नामेंघेतांजाणावे॥ ८ ॥ ॥ आर्या॥ ॥ मींवासुदेवऐसें स्वनाममुरहरवदेसकळवेदीं ॥ आधारतोचिमानुनि निजाभिदानासकवण ननिवेदी॥ ९ ॥ ॥ घनाक्षरी॥ ॥ बोलेनैषधेंद्रवाचा ॥नामहेंजीवइंद्रा चा॥ कितीसाक्षेपनामाचा॥ कायतेणें करिसीतूं ॥ १० ॥ केलाकायअंगिका र॥ बोलूंइंद्रासीं निर्धार॥ तंवतेबोलेसुकुमार॥ चंद्राकारवदना॥ ११ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ऐरावतावरिबसोनि विमानदेशीं॥ जोसंचरेसुरपतीसुरव संपदेशीं ॥ मींभूमिकेवरिअसोनितयासिकांहीं ॥ मागावयातरिकशीम जलाजनाहीं॥ १२ ॥ ॥ घनाक्षरी ॥ ॥ नळावेगळाक्ष्मतार॥ नलगेस्व- प्नीं हेंसाचार॥ ऐसानिश्चयविचार॥ तंवराजेंद्रबोलतो ॥ १३ ॥ टाकुनिइं द्राचा संभ्रम॥ धरिसीतूं कांनळभ्रम॥ जांई विश्रामविभ्रम॥ नसताश्रम होईल॥ १४ ॥ तुझें सौंदर्यपहावया॥ धरीसहस्त्रासकाया॥ तयावरीं देवरा या ॥ नळमायाटाकूनी॥ १५॥ अथवा तुजतोमोहला ॥ होऊंनेदीनैषधाला ॥ यास्तवत्याचइंद्राला॥ माळगळांघालावी ॥ १६ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ येणेपरींवअनळासियमाधिशासीं ॥ पाशीसहीतरिवरी ह्मणतांनृपासीं॥ आधारलेशनवदे नवसारसाक्षी॥ होतेनयासिसुरनायकशुभसाक्षी॥ १७ ॥ ऐसाअवंचकंवदोनिनृपाळआला ॥ इंद्रादिकांसहिनिवेदितवृत्तझाला

॥ पाचारिलेमगमहींद्र विदर्भभूपें ॥ आलेसमस्तहिसभेसिसहर्षरूपें ॥ १८ ॥ ॥ घनाक्षरी ॥ ॥ इंद्रादिकतेहि आधीप ॥ धरूनि आलेंनव रूप ॥ सभेवैसलेअमूप ॥ जेथेंभूपशोभती ॥ १९ ॥ आलानळहीभूपाळ ॥ कीर्तीरूपेंजोविशाळ ॥ नदादमयंतीवेल्हाळ ॥ सखियांसीं बोलते ॥ २२० ॥ नळराजहिरावरिला ॥ तोचिमनींम्यां धरिला ॥ सुरकिंवानरभला ॥ नवरिं- त्यातें निश्चयें ॥ २१ ॥ ऐसेंबोलोनीसुंदरी ॥ बैसे शिबिकेभीतरी ॥ आलीरा जसभांतरीं ॥ बरोबरीशारदा ॥ २२ ॥ बोलेशारदातियेला ॥ ऐकेंराज्यांच्या नामाला ॥ मनायेईलतयाला ॥ माळगळां घालीतूं ॥ २३ ॥ ॥ श्लोक ॥ हाराजाऋतुपर्णनामधरिताहारावळीकंधरी ॥ हाराहेशरभूसमीपनगरींहा राजसे आदरीं ॥ हाराजीवदलाक्षसद्गुणनिधीफाराजनांचामहा ॥ थाराहा चिवरींरीपूंसिपरते साारावयाचापहा ॥ २४ ॥ येणेंपरीचबहुभूप निवे दिजेले ॥ हीच्यामनासचिनयेनिठगेचिठेले ॥ जेथेंबळीधरुनिपंचनळीवसे तो ॥ तेथें विरंचितनयंसमवेतयेतो ॥ २५ ॥ ॥ घनाक्षरी ॥ ॥ बोले- शारदावचन ॥ येथेंबाईसावधान ॥ बरेंघालूनियांमन ॥ वरलाभें सुखीहो ॥ २६ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ज्यांचीपदें धरितीदेवशिरोललामी ॥ स्वाग ज्यतोमिरवितो गजराजगामी ॥ जोंवज्रपाणि बहुलोचन कांतिभारी ॥ हापाहिजेतरिवरीं नळरूपधारी ॥ २७ ॥ साहील कोणासजणें बहुतेजया चें ॥ मध्यस्थरूपधरितो हरिचेंयमाचें ॥ स्नेहाधरीअधिक होयनमासिं वारी ॥ हापाहिजेतरिवरींनळरूपधारी ॥ २८ ॥ संपूर्णतेसमजयास्तवब्र स्मिणाशा ॥ पाप्यांसदंड धरिता करितो विनाशा ॥ देहींजयामिरवतेघन कांतिभारी ॥ हापाहिजेतरिवरीं नळरूपधारी ॥ २९ ॥ आधारहाचिसज- जणे बहुजीवनाचा ॥ रक्षीवयेंकरूनिमान ऋषींस्वगचा ॥ यादांसका र स्तपाती बहु सौख्यकारी ॥ हापाहिजेतरिवरीं नळरूपधारी ॥ ३० ॥ होतील नंदनविलासजयासतोहा ॥ आहेधनंजयहि धर्म हिजाणतोहा ॥ रत्नाकरींतुजविराजविनाविहारी ॥ हापाहिजेतरिवरींनळरूपधारी ॥ ३१ ॥ शारदेस्तमगराजसुनाहे ॥ शारदेंदुवदना वदताहे ॥ शेवटींलनळ

हा मजबाई॥ मानला मज मनीं सुखदाई ॥३२ ॥ ॥घनाक्षरी॥ ॥
तेव्हां दमयंतीसुंदरी ॥ इंद्रादिकां नमस्कारी॥ तयांबोललीउत्तरी॥ अमृ-
तापरीसमधुर॥ ३३ ॥ माझा भीम जैसा पिता॥ तैसे तुम्हीं जी तत्वतां ॥
कराकन्यादान आतां॥ नळनाथाचे करीं॥ ३४ ॥ ॥ श्लोक॥ ॥सुर
समरुइच्यावरनिश्चयें ॥ सुरसमस्त असें वदले स्वयें॥ नळवरासि वरो
नि सुखी असें॥ तुजन कोजन कोण ह्मणे असें॥ ३५ ॥ मावेचना सुखमनी
कमनीयबाला ॥ मायेसहीविसरलीनपुसेचिबाला॥ दुर्वादळीकदलिबं
धमधूकमाळा॥ तीणें अलंकृतकरीं नळकंठनाळा॥ ३६ ॥ ॥ घना-
क्षरी ॥ ॥चौघेश्रेष्ठसुरवर॥ देतेझाले अष्टवर॥ मस्तकींठेवोनीकर॥ दो
नदोन एकेकें ॥ ३७ ॥ देऊनियांतयांवर॥ स्वर्गभुवना गेले सुर॥ निराशहो-
वोनि नरेश्वर॥ जाते झाले स्वस्थाना ॥ ३८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥नृपाळा
चे मांडीवरि बसुनी मांडी हरखिते॥ तयां पाहों आले जन सकळ झाले हरि
खते ॥ महावाद्यें नाना निदहित नाना मग घडे॥ पिता तीचा पांटी भर घन हि
वांटी बहु विडे॥ ३९ ॥ ॥ घनाक्षरी ॥ ॥नानापरीचें मिष्टान्न॥ चा
रीदिवसभोजन॥ वधूवरें मिरवून॥ घरभरणी करविली ॥ ४० ॥ राजानि
रोपातें घेत॥ मग दमयंतीसमवेत ॥ आपुल्या नगरातें जात ॥ नांदे आनं
दभरानें ॥ ४१ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ लोकीं सौरभ काव्य नाटक क-
लालंकारचूडामणी॥ सर्वा नैषधविद्दोषध असे विख्यात वाग्घोरणीं
॥ हे त्यांचीन्चदिका टिकोनि घटिका ऐकेल जो आदरें ॥ बोले त्या रघुना-
थपंडित कवी भेटे हरी सादरें॥ ४२ ॥ इति रघुनाथपंडितविरचित
नलदमयंती स्वयंवर आख्यान समाप्त ॥ ७ ॥ ॥ ७ ॥



## ॥ अथ दानचरित्रप्रारंभः ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ आर्या ॥ ॥ एकेसमयीं श्रीहरि, भामेच्चेमं दिरीं करीक्रीडा ॥ तों भासे स्वस्त्रीला, गर्वाची बहुतजाहलीपीडा ॥ १ ॥ ओंवी ॥ ॥ यासिउपायकरावाकवण ॥ ऐसाविचार करीश्रीकृष्ण ॥ तोंड् तुक्यांत ब्रह्मनंदन ॥ द्वारावतींत पानला ॥ २ ॥ ॥साकी ॥ ॥ एकसमेंश्रीवि धिसुतनारद, द्वारावतीमों आया ॥ निरखप्रभूकी भागबडाई, अतिसुखम नमोंपाया ॥ ३ ॥ ॥ आर्या ॥ ॥ मुनितें पाहोनिसत्रा, जितकन्येनें तदा तिनिकरानें ॥ चंदनपाटीं बसऊनि, भावेंमग वंदिलानिजकरानें ॥ ४ ॥ ॥ ॥ अभंग ॥ ॥ हातजोडोनीयां सत्यभामा बोले ॥ पूर्वपुण्यें झालें येणें स्वामीं ॥ १ ॥ जयावरीदया करितिसज्जन ॥ मनोरथपूर्ण होतीत्यांचे ॥ ५ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ पूजाकरोनी षोडशोपचार ॥ ह्मणे परिसाजी एकविचार ॥ जन्मोजन्मीं कृष्णभ्रतार ॥ व्हावा ऐसें वाटतें ॥ ६ ॥ यासीं कवणव्रत कवणदान ॥ ऐकोनि हांसे विधिनंदन ॥ ह्मणे हरिमहिमा नेणोन ॥ जन्म पंक्तीइच्छित ॥ ७ ॥ तरी इचा अभिमानझडे समूळ ॥ ऐसा करावा कांहीं खेळ ॥ पात्रपाहुनी कुशल ॥ पदार्थ माजी सांठविती ॥ ८ ॥ ॥ आर्या ॥ मुनिभामेस ह्मणे कीं, कृष्णजरीइच्छिसी निजभ्रतार ॥ व्हावाजन्मोज-

न्मीं; तरि देई दानहाचि सुविचार॥ ९ ॥ ॥ साकी ॥ ॥ हाथजोरकेक हतकिसुनसें, विनती सुनो हमारी॥ दयाकरोअर्जीमोपर सेवा, चाहतदा सि तुह्मारी॥ १०॥ ॥ ओंवी॥ ॥ हरीसएकांतीं पुसे सत्यभामा॥ तुमचें दान देईन पुरुषोत्तमा॥ ऐकतां हांसें आलें मेघश्यामा॥ पूर्णकामा सर्वे-शा॥ ११॥ ॥ आर्या॥ ॥ स्त्रीचा आग्रह पाहुनी, कृष्णह्मणे बहु बरें करीं क्षिप्र॥ परि दान ग्रहणासीं, पात्र सदां शुद्ध पाहिजे विप्र॥ १२॥ ॥ ओंवी॥ ॥ भामा पुसे द्विजासिं जाउन॥ दान घेतां काय श्रीकृष्ण॥ वि प्र ह्मणती तो गोंवळा पूर्ण॥ आह्मीं ब्राह्मण सोंवळे॥ १३॥ हा परम कपटी चोरजार॥ आमचे ग्रहीं न व्हावा संचार॥ यास उत्तम वस्त्रें अळंकार॥ केसे आह्मीं पुरवावे॥ १४॥ ॥ वामनीश्लोक॥ ॥ कृष्णपति विनवी सु निला हो॥ संगतीस फळ हो मजला हो॥ दान घेसिल जरी हरि ला हो॥ म न्मनोरथ तरी पुरला हो॥ १५॥ ॥ ओंवी॥ ॥ नारद ह्मणे अवश्य॥ मीं दान घेतों जगन्निवास॥ पूर्णब्रह्म पुराणपुरुष॥ अनायासें ये हातां॥ १६॥ सत्यभामा ह्मणे यदुवीरा॥ दानासि पात्र नारद बरा॥ हें मानलें की तुमच्या विचारा॥ हरी ह्मणे त्वरा करावी॥ १७॥ ॥ साकी॥ ॥ मो रमुकुट ओर कानन कुंडल, भूखन सब हि चढावे॥ पीतवसन ओर मुक्त कि माला, चंदन भाल लगावे॥ १८॥ ॥ ओंवी॥ ॥ पुष्यार्कयोग उ त्तम बहूत॥ ऐसा पुढें न साधे मुहूर्त॥ नारदाजवळी आणिला श्रीकृष्णना थ॥ वस्त्राभरणीं शृंगारुनी॥ १९॥ ॥ गद्य॥ ॥ श्रीमदनंतवीर्यादि नारायणाचिंत्यापरिमित शक्त्यनंतकोटिब्रह्मांडें शाजाजितत्रिभुवनपाल क सर्वाधारशेषपर्यंक रमालालितपादपद्म योगीहृदयध्येय हंसलीला विग्रह लीलादशावतारनिर्द्वंद्वनिःसंगनिरामय शुद्धचैतन्यसच्चिदानंद स्वरूप एतादृश श्रीकृष्णस्वरूप ममेहजन्मादनेकजन्मनिससौभाग्योक्त फलविशिष्टभर्तृप्राप्तये ऋषये आजन्मब्रह्मचारिणे ईशकभक्तितत्परा यलोकप्रियाय नारदाय श्रीकृष्णापतिदानं करिष्ये॥ २०॥ ॥ ओंवी॥ संकल्प करोनी यथा सांग॥ नारदकरीं देत श्रीरंग॥ जो क्षीराब्धिहृदयरत्न

रंग॥ पूर्णनिःसंगपरब्रह्म॥ २१॥ नारदह्मणेवनमाळी॥ हाब्रह्मविणा सांभाळी॥ तंतूतुरोंनेदींनिजमुळीं॥ श्रुतीस्वरसांभाळिजे॥ २२॥ आर्या भामेनेंसुमुहूर्तीं॥ दानदिलानारदाघनश्याम॥ मुनिमागेंचालेनो॥ शोधितियलेंअयाशिनिष्काम॥ २३॥ ॥ ओंवी॥ ॥ माझीदेवतार्चनांपेटी॥ जतनकरींगाजगजेठी॥ नारदचालिलाउठाउठी॥ पाहेदृष्टीं सत्यभामा॥ ॥२४॥ ॥ साकी॥ ॥नाथविरहसेंअपनेमनमों, बिकलभई हरिप्यारी॥ कहेकिसन बिभावतनहिकछु, सूधगई सबमेरी॥ २५॥ ॥ ओंवी॥ सत्यभामाकरीरुदन॥ आतांकेंदेखेनमधुसूदन॥ ठकवूनीगेलाविधिनंदन॥ भूलीपूर्णघातली॥ २६॥ ॥ आर्या॥ ॥ कृष्णादिलादानअसें, श्रुतझालेंवृत्तसर्वसवतींला॥ मगत्या बोलतिकेंचा, अधिकार तुलाचि सर्व सवतीला॥ २७॥ ॥ ओंवी॥ ॥ मगबोलेसूर्यकुमरी॥ बरामत्सरसाधिलासुंदरी॥ तुवांआपुलें हितकरीं॥ कायकेलें सांगपां॥ २८॥आपुलें छेदूनियांघ्राण॥ वैरियासिकेलाअपशकुन॥ जैसेंआपलेंतान्हें मारुन॥ आळघातलासवतीवरी॥ २९॥ ॥ आर्या॥ ॥त्वज्जनककृतभरवरा, त्याचीकंन्याहितूंअसी असती॥ आह्मांसर्वांचापति, देऊनियांदानएकलीबससी॥ ३०॥ ॥ ओंवी॥ ॥ द्वारकेचे ह्मणतीजन॥ जगद्वंद्यहाजगज्जीवन॥ त्याचेरवांदा वोझें देउन॥ नारद मुनी नेतसे॥ ३१॥ ॥ पद॥ ॥ नारदानकोनेऊंयाला॥ आमुच्या कृष्णाला॥ ध्रु०॥ द्वारकेचेसकळही जन॥ करितीदुःखें अतिरुदन॥ ह्मणतो जाती विधिनंदन॥ घेउनिष्कृष्णासीं॥ १॥ कृष्णावांचूनिआह्मीदीन॥ शुष्कसरोवरीजैसेंमीन॥ सर्वप्रकारें झालोंहीन॥ हाचिशीणवाटतसे॥ २॥ नारदह्मणेबात्हषिकेशी॥ कां रेहळूचालतोसी॥ गृहआशाअजुनिनसोडिशी॥ कैसासाधिशीपरमार्थ॥ ३॥ ॥ ओंवी॥ ॥ तोंदेवकीधांवलीतत्काळ॥ ह्मणेदानकांदिधलामाझाबाळ॥ नवमासपोटींवाहिलाकेवळ॥ जोकांनिर्मळअंतर्बोध॥ ॥ ३२॥ ॥ साकी॥ ॥ छोटेपनमें हमेंजुगतसें, हमने बाळबढाया॥ सोअजजुनिकोसहजपियेनें, दानमानकरदीया॥ ३४॥ ॥ पद॥ ॥ भामेकां

केलेंहरिसेंदान॥ ध्रु० ॥ दानकरायायोग्यनव्हेहा ॥ सकलजगाच्चाप्राण॥१॥या च्येगुणगणस्वर्गीसुंदर ॥ वर्णुनिकरितीगान ॥२॥ ३५॥ ॥ ओंवी ॥ ॥ मीं जवळीं असतांजननी ॥ आणियासोळासहस्रकामिनी ॥ दानद्यावयास्वामि णी ॥ तूंचिकैंचीझालीस ॥ ३६॥ ॥ आर्या ॥ ॥ त्यासमयींभामेनें, सर्वां चीशब्दबाणमयवृष्टी ॥ सोसुनीस्वमनीं चिंतन,॥ करितीझालीनदाअधो दृष्टी ॥ ३७॥ ॥ ओंवी ॥ ॥ जैसीचोराचीजननी ॥ रडोंनलागेभगवज्जनीं॥ असोबकिभक्षें ऐकिलें कर्णी ॥ ब्रह्मनंदनेंहरीनेला॥ ३८ ॥ ॥ अभंग ॥॥ब्दि रामाश्रुतझालें॥ मुनिनेंभामेलाठकविलें॥१॥दान घेऊनियां हरी॥ पळोनियांगे लादुरी ॥ २ ॥ सर्वमिळोनीयादव॥ मागोंजातीवासुदेव॥ ३॥ ३९॥ ॥ओंवी दूरदेखोनीदळभार॥ नारदासिह्मणेयदुवीर॥ आमुचेवडील आलेसमग्र॥ शिक्षाकरितीथोर आह्मां॥ ४०॥ ॥ आर्या॥ ॥मुनिरामासिह्मणेकीं,ए काकीबहुअशक्तमीविप्र॥ चतुरंगसैन्य घेऊनि, केलाचीपाठिलागकांक्षिप्र॥ ४१॥ ओंवी ॥ ॥ यादवेंघालोनी नमस्कार॥ नारदापुढेंपसरितीपदर॥ तूंजे वस्तूमागसीसाचार॥ कृष्णापालटातेंदेऊं ॥ ४२॥ ॥ ॥आर्या॥ ॥बलद लनिधियादवपरि, कृष्णावांचोनिजाहले दीन॥ चरणधरुनियांमागति,प्रभु पासींदानजेंविधनहीन॥ ४३ ॥तेह्मणती ब्रह्मसुता, देआह्मांमागतोंमदनजनका ॥ त्याच्याभारें तुजला, देतोंसर्वहिमिळोनियांकनका ॥ ४४॥ ॥श्लोक॥ मगतुळेंतहरिसीं बसविला ॥ स्वर्णभारगृहिंचामिळवीला॥ याचियाअतिम नोरमलीलां ॥ जाहल्यासुरवदत्याचहरीला॥ ४५॥ ॥ ओंवी ॥ ॥ महावृक्षावरीदेखा॥ भार घालुनी बसे पीपिलिका॥ तैशाअष्टधातूसक ळिका॥ तुळेमाजीहळुवट ॥ ४६॥ ॥ आर्या॥ ॥ सुनितेंनमुनीह्मणती, आह्मांसर्वांसिद्याजिपतिदानं॥ नाहींतरि भामेप्रति, द्यावें शिकवूनिदंपतींदा न॥ ४७॥ ॥पद ॥साधांकरुनिदया॥ अर्पींपतिसदया॥ ध्रु०॥ दुष्टतीभा माकेवळवैरिण॥ ठावनिचे अंतःकरणींनसेचिदया॥१॥ जाणपतीविणप्राण नराहती.आपणवहातोंआह्मींकींजातसोंलया॥२॥ नकोअंतपाहूंजगनउदारा ॥ विनवितों आतांसोडनलौकिकाभया॥ ३॥ ४८ ॥ ॥ओंवी॥ ॥नच

लेंपारडेंदेखोन॥ देवकीरडे धायमोकलून॥ ह्मणेसत्यभामापापिणं॥ अ-
घटितकरणीहे केली॥ ४९॥ ॥श्लोक॥ ॥कोण्यातपें कृष्णाहा बाळझा
ला॥ तयींपासुनीदुःखदुष्काळगेला॥ तुह्मांभार्युनीमागतेंतोकदानं॥ नबो
लोंतुझीवैरखरीनारदानं॥ ५०॥ ॥पद॥ ॥देवकीविनवीऋषिवर्या॥ देईंपु
त्रनिधान॥ ध्रु०॥ कृष्णामाझागुणनिधान॥ यासीनंसेस्वरुपाचेंज्ञान॥ करितेंतु
मची मीसन्मान॥ राखींमान तूंमाझा॥ ५१॥ कृष्णामागेंपंचप्राण॥ जाऊंपाहा
तीरानोरान॥ स्त्रीनेंत्याचें केलेंदान॥ हाअपमानयोरजगीं॥ २॥ ५१॥ ॥आ
र्या॥ ॥नारदसांगेसुनिवर, पतिर्चास्त्रीरुक्मिणीतिचेपाशीं॥ बहुधनअसेचि
देउनि, घेउनिजाईलशार्ङ्गचापाशीं॥ ५२॥ ॥ओंवी॥ सकळांसीमानलीगोष्टी
उद्धवपाठविलाउठाउठी॥ तोंहृष्टीदेखिलीगोरटी॥ जिचेपोटींमन्मथजन्मला॥
५३॥ ऐकतांआद्यंत वर्तमान॥ केलें किंचितहास्यवदन॥ तैसीचवृंदावनींजाउन
॥ केलेंनमन तुळशीसीं॥ ५४॥ ॥अभंग॥ ॥प्रदक्षिणाकरुनीसती॥
मन्नमागेतुळसीमती॥ १॥ हंसगतीचभकत॥ जगन्माताआलीतेथें॥ २॥ भी
मकीनें तयेवेळे॥ कृष्णानारदपूजिले॥ ३॥ करोनीयां प्रदक्षिणा॥ भावें लाग-
लीचरणा॥ ४॥ तूंकेठेवीतुळशीदळ॥ हळूझालाघननीळ॥ ५॥ नामाह्मणे
भावखरा॥ सोडवीलें यदूवीरा॥ ६॥ ॥दिंडी॥ रुक्मिणीनेंघालोनितुळ
शिदळा॥ समसाम्यकेलाची घननीळा॥ थोरआश्चर्य जाहलें जनासीं॥ जिचें
स्मरणकलिकल्मषासिनासि॥ ५५॥ ॥ओंवी॥ ॥ असोत्मोनेंजाहलेंब
हूत॥ तेंकाढितीहातोहात॥ गोपीधांवती समस्त॥ माझें माझें ह्मणोनी॥ ५६
॥ ॥आर्या॥ ॥सोडवितांरुक्मिणीनें, प्रभुधन घेती लुटोनित्यामाजी॥
भामाह्मणेबहुत धन, मत्सदनीं कायसारि तुह्मामाजी॥ ५७॥ ॥ओंवी॥
॥ ॥धांवतीसर्वस्त्रुषादेखा॥ देवकीह्मणेतुह्मीं मूर्खा॥ माझे अलंकार
मजपुढेंटाका॥ हांसतीसुनागदगदां॥ ५८॥ ॥ ॥साकी॥ ॥तबमुनिम
नमें करतविचारा, कैसीमोहकिधुंदी॥ भरीजगतमेंनहिंछोडेगा, कियाज्ञान
कीबंदी॥ ५९॥ ॥आर्या॥ ॥द्रव्याच्यालोभास्तव कलहाकरितीमि
ळोनियांसवती॥ ज्ञानरहित होउनियां, नच्चिजाणतिभक्तिमार्गत्यायुवती॥

॥ ५९ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ ह्मणतीसासूती ह्मातारपणीसोस ॥ कांहोसुटलातु ह्मांस ॥ आतांअलंकारसुनांस ॥ वांटाआजीयामिसें ॥ ६० ॥ ॥ साकी ॥ ॥ हाथ्जोरके कहतमुनीतब, रुक्मिनिमाताजीकूं ॥ हरिसेंलेकर तुमरहजावो, कह केचलेस्वरगकूं ॥ ६१ ॥ ॥ ओंवी ॥ ॥ नारदें वंदोनिरुक्मिणीस ॥ ह्मणे तूं भोगीं जगन्निवास ॥ मगप्रदक्षिणाकरूनीदोघांस ॥ उर्ध्वपंथेंचालिला ॥ ६२ ॥ जनसर्वही गुंतलेधना ॥ रुक्मिणीघेऊनिगेलीजगन्मोहना ॥ पूर्णब्रह्मनंदावैकुंठराणा ॥ अगाधलीलादावित ॥ ६३ ॥ ॥ ॥

---

# अथ तत्वमसि महावाक्य पंचीकरण प्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ कोणीएक शिष्य साधनचतुष्टय संपन्न होऊनसद्गुरू सद्गुरणगेला. तीं साधनें कोणतीं ॥ नित्यानित्यविवेक विचार १ इहामूत्रफळ भोगविराग. २ शमदमादिषट्क ३, मुमुक्षु ४, आतां नित्यानित्यविवेक ह्मणजेकाय १ तरनित्य ह्मणजे आत्मा, अनित्य ह्मणजे देहादिप्रपंच, त्यादेहादि प्रपंचीं उदास होणें, व प्रत्यक्षानुमानानें जाणून इहलोक भोग व स्वर्गादि भोग या उभयतांचे ठांईं वीट धरणें, यानांवइहामूत्र भोग विराग, आतां शमदमादिषट्क ह्मणजे शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा, समाधान हीं साहा मिळून एक साधन. आतां शम ह्मणजे कल्पना टाकून मन आवरणें यांनावशम, १ दम ह्मणजे विषयापासून इंद्रियें फिरवून तीं श्रवण, कीर्तन, पादसेवन, स्मरण, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन, यानवविधप्रकारें भगवद्भजनीं लावणे यानांव दम २ उपरती ह्मणजे हरि भजनीं रतणें, इंद्रियें भगवद्भजनांचे गोडीनें विषयापासाव आपेंआपफिरविणें यानांवउपरती. ३, तितिक्षा ह्मणजे आपल्यास दुसरे कोणीं जाचिलें असतांही भ्रंशनपावणें, इतकातो जाच अंगीं सोसणे यानांव तितिक्षा. ४, श्र

ह्या ह्मणजे गुरूनें सांगितलें त्यावचनीं, वेद जो बोलिला त्याचे ठायीं विश्वा सठेवून तदनुसार वर्तन करून राहाणें या नांव श्रद्धा ५, समाधान ह्मणजे हर्षवि षादादिकीं न उचंबळणें या नांव समाधान ६, मुमुक्षु ह्मणजे या दुःखरूप विष यांपासून कधीं निघून आत्माराम कधीं पाहून मोक्ष पावेन अशी उत्कंठा, तो दा खवी ऐशा सद्गुरूस धुंडीत चालिला त्याच्या पुण्याच्या राशी फळास आल्या तेणें जन्मांतरीं कर्में निष्काम ईश्वरार्पण केलीं होतीं त्याणीं त्याचे ईश्वर आभारले पणें प्रगट झाला. प्रगट होतांच त्यास शिष्यें प्रणिपात केला. मग त्या शिष्यास उ ठवून हृदयीं आलिंगून सन्मुख बैसवून बोलता झाला. बा तूं कोण आहेस? तु ला कोणी जाचिलें? व काय तुला झालें तें सांग. असें ह्मणतांच मग तो शिष्य बोल तो, स्वामी! त्रिविधतापें तापलों, संसारपंकीं बुडालों, अज्ञानसर्पीं ग्रासिलों, का मक्रोधादिकीं जाचिलों, तरते त्रिविध ताप कोणते? आध्यात्मिक १ आधिभौति क २ आधिदैविक ३, तर आध्यात्मिक ह्मणजे काय? देहाचे ठायीं अष्टोत्तरशत- व्याधि होऊं लागल्या तेणें करून आह्माळणें या नांव आध्यात्मिक, १ आधिभौति क ह्मणजे गृह पुत्रदारादिकांची चिंता करणें, त्या योगें काम क्रोधादिकें करून मनीं आहाळणें या नांव आधिभौतिक २, आणि आधिदैविक ह्मणजे देवतांचें पूर्वीं आराधन केलें नाहीं तेणें करून देवता विमुख होऊन आंधळा थोटा पांगळा झाला किं वा देव लागला अथवा पाऊस नाहीं ह्मणून दुष्काळ पडला ऐसें होणें या नांव आधिदैवि क ३, ऐसे त्रिविधतापें तापून स्वामीस शरण आलों. जेणें करून हा त्रिविधताप शम होय आणि संसारबंधापासून सुटें व आंगें देव मी पाहें ऐसी स्वामीनीं दया करावी ह्मणून मागुती नमस्कार केला. हें अवलोकन करून सद्गुरु बोलते झाले, चैत- न्य जिवाचा निवाडा झाल्यापासून तुजला देव दिसेना, संसारबंध तुटेना, तर स्वामी जड ह्मणजे काय? बापा सांगतो ऐक. तरी आपणास नेणें व दुसऱ्यास हीने णें या नांव जड. आपणास जाणें दुसऱ्यास ही जाणें या नांव चैतन्य. ऐसें जडचै तन्य सांगितलें तेणें मजला कैसें कळेल. तर सद्गुरु बोलती तर बा तूं कोण आहेस शिष्य ह्मणे मी राम कृष्ण नांवाचा तर बा हीं नावें कासया आलीं सांग. तर स्वामी या देहास ठेविलीं आहेत. तर ऐक बापा हा देह ऐसें जाणेना दुसऱ्यास ही नजा

णें तरि नेणेजी तरी आपल्यास नेणें दुसऱ्यासनेणें या नांव काय? या नांवज डु· तेव्हां देह जड कीं असत्य? कीं पत्यक्षदिसतें ह्मणून दृश्य कीं जें तुला दिसतें तेंच तुला कैसा होसी· तस्मात् देहतूं कैसा होसी तरमीं देह नवेजी· तरतूं काय बापां· तरमीं कान· कान मींकान· ऐसें जाणेना आणि दुसऱ्यास ही नजाणें या नांव काय? यानांवजड स्वामी· तेव्हां हीं इंद्रियें जड कीं दृश्य? माझाकान ह्मणतोस कीं मीं कान ह्मणतोस? माझाडोळा ह्मणतोस कीं मीं डोळा ह्मणतोस? स्वामी, मांझाडोळा, माझाकान, ह्मणतों तरतेंच कैसा होसी? तर मीं नव्हेजी तेव्हां हें ज्ञानेंद्रियपंचक, श्रोत्र, त्वचा, जिव्हा, घ्राण हीं हीं तूं नव्हेसी· जेशींहीं पांचज्ञानेंद्रियें जडें तैसींच कर्मेंद्रियें जडें कीं तीं कोणतीं? वाचा, पाणी, पाद शिश्न, गुद हीं हीं तूं नव्हेस कीं· तरन व्हेजी तरतूं कोण आहेस बापा· तरस्वामी क्षुधा तृषादि असेना, दुःखी मीं, मेलोंमीं, प्राणादि अंतः करणतरी आपणास जाणेना तरी दुसऱ्यास जाणें कीं काय? तरी नेणे जी· जरी हे प्राणन व्हेसकीं माझे प्राण ह्मणतोसकीं, तूं तरी होयजी तेव्हां देह तुझा लिंगदेह इंद्रियें १० प्राणपंचक ५, अंतःकरणपंचक ५, विषयपंचक ५, इतकीं मिळून हा लिंगदेह तूं नव्हेसी· नव्हे स्वामी· तर तूं कोणआहेस बापा तर स्वामी मीं कोणआहें हें मजला कळेना· आतां स्वामींनीं सांगावें· जर मीं नेणें ऐसें कझानें ह्मणतोस? स्वयें जो वेडा तो काय मीं वेडा ऐसें जाणें तर नेणेंजी· तैसा तूं एक जाणता आहेस· तरमीं नेणें असें ह्मणतोस यास्तव तुझी नेणीव तेंच तुझें अज्ञान तेंच तुझा कारण देह· हीं तूं नव्हेसी· जैसे स्थूळ सूक्ष्म देह हेही तूं नव्हेसी· जैसे स्थूल सूक्ष्म जड देह अदृश्य तैसीच ही नेणीव यालागीं कारणदेह हीं तूं नव्हेसी· तरहोयजी· तिहीं देहास जाणतें ज्ञान तें ज्ञान तें ज्ञान ही मजमाजी दिसत नाहीं तरमीं केवळ निर्विकार शुद्ध चैतन्य आत्माजो मी कायजी तेव्हां सद्गुरु ह्मणती· भलारे बापा· जें तिहीं देहांस जाणतें ज्ञान तोचि तुझा कारण देह तोहीतूं नव्हसी तूं केवळ चैतन्य आहेस· आतां याचहू देहांची उपलक्षणें तींहीं तूं नव्हेसी· तीं कोणतीं सांगतों ऐक· तेव्हां शिष्यानें नमस्कार केला· स्वामीं सांगावेंजी· स्थूलदेह पंच भूतांचा· तीं पाच नावें अनुक्रमें को

णाचीं कोण तीं तें ऐक· ऐसें पंचवीस विकारांचा स्थूल देह नव्हेसी· तेव्हां विं कारकेवीं होसी· तरी नव्हेजी· आतां दुसरा देह ऐक· लिंगदेह पंचवीस कळां चा सांगतो·

| | लिंगदेह | | | | | | स्थूलदेह· | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | आका· | वायु· | तेज· | आप· | पृथ्वी· | पृथ्वी· | आप· | तेज· | वायु· | आका· |
| आकाश | अंतःकरण· | व्यान· | श्रोत्र· | वाचा· | शब्द· | अस्थी· | लाळ· | क्षुधा· | चलन· | काम· |
| वायु· | मन· | समान· | त्वचा· | पाणी· | स्पर्श· | मांस· | मूत्र· | तृषा· | चलन· | क्रोध· |
| तेज· | बुद्धी· | उदान· | चक्षु· | पाद· | रूप· | त्वचा· | मज्जा· | आळस· | धारण· | शोक· |
| आप· | चित्त· | प्राण· | जिव्हा· | शिश्न· | रस· | नाडी· | रेत· | निद्रा· | प्रसार· | मोह· |
| पृथ्वी· | अहंकार | अपान· | घ्राण· | उद· | गंध· | रोम· | रक्त· | मैथुन· | आकुंचन· | भय· |

हाही तूं नव्हेसी· असें देह द्वय जाणता तूं· यास्तव आपणातें ऐसें मानतोस तें आ त्म्यास अज्ञानरूप· कारण देह तत्साक्षित्वें तो महाकारण देह हीतूं नव्हेसी ·या देहत्रयास जाणतें ज्ञान तुझें महाकारण देह· ऐसें पंचप्राण· अंतः करण पंचक ज्ञानेंद्रिय पंचक· कर्मेंद्रिय पंचक विषय पंचक ऐसे मिळोन पंचवीस कळांचा लिंगदेह· आतां चौ हीं देहांचा चार अवस्था, चार अभिमानी, चार गुण, तेही तूं नव्हेस· चार वाचा· चार स्थानें· चार भोग· चार मातृका हें सांगतों· ऐक बापा· हे स्थूळ, सूक्ष्म, कारण महाकारण·

| देहचतुष्टयपंजर· | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अवस्था· | जागृति· | स्वप्न· | सुषुप्ती· | तुर्या· | उन्मनी· | परा· |
| अभिमानी· | विश्व· | तेजस· | प्राज्ञ· | प्रत्यक् | आत्मा· | परमात्मा· |
| गुण· | रजोगुण· | सत्वगुण· | तमोगुण· | शुद्ध | सत्व· | सत्व· |
| वाचा· | वैखरी· | मध्यमा· | पश्यंति· | परा· | वाचा· | निःशब्द· |
| स्थानें· | हृदय· | कंठ· | नेत्र· | मूर्धा· | स्थान· | भ्रमरगुंफा |
| भोग· | स्थूल· | प्रविविक्त· | आनंद· | आनंदा· | भास· | अखंड· |
| मात्रा· | अकार· | उकार· | मकार· | अर्ध· | मात्रा· | ध्वनि· |

ऐसे चार देह स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण, चार अवस्था. जागृती, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या, ४ अभिमानी, विश्व, तेजस, प्राज्ञ, प्रत्यगात्मा, ४ गुण रज, तम, सत्व, शुद्ध· सत्व ४ वाचा. वैखरि, मध्यमा, पश्यंति, परा, ४ स्थानें, नेत्र, कंठ, मूर्धी, हृदय, ४ भोग, स्थूल, प्रविविक्त, आनंद, कैवल्य, ४ मात्रा, अकार, उकार, मकार, अर्धमात्रा· ४ आतां स्थूल देह, जागृत अवस्था, विश्व अभिमानी रजोगुण, वैखरी वाचा, स्थान, नेत्र, स्थूलभोग, अकार मात्रा ऐसीं हीं स्थूल देहाचीं उपलक्षणें हाही तूं नव्हेसी· आतां लिंगदेह। तैजसाभिमानी स्वप्नावस्था· सत्वगुण, मध्यमावाचा· कंठ स्थान भोग· प्रविविक्त· उकारमात्रा हीं लिंगदेहाचीं लक्षणें ॥ हाही तूं नव्हेसी आतां कारणदेह ॥ सुषुप्त्यवस्था· प्राज्ञ· अभिमानी· तमोगुण· पश्यंति वाचा· हृदयस्थान आनंद भोग· मकार मात्रा· हीं कारणदेहाचीं उपलक्षणें हाही तूं नव्हेसी॥ आतां महाकारण देह· तुर्यावस्था· प्रत्यगात्मा· अभिमानी· शुद्धसत्वगुण· परवाचा· मूर्धीस्थान· कैवलभोग अर्धमात्रा हीं महाकारण देहाचीं उपलक्षणें· हाही तूं नव्हेसी· तूं केवळ ज्ञान चैतन्यमात्र आहेस· ऐसे हे देह चतुष्टय उपलक्षणासहित निरसित केलीयास जीवपण हारपतें· याचा भाव त्वंपद शबल वाच्यांश· आतां तत्पदाची विवंचना ऐक· सृष्टीच्या पूर्वीं निर्गुण निराकार निरुपम नियम निर्विकल्प ऐसें पूर्ण ब्रह्म असतां तेथें अहं ब्रह्मास्मि ऐसें स्फुरण झालें· या नांव मूल प्रकृति· त्या मूळप्रकृतीस पूर्ण ब्रह्मानें व्यापिलें म्हणून त्या नांव इश्वर ऐसें बोलिजे· त्या इश्वरास जग व्हावें अशी इच्छा झाली त्या नांव विविध अहंकृति· तिजला ही त्या चैतन्यानें व्यापिलें मग जगद्रूप मीच होईन· अशी इच्छा झाली व अंतर्बाह्य सर्वत्र मीच असेन ऐशीही इच्छा झाली· त्या विविध अहंकृतीस ही त्या चैतन्यें व्यापिलें· जसें कुंभार गाडगें करूं लागला म्हणजे त्यास आकाश व्यापितें तेसें त्यास व्यापकत्व झालें· तेशापरी जींजीं रत्नें निपजलीं त्यात्यास चैतन्यानें व्यापिलें· मग त्रिविध अहंकृतीपासून त्रिगुण झाले· ते रज सत्व तमोगुण· ब्रह्मा· विष्णु· रुद्र· ब्रह्म्यांची क्रियाशक्ती· विष्णूची ज्ञान शक्ति· त्या द्रव्य शक्ती पासाव आकाश झालें· आकाशापासून वायू झाला· वायूपासून तेज झालें· तेजापासून आप झालें· आपांपासून पृथ्वी झाली· ऐसीं हीं पंचभूतें झालीं· तैशींच ब-

ब्रह्मापासूनदहाइंद्रियें वपंचप्राणझाले· तेसेचविष्णूपासून अंतःकरणपंच
कझालें तेसेंचरुद्रापासून आकाशादि पृथ्वीव्यापक उपप्राणपंचक झालें·ऐसीं
देवतातत्वें झालीं त्यांचाविस्तारसांगतों ऐक शिष्या· रुद्राचीशक्तीतमोगुण आ
काश· वायु· तेज· आप· पृथ्वी· प्राणपंचक· रुद्र· विष्णु· ब्रह्मा·

| स्थूलदेवतापंजर· | | | | सूक्ष्मदेवतापंजर· | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वायु· | चित्त· | चक्षु· | कृकल· | उदान· | ज्ञानशक्ति | रजोगुण· | नाग· |
| तेज· | अहंकार· | जिव्हा· | देवदत्त· | समान· | सत्वगुण· | क्रियाश· | कूर्म· |
| आप· | तुर्या· | प्राण· | धनंजय· | प्राण· | अंतःकरण | ज्ञानेंद्रियें· | कृकल· |
| पृथ्वी· | उन्मनी· | वाक्पाणि· | जागृत्यवस्था | अपानवायु | मन· | श्रोत्र· | देवदत्त· |
| | | | | आकाश· | बुद्धि· | त्वक्· | धनंजय |

आतांनाभीपासूनदेहाचे विराटकार्येचाविस्तारऐक· नाभीतें भूमंडल· भुवर्लो
क· वक्षस्थळ· महर्लोकतें कंठस्थान· जनलोकतें वदन· तपोलोकतें ललाट·सत्य·
लोकतेंमस्तक· इंद्रलोकते हात· सिद्धलोकते कान· सूर्यमंडलतेंनेत्र·पुत्रकलत्रतेदांत
यमतोदाढा·जिव्हातोवरुणलोक· प्रजापतिलोकतेंशिश्न· निरयलोकते गुदस्थान·
ऐसाहाब्रह्मांडगोलपंचभूतात्मक· याभूगोलास पृथ्वीचें आवरण दशगुणें त्यास
आवरण दशगुणें उदकाचें· त्यासदशगुणें आवरण वायूचें· त्यास दशगु
णें आवरण आकाशाचें· आकाशास दशगुणें अहंकाराचें· अहंकारासद
शगुणें महातत्वाचें· ऐसा सप्तावरण ब्रह्मांड हा स्थूलदेह विराटाचा या रीतीनें
पिंड हीस सकंचक स्थूलदेह ब्रह्मांड आणिसृष्टीअवस्था दोहींचाअभिमानी
ब्रह्माहाविराटाचाविस्तार जाणऊर्ध्वभाग· आतांअधोभागऐक· अतळतेंकटि·
स्थान· वितळतेंजानुस्थान· सुतळतेंगुडघे· तलातल त्या खोटा·महातलतींपाउलें·
पाताळते तळवे· ऐसीं सप्तपाताळें मिळूननाभीपासून अधोभाग·सप्तसमुद्रतेंपोट·पृ
थिवीत्याटिरी· पर्वतहाडें· वृक्षवेलीरोमावळी· नद्यात्यानाडी·मेघतेंरक्त· ऐसीच
तुर्दश भुवनें मिळूनएकविराटदेह· आतांलिंगदेह देवतामय· त्यानाम हिरण्यगर्भ
ऐक·अंतःकरणविष्णु·मनचंद्रमा·बुद्धिब्रह्मा·चित्तनारायण·अहंकारगौरीरमणऐसें

भूतकरणपंचक. आताप्राणपंचक ऐक. वायाव्यानतोनाग. वायूसमानतोकूर्म उदानतो कृकल. प्राणतो देवदत्त. अपानतो धनंजय. ऐसे हेपंचप्राण. आतांश्रोत्र तेंदिशा. त्वचातोपवन. चक्षुतेसूर्य. जिव्हातेवरुण. घ्राणतेअश्विनौदेव. हेंज्ञानेंद्रियपंचक. आतांकर्मेंद्रियपंचक. अग्नितेंमुख. इंद्रते प्राणी. उपेंद्रतेपाय. प्रजापतिते शिश्न. निर्ऋतितेंगुद. ऐसींकर्मेंद्रियें. सर्वसत्तामयप्राण. ऐशादेशादेवतामिळून दुसरादेह. यानांव हिरण्यगर्भ. आतांगुणसाम्यमाया. तोकारणदेह. महाकायातो महाकारणदेह. आतां त्याची विवेचना सांगतों.

| देहचतुष्टयपंकर. | | | | |
|---|---|---|---|---|
| देह. | विराट. | हिरण्यगर्भ. | माया. | मूळमाया. |
| अवस्था. | उत्पत्ति. | स्थिति. | प्रलय. | सर्वसाक्षी. |
| स्थान. | सत्यलोक. | चंद्र. | कैलास. | क्षीराब्धी. |
| अभिमानी. | ब्रह्मा. | विष्णु. | रुद्र. | परमात्मा. |
| गुण. | रजोगुण. | तमोगुण. | सत्वगुण. | शुद्धसत्व. |
| वाचा. | वैखरी. | मध्यमा. | पश्यंति. | परा. |
| मात्रा. | अकार. | उकार. | मकार. | अर्धमात्रा. |
| वेद. | ऋग्वेद. | यजुर्वेद. | सामवेद. | अथर्वणवेद. |

ऐसेचारदेह, चारअवस्था, चारस्थानें, चार अभिमानी, चारगुण, चारवाचा, चारमात्रा, चारवेदयांची पृथक् विवेचना. विराटदेह उत्पत्ति. अवस्थाब्रह्मा. अभिमानीरजोगुण. वैखरीवाचा. अकारमात्रा. ऋग्वेदहास्थूलदेह. आतांहिरण्यगर्भदेहस्थितिपालन. अवस्थाचंद्रस्थान. विष्णुअभिमानी. सत्वगुण. मध्यमावाचा. उकारमात्रा. यजुर्वेदहासूक्ष्मदेह. आतां मायादेह. प्रळयावस्था. कैलासस्थान. रुद्र अभिमानी. तमोगूण. पश्यंतिवाचा. मकारमात्रा. सामवेद. महामायादेह. निर्विकल्पावस्था. क्षीराब्धिस्थान. परमात्माअभिमानी. शुद्धसत्वगुण. परावाचा अर्धमात्रा. अथर्वण वेदहा महाकारणदेह. ऐसेमिळून हें सत्पद सबलवाच्यांश. हे ही तूं नव्हेसी. त्वंपदशबलवाच्यांश. तत्पद.वाच्यांश ऐ

# उपयुक्त कथा संग्रह

शीं हीं टाकून त्वंपदलक्षांश तसद्धुद्ध लक्षांश हीं दोन्हीं एक यांना व असिपद तूं या तिहीं पदांहून वेगळा. शुद्ध चैतन्य पूर्ण ब्रह्म तें तूंच आहेस. तरी होयजी. स्वामीचे कृपेनें बरें अनुभविलें. आतां मला जन्ममरणाचें लिंगाड नाहीं. मीं सर्वांतीत सर्वांहून वेगळा आहें. ह्मणून पूर्ण प्रेमभरें स्वामीस साष्टांग नमस्कार केला आणि विनविता झाला कीं, स्वामी उत्पत्ति स्थिति यांचें लक्षण कळतें परंतु प्रलयाचें लक्षण कळत नाहीं तें सांगावें. ऐसें ऐकून स्वामी बोलते झाले. बारे प्रळय पांच प्रकारचे आहेत. ते ऐकावे. पिंडींचे प्रळय तीन. सुषुप्तिअवस्था, मरण. २ ब्रह्मज्ञान प्रळय. ३ सुषुप्तिकाळीं इंद्रियांचें चलन वलन नाहीं. वमीं अमुक ह्मणुन हीआठवण नाहीं ह्मणुन सुषुप्ति प्रळय १ आतां मरण काळीं विषयांचा आभास होतो. इंद्रियांच्या शक्ति अंतःकरण पंचकीं येतों अंतःकरण पंचक प्राणपंचकीं मिळतें. ते प्राण अज्ञान झाले ह्मणजे देह निचेतन पडतो. या नांव मरणप्रळय. २ आतां तिसरा प्रळय ऐक. अनुभव काळीं देहादि प्रपंचाचा अभास होणें. आपणावांचून कांहींच नाहीं हें आत्मज्ञान झालें. ह्मणजे यात्रैलोक्याची आठवण नाहीं या नांव ज्ञान प्रलय. ३ ऐसे पिंडींचे तीन प्रलय. आतां ब्रह्मांडींचे दोन प्रलय ऐक. चार युगें सहस्र वेळ येऊन जातील तेव्हां लघुप्रलय. ब्रह्याची निद्रा ते समयीं सहस्र कीरणीं सूर्य तापतो. तेव्हां वनस्पत्यादि सर्व दग्ध होतें. त्या अग्नीस्तव शेषाची फणा पोळते. तेणें करून शेष अग्निज्वाळा टाकितो त्या अग्नि ज्वाळा मेघ मंडळास लागतात. तेणें करून मेघ मुसळधारा वर्षतो. त्या योगें पृथ्वी समुद्रांत विरते. तेव्हां अवघें जलमय होतें. या नांव जळप्रलय. १ आतां महा प्रलय ऐक. ब्रह्याचीं शतवर्षे होतील तेव्हां जल प्रलय होतो. तो किती एक वर्षे. मग जळास अग्नि शोषितो. अग्नीस कित्येक काळीं वायु गिळितो. अहंकारास महत्तत्व गिळितों. महत्तत्व मायेंत लीन होतें. तेमाया परब्रह्मीं लीन होते. या नांव महा प्रळय. २ ऐसें जाणून सद्गुरूस भजावें. ह्मणजे जरा, मरण, हे धर्म, क्षुधा, तृषा, प्राण, धर्म, सुख दुःख मनो धर्म ऐसें जाणून अबाधित प्रालब्ध कालपेक्ष करितां कृत कृत्य यतो हि ष्याः पंचमाया परब्रह्म. मंब शुद्ध. ब्रह्म नित्य. सत्य पूर्व अविनाश तबे शुद्धि प्राळ

त्रगुण· स्फुरणनिमालेलेतेचगुणसाम्य अहंकारज्ञासिमात्र बीज सूक्ष्मन्यायेंपुनः तेथून यथापूर्व उपजतें एवंपुनःपुनः उत्पत्तिः पुनः पुनः स्थितिः पुनःपुनः प्रलय येणेंकरून पंचअनादि ऐशा अनुभवेंवासत्याग केलिया पुनः तद्वत् प्रकारें स्थिति होवून पूर्णब्रह्मी गतिहोत्ये·मगपुनः जन्मकारणनाहीं· ॥ ॥ ॥ ॥

इतितत्वमसिमहावाक्य पंचीदशीरणं समासं· ॥ ॥ ॥ ॥

---

# अथप्राकृतआशौचगंगाधरीप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥अथगनमनकरूं मीगणपती॥ वंदूं शारदानिगुती॥ महाराष्ट्रभाषाओंवियांचेरिती॥ गंगाधरवदवीतसे॥ १॥ धर्मशास्त्र परमकठिण॥ त्यांत अशौचनिर्णयअतिकठिण॥ कलियुगीं अल्पप्रजाजन॥ म्हणउनी सांगतों स्पष्टार्थ॥ ॥ २॥ महाराष्ट्रम्हणुनी पंडितीं ॥ ग्रंथ उपहास करिती ॥ तरीसंस्कृताचा श्लोकोक्ति॥ बोलिलों असेंजाणपां॥ ३ ॥ नदीचीं दोनीतयकें॥ परी प्रवाहीं एकचिउदकें॥ महाराष्ट्रसंस्कृतयेकें॥ अर्थ असे कथियेला॥ ४॥ ॥ अथ स्त्रावाशौचं॥ ॥ गर्भिणी झालिया दिवसापासुन॥ तृतीय मासी गर्भनाशन॥ म्हणवूनियां दिवस तीन ॥ आशौच मातेनें धरावें ॥ ५ ॥ चवथे मासीं गर्भनाशन॥ झालिया अशौच चारदीन॥ मातेनें धरावें प्रयत्नें करून॥ हानिश्चय सर्वशास्त्रीं॥ ६॥ तिसराअथवा चवथामास॥ यांत झालिया गर्भनाश॥ स्त्रावसंज्ञाआहे त्यास ॥पंडितद्विजबोलती॥ ७ ॥ स्त्राव झालियानिश्चयेसीं॥ पिताआणि सापिंडासीं॥ स्नानशुद्धि आहे तयासीं ॥ स्त्रावाशौच संपलें ॥ ८ ॥ ॥अथपाताशौचं॥ ॥पंचममासीं गर्भपतन॥ मातेसीं अशौचपंचदिन ॥ पिताआणिसापिंडजन॥ यांणीं त्रिरात्र धरावें ॥ ९ ॥ षष्ठमासीं गर्भपतन ॥ मातेसीं अशौचषट्‌दिन॥ पिता आणि सापिंडजन ॥यांणीं त्रिरात्रधरावें॥ १०॥ ॥ अथप्रसवाशौचं॥ ॥सप्तममासापासून ॥ दशममास पर्यंतजाण ॥ प्रसूत झालियागर्भिण॥ दशादिनसूतकसर्वांसी ॥ ११ ॥ ॥अथसपिंडसमानोदकसगोत्रलक्षणम्॥ ॥सापिंडहेकोण

कोणते॥ हासंशय श्रोतयांचेमनातें॥ ह्मणऊनि सांगतोंसृष्टिक्रमातें॥ श्रोतीं श्रवण करावें॥ १२॥ एकापुरुषापासोनि दोनवंश॥ त्यास ह्मणावे मूळपुरुष॥ त्यामूळपुरुषासहितसप्तपुरुष॥ त्याससापिंड ह्मणावें॥ १३॥ त्यासापिंडा पुढें सप्तपुरुषपर्यंत॥ समानोदक त्यास पंडित ह्मणत॥ त्यापुढें सप्तपुरुष पर्यंत॥ त्यांसगोत्रजह्मणावें॥ १४॥ ॥ **अथसपिंडादिकांस आशौचं**॥ ॥सापिंडांसआशौचदशदिन॥ धरावेंसमानोदकीं त्रिदिन॥ सगोत्रजानीं एकदिन॥ आशौचधरावें एकमतीं॥ १५॥ बहुग्रंथांचेमतें करून॥ चतुर्दशपुरुषांचें अशौचजाण॥ सगोत्रजांसनाहीं एकदीन॥ स्नानमात्रकरावें॥१६॥ ॥ **अथकन्याप्रसवाशौचं**॥ ॥आईबापाचियाघरीं॥ कन्याप्रसूतझाली तरी॥ एकत्रभावादिमातापितरीं॥ एकदिनवृद्धी धरावी॥१७॥ कन्याप्रसूत भर्तृगृहीं॥ झालियामातापितरांहीं॥ बांधवादिकुळत्यांसही॥ सूतकनाहीं हा निश्चय॥ १८॥ ॥ **अथबालकमरणोन्तरदशादिशांतजाताशौचं**॥ प्रसूतीसमयाअवसरीं॥ बालकगतप्राणपडलें जरी॥ सापिंड बंधूमातापितरीं॥ दशदिन सोयर धरावें॥ १९॥ गर्भिणीप्रसूतझालियावर॥ बालकनालछेदनापूर्वी॥ मरणपावलें असतांजर॥ मातेनेदशाह धरावें॥ २०॥ माताआणिसापिंडांनीं॥ त्रिदिनसोयरधरूनी॥ शुद्धव्हावें कर्माचरणीं॥ हानिश्चयबहुग्रंथीं॥ २१॥ गर्भिणीप्रसूत झालियावर॥ बालकनालछेदनानंतर॥ मरणपावलें असतांजर॥ दशदिनसोयरसर्वांसीं॥ २२॥ जन्मदिवसापासूनिदशदिन॥ मध्येंपावतांशिशुमरण॥ जननसूतकमात्रधरून॥ मृताशौच नधरावें॥ २३॥ पंचमीषष्ठीपूजनदिवशीं॥ त्याचप्रकारें दशमदिवशीं॥ दानपूजादिकर्मासीं॥ अधिकारआहे पितयाचा॥ २४॥ जननसूतकाचें ऐकालक्षण॥ पिताआणिसापिंडजन॥ यांचास्पर्शलोकांकारण॥ झालिया दोषनसेची॥ २५॥ तथापिदेवपितृकर्माचरणीं॥ सूतकीयाचास्पर्शनकरावाकोणी॥ जननसूतकीजेत्यानीं॥ स्नानसीं अर्घ्यांत संध्याकरावी॥ २६॥ येथूनिसंपलेंजननसूतक॥ पुढेंसांगतोंमृतसूतक॥ त्यांतीलभेद आहेत अनेक॥ स्वस्थचित्तें ऐकावें॥ २७॥ इतिजाताशौचम्॥ ॥ **अथमृताशौचं**॥ ॥ मरणसूतकीजे

म्हणी ॥ त्यांसस्पर्शनकरावाकोणी ॥ स्पर्शझालिया निश्चयेंकरूनी ॥ सचै लस्नान करावें ॥ २८ ॥ अकरावेदिवसापासुन ॥ यावत् विवाहमौंजीबंधन ॥ आपत्यमरणीं त्रिदिन ॥ मातापितरींधरावें ॥ २९ ॥ शास्त्रार्थविज्ञानेश्वरीं ॥ स्पष्टलेख असेंनिर्धोरीं ॥ श्रेष्ठग्रंथपृथ्वीवरी ॥ म्हणोनिआज्ञा मानावी ॥ ३० ॥ कोणीएकाचेमतें करून ॥ यावत् षष्ठमाससंपूर्ण ॥ कंन्यामरणींएकदिन ॥ मातापितरीं धरावें ॥ ३१ ॥ त्रयोदशदिनापासुन ॥ यावत् वर्षत्रयसंपूर्ण ॥ आपत्यमरणींदहन ॥ अथवागर्तेंतपुरावें ॥ ३२ ॥ त्रयोदशदिनप्रभृति ॥ यावत् होईलदंतोत्पत्ति ॥ पुत्रदाहे एकरात्री ॥ सापिंडींसुतकधरावें ॥ ३३ ॥ सप्तममासआरंभापासुन ॥ यावत् तीनवर्षें होतीपूर्ण ॥ पुत्रमरणींएकदिन ॥ सापिंडींआशौचधरावें ॥ ३४ ॥ वर्षत्रयानंतरजाण ॥ यावत् होईलमौजिबंधन ॥ मध्येंझालिया पुत्रमरण ॥ त्रिरात्रअशौच सापिंडा ॥ ३५ ॥

**अथ आपत्यमरणीं सोदकांतसूतक प्रकार ॥** ॥ उपनयनरहितविवाहरहित ॥ पुत्रकंन्यामरणपावत ॥ समानोदकांसनाहींसूतक ॥ स्नानत्याणीं करावें ॥ ३६ ॥ कन्यामरणीं अशौचप्रकार ॥ तीनवर्षेंजालिपानंतर ॥ कंन्यामरणीं वाग्दानापूर्व ॥ पुरुषसापिंड एकत्र ॥ ३७ ॥ वाग्दानोत्तरकन्यामरण ॥ यावद्विवाहपर्यंतजाण ॥ पितृभर्तृसापिंडान ॥ त्रिरात्रसूतक धरावें ॥ ३८ ॥ ॥ अथ **शूद्रमरणींअशौचप्रकार ॥** ॥ त्रिवर्गानंतरशूद्रमरण ॥ यावद्विवाहपर्यंतजाण ॥ त्रिरात्रसूतक धरून ॥ शूद्रसापिंडीं शुद्धव्हावें ॥ ३९ ॥ ॥ शूद्रविवाहनझालाजर ॥ षोडशवर्षांतमृतपावलातर ॥ अशौच धरूनित्रिरात्र ॥ शूद्रजातीं शुद्धव्हावें ॥ ४० ॥ विवाह अथवाषोडशवर्षें ॥ झालियानंतर, एकमासें ॥ अथवाअशौचदशादिवस ॥ शूद्रानीं धरावेंयेरीती ॥ ४१ ॥ ॥

**अथ मौंजी विवाहरहित पुत्रकन्येसअशौच प्रकार ॥** ॥ माता आणि पितामरण ॥ झालियासूतकदशदिन ॥ उपनयनविरहित विवाहहीन ॥ पुत्रकन्यानींधरावें ॥ ४२ ॥ ॥ **अथ उपनीताशौचं** ॥ ॥ उपनयनोत्तरंपुत्रमरण ॥ झालियासापिंडासदशदिन ॥ समानोदकांस त्रिदिन ॥ सगोत्रजींस्नानकरावें ॥ ४३ ॥ ॥ **अथ विवाहित कन्येचा आशौच प्रकार ॥** ॥ विवाहानंतरकंन्या मरण ॥ पावतांपितृगृहींजाण ॥ माता

पितादोघेंजण॥ याणीं त्रिरात्र धरावें॥ ४४ ॥ याचप्रकारेंसापत्नमातु ॥ तैसुच जाणावासापत्नभ्रातु ॥ आणखींहीसोदरभ्रातु ॥ याणीं त्रिरात्र धरावें॥४५॥ ॥पित्याच्याघरींकन्यामरण॥ झालियापितृव्यसापिंडजन॥ पितृगृहीं असलिया एकदिन॥ सूतकधरावेंनिश्चयेसीं ॥ ४६॥ पितृगृहींकन्यामरण॥ झालियाअशौचदिवसतीन॥ मातापितादोघेजन ॥ सापत्नमातेनेंधरावें ॥ ४७॥ बंधूनींधरावेंपक्षिणी॥ ऐसेंबोलतीवसिष्ठमुनी ॥ कोणीएकाचेमतेंकरूनी॥ पितृव्यासएकदिन ॥ ४८ ॥ ॥अथमातृपितृमरणीं कन्येस आशौचप्रकार॥ ॥ माता पितादोघेजण॥ दैवयोगेंपावलीमरण॥ कन्येनेंअशौचदिवसतीन ॥ दशादिनांत धरावें ॥ ४९ ॥ जरीदशादिनंझालियावरी॥ मरण श्रवणवत्सरांतरीं ॥ अथवा ककलें कालांतरीं॥ तथापिपक्षिणीधरावें ॥ ५०॥ याचप्रकारेंसापत्नमातु॥ मरणपावलाजरीनिश्चितु ॥ त्रिरात्रधरावेंदशादिनांतु॥ तदनंतरपक्षिणीधरावें ॥ ५१ ॥ ॥अथभगिनीबंध्वाशौचप्रकारः॥ ॥ बंधुगृहींभगिनीमरण॥ अथवाभगिनीगृहींबंधूमरण॥ झालिया अशौचदिवसतीन॥ परस्परें धरावें॥ ॥ ५२ ॥ बंधूभगिनीगृहांतरीं॥ मरणपावलियानिर्धारीं॥ परस्परेंपक्षिणीतरी॥ धरावें हानिश्चय॥ ५३ ॥ ग्रामांतरीं उभयमरण॥ झालियाअशौचएकदिन॥ सापत्नबंधूभगिनीजन॥ त्यांचेंहीआशौचयाचरिती॥ ५४॥ भगिनीमेलियाभगिनीस ॥याचप्रकारें आहेतीस॥ ऐसेंभासतें आह्मांस ॥ स्पष्टलेखनदेखों ॥ ५५॥ ॥ अथपितृव्यांचेअशौचप्रकार॥ ॥ पितृव्यादिपितामहजन ॥ यांचे मरणीं करूनिस्नान॥ कन्याशुद्ध होतसेजाण॥ हानिश्चय धर्मशास्त्रीं ॥ ५६॥ ॥अथमातुलांचा अशौचप्रकार॥ ॥मातुलअथवामातुलपत्नी ॥ मरणीं आशौचधरूनिपक्षिणी॥ भाचाभाचीदोघेंजणी॥ शुद्ध होती निश्चित॥ ५७ ॥ भाचाचेगृहींमातुलमरण॥ तैसाचउपकारकर्ता मातुलजाण॥ त्याचेमरणींआशौचत्रिदिन ॥ भाचीभाच्यानें धरावें॥ ५८ ॥ सापत्नमातुलपावेमरण॥ त्याच रीतीअशौचजाण ॥ सापत्नमातुलपत्नीमरण॥ झालियाआशौचनसेची॥५९ ॥ भगिनीपुत्रकन्येस॥ भाचाभाचीह्मणतीत्यांस॥ समजपडावाअज्ञानांस॥ केवळभक्तबोधिलें॥ ६०॥ उपनीतभागिनेयसापत्नभाचा॥ उभयमरणीं तीनदि

सुंब्या ॥ अधिकार आहे सूतकाचा ॥ मातुळ भगिनीमातुळास ॥ ६१ ॥ उप-
मयनेंरहितभाचा ॥ तैसाच असेल सापत्नभाचा ॥ उभयमरणीं पक्षिणीचा ॥ अ
धिकारी असेल मातुळ ॥ ६२ ॥ या उभयतांचे मरणीं ॥ सूतक धरावें पक्षिणी ॥ शु
द्ध होईल मातुलभगिनी ॥ ऐसें द्विज बोलती ॥ ६३ ॥ भाचीजरी पावे मरण ॥ तरी
मातुलें करावें स्नान ॥ ऐसें भासे मज कारण ॥ वाक्यार्थ न दिसे म्हणोनियां ॥ ६४ ॥

**अथ मातामह मातामहीचें आशौच प्रकार ॥** ॥ मातामह पावे मरण
॥ दौहित्र दौहित्री दोघे जण ॥ यांस सूतक दिवस तीन ॥ आहे निश्चय जाणपां ॥
६५ ॥ मातामहाचा मांतरीं ॥ मरण पावला असेल जरी ॥ पक्षिणी सूतक धरावें त
री ॥ उभयतांनीं द्विज आज्ञा ॥ ६६ ॥ मातामहीचिया मरणीं ॥ दौहित्र दौहित्री उ
भयतांनीं ॥ सूतक धरावें पक्षिणी ॥ हा नेम बहु ग्रंथीं ॥ ६७ ॥ अनुपनीत दौहित्र
मरणीं ॥ मातामहिसहितपत्नी ॥ उभयतांस आहे पक्षिणी ॥ उपनीत मरणीं त्रि
रात्र ॥ ६८ ॥ दौहित्री मरण पावे जरी ॥ सूतक धरावें निर्धारीं ॥ सापत्नीक मातामह
यानीं तरी ॥ स्नानमात्र करावें ॥ ६९ ॥ ॥ **अथ सासू सासऱ्याचा आशौच प्रकार**
॥ सासुसासरा दोघे जण ॥ कालांतरीं पावती मरण ॥ जामात सन्निध असलिया
जाण ॥ आशौच त्रिदिन धरावें ॥ ७० ॥ असन्निध असलिया जांवई ॥ तथापि पक्षि
णी धरावें पाहीं ॥ ग्रामांतरीं असत्याही ॥ एकरात्र धरावें ॥ ७१ ॥ सासुसासऱ्यां
चा उपकार ॥ जांवयावरी असेल फार ॥ सन्निध नसला जामात जर ॥ तथापि त्रि
रात्र धरावें ॥ ७२ ॥ भार्या पावलिया मरण ॥ श्वश्रुसंबंध तुटला जाण ॥ उपकार
हीन सला जाण ॥ तथापि पक्षिणी धरावें ॥ ७३ ॥ ॥ **अथ जामाताचा आशौच
प्रकार ॥** ॥ जामात मरणीं एक दीन ॥ स्वगृहीं मरणीं त्रिदिन ॥ सासुसासरियानें ध
रून ॥ शुद्ध व्हावें ये रीती ॥ ७४ ॥ ॥ **अथ मेहुण्याचा आशौच प्रकार ॥** ॥ उ
पनीत शालक पावे मरण ॥ भगिनी भार्यांस एक दीन ॥ अनुपनीत मेलिया स्ना
न ॥ लेखन असें सिंधुसागरीं ॥ ७५ ॥ या प्रकारें शालक मरण ॥ भगिनीभर्तृस
एक दिन ॥ कोणी एकाचे मतें करून ॥ आशौच मेहुणीचें धरावें ॥ ७६ ॥ **अथ मा
वशीचें आतेचें आशौच प्रकार ॥** ॥ मातृभगिनीचे मरणीं ॥ भगिनीपुत्र कन्यांचा
णीं ॥ आशौच धरावें पक्षिणी ॥ सापत्नमावशीचें ये रीती ॥ ७७ ॥ पितृभगिनी पावे म

रण॥ बंधूचेंपुत्रकन्यानींजाण॥ पक्षिणीसूतक धरून॥ सापत्नआतेचेंस्त्रामर्ण
॥७८॥स्वगृहींपितृभगिनीमरण॥ तैसीचमातृभगिनीहीनिधान॥ पावलियादिवस
तीन॥ सूतकधरावेंनिश्चयेंसीं॥ ७९॥ ॥अथबंधुत्रयाचेआशौचप्रकार॥ ॥
उपनीतबंधुत्रयमरणीं॥ अशौचधरावेंपक्षिणी॥ अनुपनीताचियेमरणीं॥ एकदि
नसूतकधरावें॥८०॥गुणहीनबंधुत्रयमरण॥ त्याचेंहिसूतक एकदिन॥ स्वगृहींबं
धुत्रयाचेंनिधान॥ झालियात्रिरात्रधरावें॥ ८१॥ बंधुत्रयहे कोणकोण॥ त्याचेंही
सांगतोंलक्षण॥ तेंऐकावेंचित्तदेउन॥ ग्रंथाशयबोलतों॥ ८२॥आपलेपित्याचेभ
गिनीचासुत॥आपलेमातेचेभगिनीचासुत॥आपुलेमातुळाचापुत्र॥ त्यांसआ-
त्मबंधूह्मणावें॥ ८३॥ आपलेपित्याचे आतेचापुत्र॥ आपलेपित्याचेमावशीपु
पुत्र॥ आपलेपित्याचा मातुलपुत्र॥ त्यांसपितृबंधूह्मणावें॥ ८४॥ आपले-
मातेच्या आतेचा पुत्र॥ आपलेमातेच्यामावशीचापुत्र॥ आपलेमातेच्यामातु
लपुत्र॥ त्यांसमातृबंधूह्मणावें॥ ८५॥ बंधूत्रयहेअतिकठिण॥ ह्मणूनस्पष्टा
र्थबदलोंजाण॥ यानवांनींसूतकग्रहण॥ कैसेंकरावेंतेंऐक॥ ८६॥यानवांबां
धवांमध्येंजाण॥पावतांआत्मबंधूमरण॥ त्यानींमातृपरस्परकरून॥ सूतकध
रावें निश्चयें॥ ८७॥ ज्यापुरुषाचेपितृमातृबंधू॥ मरणींसूतकअसेसंबंधू॥ तो
चिपुरुषमेलियाषड्बंधू॥ याणींसूतकधरावें॥ ८८॥ ॥उदाहरण॥ ॥देव
दत्तनामाएक ब्राह्मण॥ त्याचे आत्मबंधूशिव१ राम२ कृष्ण३ ॥हे तिघेजेव्हां
पावतीमरण॥ देवदत्तेंसूतकधरावें॥८९॥देवदत्तमेलियाआत्मबंधुसीं॥शिव
रामकृष्णायातिघांसीं॥ सूतकआहेगा निश्चयेंसीं॥ परस्परबंधूह्मणोनियां॥९०
॥अथभगिनीत्रयांचासूतकप्रकार॥ ॥पितृभगिन्यादिकांच्याकन्या॥ विवा
हितमरणीएकदिनआज्ञा॥ अविवाहितासस्नानआज्ञा॥ ऋषींचीअसेजाणपां॥
९१॥ बंधूत्रयपावतांमरण॥ पितृस्वसादिकन्येसस्नान॥ सिंधुआशयहाह्मणउ
न॥ लेखअसेसिंधुसारीं॥ ९२॥ अथदत्तपुत्राचाअशौचप्रकार॥ ॥
परगोत्रींचाजोदत्तक॥ त्याचेंकितीधरावेंसूतक॥ पितेदोन्हीजनकपालक॥ त्याणीं
त्रिरात्रधरावें॥ ९३॥बहुग्रंथमतेकरून॥ पूर्वापारसापिंडानींएकदिन॥आशौच
धरावेंनिश्चयेंकरून॥जननसूतकऐसेंची॥ ९४॥ दत्तकपुत्रपौत्रमरणीं॥उभ

पृथ्व्याच सपिंडानीं ॥ एकदिनसूतकधरूनी ॥ कर्माचरणींयोग्यव्हावें ॥ ९५॥ नीळकंठमतेंकरून ॥ दत्तकमरणींदशादिन ॥ हेंही मतअसेजाण ॥ देशाचारें वर्तावें ॥ ९६ ॥ अथदत्तपुत्रास आशौचप्रकार ॥ ॥ जनकपालकदोन्ही पिते ॥ मरण आलियाजरीत्यातें ॥ दत्तपुत्रानें त्रिरात्रातें ॥ आशौच धरावें निश्चयेसीं ॥ ९७ ॥ उभयपित्यांचेसांपिंडमरणीं ॥ दत्तकादिपुत्रपौत्रानीं ॥ एकदिन आशौच धरोनी ॥ शुद्ध होयदत्तवंश ॥ ९८ ॥ औरसपुत्राभावेंजाण ॥ पालकपित्याचें उत्तरकर्म ॥ केलियासूतकादशादिन ॥ निश्चयेसीधरावे ॥ ९९ ॥ ॥ अथस्वगोत्राचादत्तक त्याचे आशौचप्रकार ॥ ॥ स्वगोत्रींचाजोदत्तक ॥ त्याचेंकायसांगावें अधिक ॥ दशादिन आहेसूतक ॥ हेंसर्वहीजाणती ॥ १०० ॥ ॥ अथ आचार्यगुरुशिष्यादिकांचे आशौचप्रकार ॥ ॥ आचार्यगुरुशिष्यमरण ॥ यात्रिवर्गांचेदिवसतीन ॥ हेंचग्रामांतरीं पावतीमरण ॥ तरीपक्षिणी धरावें ॥ १०१ ॥ ऋत्विजपावतीजरीमरण ॥ आशौच धरावें दिवसतीन ॥ स्वाध्यायींमरणीजाण ॥ पक्षिणीसूतक धरावें ॥ १०२ ॥ ॥ अथसंन्यासीमरणआशौचप्रकार ॥ ॥ संन्यास घेऊनपुरुषमरती ॥ त्यांस प्राप्तउत्तमगती ॥ सापिंडांस नाहीं आशौचप्राप्ती ॥ स्नानमात्रकरावें ॥ ३ ॥ ॥ अथग्रामाधिपतिवदेशाधिपतियांचे आशौचप्रकार ॥ ॥ ग्रामाधिपतिदेशाधिपति ॥ दिवामरणींसूर्य अस्तांती ॥ रात्रीमरणीं सूर्योदयांती ॥ आशौचनिवृत्ति होतसे ॥ ४ ॥

॥ अथपक्षिणीसूतकाचेंलक्षण ॥ ॥ पक्षिणीसूतक धरावें कैसें ॥ लक्षणपक्षिणीचें आहे कैसें ॥ संशयनिवृत्ती होईल ऐसें ॥ स्पष्टसांगतोंतें ऐका ॥ ५ ॥ ज्यादिवशीं प्राणीमरत ॥ तोंसंपूर्णदिवसरात्र ॥ दुसरेदिवसींअस्तमानपर्यंत ॥ आशौच धरावें निश्चयेसीं ॥ ६ ॥ दिवसापावलियामरणीं ॥ त्याचप्रकारें धरावीपक्षिणी ॥ रात्रीमरणपावतीप्राणी ॥ त्याचें लक्षण भिन्नअसे ॥ ७ ॥ पूर्वरात्रींउत्तररात्रीं ॥ प्राणीमरणपावतीजरी ॥ दुसरे दिवशींसूर्य अस्तांतरीं ॥ पक्षिणीनिवृत्तीहोतसे ॥ ८ ॥ रात्रींमरणतेरात्रीं ॥ दुसरेदिवशीं दिवारात्री ॥ तिसरे दिवशींस्नानशुद्धी ॥ सूर्योदयींजाणपां ॥ ९ ॥ पक्षद्वयरात्रीमरणीं ॥ आहेतऐसें ववतीमुनी ॥ ह्यांतून एकपक्ष घेउनी ॥ पक्षिणीग्रहणकरावी ॥ १० ॥ इतिपक्षि-

